# पु० ल० देशपांडे यांची पुस्तके

तुका म्हणे आता
अंमलदार
भाग्यवान
तुझे आहे तुजपाशी
सुंदर मी होणार
तीन पैशाचा तमाशा
राजा ओयदिपौस
एक झुंज वाऱ्याशी
ती फुलराणी
मोठे मासे छोटे मासे
विठ्ठल तो आला आला
आम्ही लटिके ना बोलू
वयं मोठं खोटम्
नवे गोकुळ
पुढारी पाहिजे

अपूर्वाई
पूर्वरंग
जावे त्यांच्या देशा
वंगचित्रे

खोगीरभरती
नस्ती उठाठेव
गोळाबेरीज
हसवणूक
बटाट्याची चाळ
असा मी असामी
खिल्ली
कोट्याधीश पुल

मराठी वाङ्मयाचा
(गाळीव) इतिहास

चित्रमय स्वगत

रसिक हो!
मित्र हो!
श्रोते हो!
चार शब्द
दाद

व्यक्ती आणि वल्ली
गणगोत
गुण गाईन आवडी
मैत्र
गांधीजी

एका कोळियाने
काय वाट्टेल ते होईल
कान्होजी आंग्रे
टेलिफोनचा जन्म
स्वगत
पोरवय

रवींद्रनाथ : तीन व्याख्याने

पु०ल० : एक साठवण

# अनुक्रम

फ आणि ह ———

जन्म आणि मृत्यू या दोन
टोकांच्या मध्ये पकडून नियतीने
चालवलेली आपणा साऱ्यांची
फसवणूक एकदा लक्षात आली
की त्यापासून सुटायला आपली
आणि आपुलकीने भोवताली
जमणाऱ्या माणसांची 'हसवणूक'
करण्यापलीकडे आपण तरी काय
करायचं ?

पु. ल. देशपांडे

विजयादशमी
१.१०.६८

# आमचा धंदा : एक विलापिका

माणूस जगण्यासाठी अमूक एकच धंदा कसा निवडतो, ह्याचे मला पहिल्यापासून गूढ आहे. लॉँड्री काढणारा माणूस घ्या! हा किराणा-भुसार मालाचे दुकान न काढता लॉँड्रीच का काढतो? दुसऱ्याचे कपडे धुऊन किंवा हरवून दाखविण्याची ईर्ष्या जन्मतःच माणसात निर्माण होत असेल का? धंद्याची निवड ही भांडवलावर आहे म्हणावे, तर भरपूर भांडवल असलेले लोकही विशिष्ट धंदाच कां करतात? मी ह्या विषयाचा खुलासा करून घेण्यासाठी अनेकांच्या मुलाखती घेतल्या. उदाहरणार्थ, आमच्याच आळीतल्या डॉक्टरांना गाठले.

"या!"

डॉक्टर अगदीच 'निरोगी' नाहीत. पण मी गेलो, त्या वेळी दवाखान्यात फक्त एकदोनच माणसे होती. त्यांपैकी एकाला सिकनोट हवी होती, आणि दुसरा हातात भरलली बाटली घेऊन काहीतरी विचारण्याच्या पोजमध्ये उभा होता. सिकनोटवाल्याने डॉक्टरांशी केलेल्या वाजवीपेक्षा दीर्घ हस्तांदोलनातून दोन रुपयांची एक नोट इकडून तिकडे सरकलेली मी पाहिली. त्यानंतर डॉक्टरांनीही कारण नसताना खिशात हात घालून हातरुमाल काढला, आणि नोट चेपली. वास्तविक, त्यांनी ते दोन रुपये ठणठणीत माणसाला रुग्ण ठरविण्याबद्दल घेतले, याबद्दलही दुःख नव्हते. नाहीतरी तो इसम काम न करून पगार पदरात पाडून घेणार होता. त्या प्राप्तीचा काही वाटा त्याच्या लबाडीत भागीदारी करून डॉक्टरांनी उपटला, हे जनरीतीला साजेसेच झाले.

"हं, काय?" हा प्रश्न त्या बाटलीवाल्याला होता.

"नाही, खाण्याच्या बाबतीत काय करायचं?"

"साबूदाण्याची लापशी घ्या, फळं खा मुसंबी वगैरे, हवं तर अंडं उकडून खा—"

"हे सगळं जेवणापूर्वी, का जेवणानंतर?"

"जेवणाऐवजी."

तो गृहस्थ आपत्तीत पडल्यासारखा चेहरा करून निघून गेला आणि मी उरलो.

"बोला, काय होतंय ? अहो, तुम्ही विनोदी लेखक. तुम्हांला कसलं काय व्हायला ! हॅ हॅ हॅ हॅ !"—डॉक्टर.

तरी बरे, मी ह्याच डॉक्टरांचा पेशंट आहे. त्यांच्या त्या 'हॅ-हॅ'ला एक चांगला डोज द्यावा, असा विचार माझ्या मनात आला होता. पण माझा उद्देश निराळा होता. 'उद्देशा'पेक्षा 'ध्येय' शब्द अधिक बरा. माझे ध्येय निराळे होते. मी माझ्या संशोधनकार्याच्या निमित्ताने आलो होतो.

"त्याचं असं आहे डॉक्टरसाहेब, मी आपल्याला एक खाजगी प्रश्न विचारणार आहे."

"खाजगी म्हणजे... ?" डॉक्टर माझ्याकडे संशयानं पाहू लागले.

"खाजगी म्हणजे...तसं खाजगी नाही, पण नाही म्हटलं तरी खाजगीच ! तुम्ही हा डॉक्टरचा व्यवसाय कां पत्करलात ?"

माझ्या ह्या प्रश्नाने ते एकदम गंभीर झाले.

"खरं सांगू का ? पण हे तुम्ही छापणार नाही ना कुठं ?" डॉक्टर सावधगिरीच्या स्वरात म्हणाले.

लेखकांच्या बाबतीत हा एक सार्वत्रिक गैरसमज आहे. तो दिवसातून जे काही ऐकतो, त्याची रात्री आपल्या साहित्यिक कीर्द-खतावणीत नोंद करतो, असा एक विलक्षण प्रवाद आहे. तो साफ खोटा आहे, हे गरजूंनी ध्यानात घ्यावे.

"छे, छे !"

"मग सांगतो. छापण्यासाठी असेल, तर लिहून घ्या. आपल्या भारतात..."

"नको, नको !" मी व्याकूळ होऊन म्हणालो. 'आपल्या भारतात' ह्या शब्दांनी सुरवात होणाऱ्या प्रत्येक लेखी आणि तोंडी वाक्याचा मी लहानपणापासून धसका घेतला आहे. "छापण्याची मुलाखत नको, खरी हवी."

"ठीक आहे. चहा घेणार का ?"

"पण तुम्हीच तर मला चहा कमी करायला सांगितलाय !"

"अहो, ते डॉक्टरच्या भूमिकेतून. विनोदी लेखक असून इतकी विनोदबुद्धी कशी नाही तुम्हांला ? गोपाळराव, दोन चहा सांगा समोरच्या इराण्याकडे."

मग गोपाळराव कंपौंडरांना त्यांनी पिटाळले. "—आणि तुम्हीही घेऊन या !"

गोपाळराव आपल्या त्या गुहेतून बाहेर पडले. आज गेली अनेक वर्षे मी त्या छोट्याशा खिडकीतून फक्त गोपाळरावांचे तोंडच पाहत होतो. आता अखंड गोपाळराव पाहिले. तोंडावरून खालचे धड इतके धाकट असेल, असे वाटले नव्हते मला. रिकाम्या वेळात हा इसम बरीच टॉनिके पीत असावा.

"गोपाळरावाला मुद्दामच पिटाळला. तुम्हांला खरं सांगतो, मला डॉक्टर मुळीच व्हायचं नव्हतं. मी गवई होणार होतो."

"काय ?"

"अगदी खरं सांगतो." स्टेथास्कोपवर हात ठेवून ते म्हणाले, "चुकून डॉक्टर झालो. एरवी ह्या धंद्यात राम नाही."

"असं कसं म्हणता ! परवा तर नवी गाडी घेतलीत सोळा हजाराची—"

"ऑन् रोड सोळा हजार चारशे अठराला पडली."

"घ्या !"

"पण सुख पैशात नाही."

"वा ! पण डॉक्टरांना समाजात मान केवढा देतात लोक ?"

"आजारी लोक ! हेल्दी लोक विचारतात का आम्हांला ? तुमचा हेवा वाटतो मला."

"माझा ?"

"अहो, तुमची व्याख्यानं होतात. हजारो लोक जमतात—"

"पण त्यांत सगळेच हेल्दी नसतात. टीकाकार नावाची एक जात आहे, डॉक्टर. निद्रानाश, बद्धकोष्ठ असल्या रोगांनी पीडित असते ती. हसत नाही ती कधी. पोट धरून हसणं पाप समजतात."

"अहो, ते अपवाद. पण आमच्याकडे नुसतेच रोगी !"

"तात्पर्य, तुमच्या धंद्यात राम नाही म्हणता ?"

"राम नाही, सीता नाही, काही नाही;—नुसता वनवास आहे ! काय ? आम्हीदेखील विनोद करू शकतो की नाही ? हॅ हॅ हॅ !"

तेवढ्यात चहा आला, म्हणून गप्प बसलो.

त्यानंतर मी वकील पकडले. त्यांतल्या सहांपैकी तिघांना अनुक्रमे फौजदार, नट आणि खलाशी व्हायचे होते. उरलेल्या तिघांनी एकजात "वकील होण्यापेक्षा भीक मागावी", असा मला सल्ला दिला.

नाक्यावरच्या 'केशाकर्षण-केंद्रा'च्या प्राचार्य प्रदीपचंद्र कोथरूडकरांना भेटून हाच सवाल केला. त्यांच्या दुकानात ही गर्दी होती. तरीदेखील कात्री बाजूला ठेवून त्यांनी मला मुलाखत दिली. तीत त्यांनी "वास्तविक आम्ही चित्रपटाचे दिग्दर्शक व्हावे ही मणिशा मणात बाळगूण धेहप्रातीच्या मार्गावर णिघालो होतो. पण णाविलाजाणे ही लाइण स्वीकारावी लागली," असे सांगून समोरच्या गिऱ्हाइकाच्या काणामागूण लाइण मारली. बाकी अलीकडे बरेचसे चित्रपट पाहिल्यानंतर तिथली मंडळी इथे व इथली तिथे गेली, तरी केसभरही फरक पडला नसता, याची खात्री पटली.

मोटार-ड्रायव्हरला भेटलो. त्याची महत्त्वाकांक्षा हाटेल काढायची होती. "सालं गल्ल्यावर बसावं आरामात—आन् पैसा करावा ! ही साली झिगझीग ! आज पुन्यात, तर साला उद्या बंगलोर ! साला ट्रक चालवण्यापेक्षा रस्ते झाडणं बरं ! निदान रात्री आपले आपल्या बायकापोरांत तरी बसता येतं !"

शेवटी माझ्या परिचयाच्या एका प्राध्यापकांना भेटलो. त्यांच्या चेहऱ्यावरची स्वप्रसन्नता पाहून हा तरी इसम आपल्या धंद्यावर, स्वतःवर नेहमी असतो तितका, खूष असेल असे वाटले होते. पण नाही.

"आमच्या व्यवसायाचा व्यापक दृष्टीनं आपण जर विचार केलात—"

मी तिथेच अडलो. कारण विचार मला करता येतो; पण सम्यक आणि व्यापक दृष्टीने करायचा विचार मला जमत नाही.

"—तर आपल्याला हे उमगावं की विश्वविद्यालयीन शिक्षणाचा दर्जा फारच खालावला आहे. जिवंत ध्येयानं प्रेरित होऊन आगरकरकालीन महाराष्ट्रात जी एक मूलभूत वैचारिक क्रांती झाली—"

मी खऱ्या भुताला भीत नाही, इतका ह्या 'मूलभूत' शब्दाला भितो.

"—तिचा परिणाम म्हणून गेल्या दशकाच्या पूर्वीच्या दशकात एक प्राध्यापकांची निराळी पिढी आली."

"म्हणजे प्रोफेसराचा प्राध्यापक झाला, तेव्हापासून गाडं बिचकलं म्हणता!"

"स्थूल मानानं (अबब!!) आपणांला हे विधान मान्य व्हावं."

"समजा, आपण प्रा० झाला नसतात, तर काय झाला असतात?" मी आपला ठोक प्रश्न विचारला

"हे आपलं बिट्विन यू अँड मी...म्हणजे ऑऽफ द रेकॉर्ड...म्हणजे खाजगीत बोलायचं म्हणजे...मी चुकून प्राध्यापक झालो. माझ्या मनात आय० ए० एस०ला जायचं होतं—"

शेवटी साऱ्या संशोधनाचा निष्कर्ष हा की, जो ज्या धंद्यात आहे, तिथे तो काही सुखात नाही, आणि सगळ्यांना शेजाऱ्याच्या बायकोसारखा दुसऱ्याचा धंदा अधिक चांगला वाटतो.

आमचा धंदा हसवण्याचा! "दुसऱ्याला पोट धरून हसायला लावणं आणि आपलं पोट भरणं, हाच तुमचा धंदा," असे मला एका गृहस्थाने कुत्सितपणाने म्हटले होते. पण सत्य हे कुत्सितपणाच्या पोटीच जाऊन का दडते, कोण जाणे! घरच्या जेवणापेक्षा खाणावळीतले जेवण जसे काही जणांना अधिक आवडते, तसेच सत्याचे आहे. आमचा धंदा हसवण्याचा हे खरे. पण माणूस काय चोवीस तास धंदाच करतो? खाणावळवालादेखील घरी गेल्यावर बायकोच्या हातचे खातो, तिला राइसप्लेट शिजवून नाही घालीत. डॉक्टर आपल्या पोरांना औषधच नाही पाजीत,—कोका कोलादेखील देतात. वकील आपल्या कुटुंबाला 'माय लॉर्ड' म्हणून नाही हाका मारीत. पण विनोदी लेखक मात्र चोवीस तास विनोदच करतो, अशी समजूत आहे. किंबहुना, ह्याने फक्त हसवावे, ही जनतेची मांग आहे. आणि त्यामुळे आमच्या धंद्याची दिवसेदिवस दारुण अवस्था झाली आहे.

लहान-लहान अर्भकांनादेखील, "हे काका आता तुला हसवतील हं, बबड्या!" अशी आमची ओळख करून देण्यात येते. मग बबड्या, त्याच्या पाठीवरची आणि तोंडापुढची सर्व भावंडे, बबड्याची आई, जिवंत असली तर कानांवरचा पदर वर करून आज्जी, बबड्याचे बाबा आणि अन्य येरू समोर येऊन बसतात, आणि आपण घाम पुसायला खिशातून हातरुमाल काढला तरी हसतात. "चहा घेणार का?" ह्या

प्रश्नाला "घेऊ या" म्हटले तरी हसतात; "नको" म्हटले तरी हसतात. आता ह्यात हसण्यासारखे काय आहे? पण नाही! आज्जी हसते, आई हसते, बाबा हसतात आणि बबड्यादेखील हसतो!

नव्या पिढीला संदेश देण्यासारखे माझ्याशी काहीही शिल्लक नाही, असे वाटत होते. पण हल्ली मी "एक वेळ ग्रामोद्योग-केंद्रात साबणाचे उत्पादन शिकायला जा, पण विनोदी लेखक होऊ नका," असे कुठेही लिहून द्यायला तयार आहे.

विनोदी लेखक, विनोदी नट, ह्या प्रकाराविषयी जनतेच्या अफाट कल्पना आहेत. एकदा परगावी व्याख्यानाला गेलो होतो. संस्थेच्या अध्यक्षांनी जेवायला बोलावले आणि पानात दहाबारा लाडू घातले! मी थक्कच झालो.

"अहो, हे काय?"

"वा! संस्कृत नाटकांतले विदूषक तर सारखे लाडू खायच्या गोष्टी करतात!"

ह्या गृहस्थांना संस्कृत भाषेचे गाढ ज्ञान आहे, असा त्या गावी एक गैरसमज आहे. गीर्वाणपंडितांनी आम्हांला विदूषक ठरविले. समर्थांनी तर 'टवाळ' म्हटले. त्यांना वक्र कोण पाहणार? बाकी त्यांच्यावर रागावण्यात तरी काय अर्थ आहे? एखाद वेळी त्यांच्या एखाद्या शिष्याने ही ओळ त्यांच्या खात्यावर जमा केली असेल. मूर्खांची लक्षणे लिहिणाऱ्या समर्थांना विनोदबुद्धी नसावी, हे पटत नाही. एरवी, इतकी मोठी मूर्खांची यादी लिहिणाऱ्या समर्थांना त्या गर्दीत विनोदी लेखकालाही दाटीवाटीने बसवणे अवघड नव्हते. कदाचित सकाळच्या भिक्षेला गेले असताना कुणीतरी त्यांना त्यांच्या मनाच्या श्लोकांचे विडंबनही ऐकविले असणे शक्य आहे. मग आपली कुबडी आपटून समर्थ तरातरा सज्जनगडावर गेले असतील, आणि मसीत बोरू बुडवून ठोक अक्षरात त्यांनी लिहिले असेल, "टवाळा आवडे विनोद!" समर्थ झाले, म्हणून त्यांनी भडकू नये, असे थोडेच आहे!

समर्थांवर आमचा राग नाही. आहे तो हल्लीच्या परिस्थितीवर. मराठीतली कविता, कथा, नाटके, एकांकिका, प्रवासवर्णने ह्यांच्या तुलनेने विनोदी लेख कितीसे लिहिले जातात? हे असे का झाले? महाराष्ट्रात विनोदबुद्धी कमी आहे म्हणून? मुळीच नाही. महाराष्ट्रात विनोदबुद्धी आणि सहनशीलता उदंड आहे. जो महाराष्ट्र हौशी नाट्यस्पर्धा पाहतो, प्रत्येक ऋतूचे निमित्त करून व्याख्यानमाला धडवतो आणि एकाच व्यासपीठावरून 'मराठीतील प्रेमकाव्य' आणि 'सहकारी शेती व भारत' ही व्याख्याने ऐकतो, श्रमदान करून पाव इंच पावसात वाहून जाणारे रस्ते बांधतो, 'सौभद्र' हे भाबडे नाटक आहे, 'एकच प्याला' कलंडलेले आहे, 'भाऊबंदकी' थिटे आहे, 'मानापमान' सुटे आहे,—हे लेख वाचतो, मंत्र्यांचीसुद्धा भाषणे ऐकतो, त्याला विनोदबुद्धी, सहिष्णुता, धीर वगैरे लोकोत्तर गुण नाहीत, हे कसे म्हणावे?

पण डॉक्टर, वकील इत्यादी लोकांपेक्षाही आमचा धंदा दिवसेंदिवस बिकट होऊ लागला आहे. इथे माझ्या टेबलावर सकाळच्या डाकेने आलेली तीन पत्रे पडली आहेत. दोन निषेधाची आणि एक चुरचुरीत विनोदी लेख मागणारे—संपादकाचे. ('पुण्यातील

पुरामुळे झालेले अतोनात नुकसान आपण जाणताच. तेव्हा यंदा मोबदल्याची अपेक्षा नसावी. लेख मात्र चुरचुरीत असावा.'—पूर पुण्यात, हा संपादक लातूरचा !)

हे निषेधपत्र पाहा :

'स० न० वि० वि० (बाकी निषेधाच्या पत्राचा न० मात्र स० आहे.)

...हे पत्र आपणांस रजकसंघाकडून पाठवीत आहो. परवा तुमच्या एका विनोदी लेखात तुम्ही, तुमचा धोबी 'त्याच्या वंशपरंपरागत स्वभावधर्माला अनुसरून विजारीची सगळी बटणे उडवून आला,' असे लिहिले आहे. रजकसंघातर्फे येत्या रविवारी दि० ७ रोजी ठीक सकाळी नऊ वाजता धोबी-घाटावर आपला जाहीर निषेध करण्यात येणार आहे. त्या वेळी तो लेख आम्ही घाटावर सर्व रजक बंधुभगिनी व व्यवसायाशी संबंधित असलेली इतर मंडळी (म्हणजे गाढवे इ० ?—ही माझी शंका.) ह्यांच्या उपस्थितीत बडवून काढणार आहोत. तरी आपण—' इ० इ०

आता दुसरे पत्र :

'स० न० वि० वि०

आपण स्वतःला कोण समजता ? आपल्या एका पुस्तकात आपण दात पुढे आलेल्या माणसावरून विनोद केल्याचे संबंधित व्यक्तींकडून कळले आहे. ते आपणांस शोभले नाही. माझ्या ** कोचे दात **—' इ० इ०

आता अशा ह्या विरोधी वातावरणात काय लिहावे आणि कसे लिहावे ?

माझ्या 'धोबी' ह्या विषयावरील विनोदी लेखातील "धोब्याचा धंदा हा सर्वांत उत्तम; कारण धुऊन निघाला, तरी डाग राहत नाही." ह्या वाक्याला माझे एक चुलतसासरेदेखील हसले होते. त्यापूर्वी ते फक्त एकदा मला गालगुंडे आली होती तेव्हा हसले होते. आणि इथे समस्त रजकसंघ माझा लेख बडवणार होता. कदाचित चुकून मी तिथे जातो, तर त्यांनी मलाही बिब्ब्याच्या फुल्या आणि कांजी घालून बडवले असते.

एका लेखातील "कारकुनाची छाती ती काय ?" ह्या वाक्याला पस्तीस निनावी आणि सहा प्रत्येकी शंभर सह्या असलेली धमकीची पत्रे आली. शेतकऱ्याच्या पात्राच्या तोंडी स्क्रूचा इस्क्रू घातला, म्हणून 'चेंगणे बुद्रूक शेतकरी हितकारी विविधोद्देशी सहकारी संघटने'तर्फे "बैलांची हरकत नसेल, तर तुम्हांला औताला जोडून फटके का मारू नयेत, याचा खुलासा व्हावा," असे प्रेमपत्र आले. सारांश, दिवस इतर दृष्टींनी सुधारत असतील (तिसऱ्या पंचवर्षीय योजनेत पाटबंधारे इ० इ०), पण विनोदी लेखकाची वर्षे भरली, हे खरे !

तसे पाहिले, तर साहित्याच्या दरबारात आमची खुर्ची फार खालची ! किंबहुना, आम्हांला खुर्ची कुठली—कुठेतरी गर्दीत आम्ही उभे. नवकथा आल्या (आणि

गेल्यादेखील), नवनाट्य आले, नवकाव्य तर शेवाळासारखे माजलेय, पण नव-विनोद आल्याचे कुणी ऐकलेय का ? मात्र जरा बारकाईने पाहिल्यास विनोद हा सदैव नवा लागतो, हे पटावे.

प्रेम हा काव्याचा विषय शतकानुशतके चाललाय !

(अ) तुझं माझ्यावर प्रेम आहे.

(ब) तुझं माझ्यावर प्रेम नाही.

(क) माझं तुझ्यावर प्रेम आहे.

(ड) माझं तुझ्यावर प्रेम नाही.

(इ) आपलं दोघांचंही एकमेकांवर प्रेम आहे.

(फ) आ० दो० ए० प्रे० नाही.

ह्या कालवाकालवीतून प्रेमकाव्य वाहिले.

तुझे आणि माझे ह्याऐवजी तिचे आणि त्याचे करून शंभर-सव्वाशे टिंबे घातली, की नवकथा.

(अ) "तुझं माझ्यावर प्रेम आहे, पण तुझा तो थेरडा असं काय करतोय ?"

(ब) "तु० मा० प्रे० आ०, पण तो खल्नायक अ० का० क० ?"

ह्या दोन प्रश्नांत नाटक आले ! अंती लग्न लागले की सुखान्त ! कारण तिथून पुढे संसार सुरू झाल्यामुळे सुखाचा अंत अत्यंत साहजिक आहे. लग्न नाही झाले, तर दुःखान्त ! कारण इथून पुढे स्वातंत्र्याचे दिवस ! अतएव दुर्दिन संपले. पण विनोदाला असा साचा नाही. आणि म्हणूनच खाली दिलेल्या परिशिष्ट (अ) मध्ये सध्याची साहित्यिक सरासरी दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

| जमा | खर्च |
|---|---|
| १०० एकूण साहित्यिक | ७५ कवी (आकलनीय, अनाकलनीय व तिरस्करणीय) |
| | ५ गोष्टी लिहिणारे (म्ह० ज्यांत कोणाचे काय झाले, हे कळते असे.) |
| | ८० कथाकार (म्ह० अक्षर-लागेल-तर-शपथ-छाप) |
| | ५० नाटककार (पडेल असून चढेल) |
| | ५ नाटककार (प्रेक्षकप्रिय) |
| | ५० कादंबरीकार (पाचशे-पानी) |
| | १० कादंबरीकार (पन्नास-एक पाने तरी वाचनीय) |
| | ५० एकांकिका-लेखक (स्नेहसंमेलनाप्रीत्यर्थ) |
| | २५ एकांकिका-लेखक (पुरुषपात्रविरहित) |
| | २५ एकांकिका-लेखक (स्त्रीपात्रविरहित) |
| | १०० एकांकिका-लेखक (सर्व-विरहित) |
| | १५० एकांकिका-लेखक (संपादकविरहित) |

| | |
|---|---|
| २०० | एकांकिका-लेखक (वाचकविरहित) |
| ३०० | एकांकिका-लेखक (प्रेक्षकविरहित) |
| २०० | लेखिका (आजचा पदार्थ ते चिमखडे बोल) |
| २०० | लेखिका (चिमणे बोल ते उलटेसुलटे टाके) |
| ९० | लेखिका (प्रेमळ माता सौ० अमुकाबाई ते फ्लॉरेन्स नायटिंगेलचे चरित्र) |
| ९९ | लेखिका (सासवांपासून नातवांपर्यंतचे प्रश्न लिहिणाऱ्या) |
| १९९ | लेखिका (लोकगीते, स्त्रीगीते, पाळणागीते, वारली स्त्रिया इ० इ०) |
| १०० | लेखक (शिशुवाङ्मय लीहीनाले) |
| ५०० | लेखिका (शिशु-शुशु किंवा शीशी वाङ्मयात अमोल भर घालणाऱ्या) |
| १ | विनोदी लेखक |

(गरजूंनी बेरीज करावी.)

म्हणजे सुमारे शेकडा बाराशे साहित्यिकांत एक विनोदी लेखक, हे प्रमाण! हे जागतिक प्रमाण आहे. अशा वेळी तोही जर नाउमेद होऊ लागला, तर मानवतेचे काय होणार?

आणि त्याने नाउमेद का होऊ नये? रोज संध्याकाळ-सकाळ जर त्याला निषेधाचे ठराव, खुनाच्या धमक्या, डोके फोडू–हात तोडू असा आशय आणि फुटलेल्या डोक्याच्या आकृती असलेली पत्रे यायला लागली, तर त्याने करावे काय!

त्याच्या स्वतःच्या जातभाईत तर त्याला जागाच नाही. साहित्यविषयक परिसंवादांत स्थान नाही. मागे एकदा काही साहित्यिक साहित्यविषयक चर्चा करायला—म्हणजे गैरहजर व यशस्वी साहित्यिकांविषयी उणे बोलायला—थंड हवेच्या ठिकाणी जात. (तिथून ते परतले की त्या ठिकाणाला गरम किंवा दूषित हवेचे ठिकाण म्हणत.) कॉलेजात जाणारा थोरला भाऊ सिनेमाला निघाला की, प्राथमिक शाळेतल्या भावाने "ए दादा, माला ने ना रे" हे ध्रुवपद धरून मिनत्या कराव्या, तशा मी केल्या. पण विनोदी लेखक येत असतील, तर "आम्ही नाही जा!" असे म्हणे भल्या-भल्यांनी सांगितले. मी हट्टालाच पेटलो. महिनाभर दाढी नाही केली. हिरवे-तांबडे शर्ट घातले. कॉलेजविद्यार्थ्यांसाठी एक-दोन विद्वत्ताप्रचुर गाइडेदेखील लिहिली. (हे काम इतके झटक्यात जमते, हे ठाऊक नव्हते.) ह्या साहित्यिकांच्या आसपास जाड-जाड ग्रंथ घेऊन हिंडलो. इतकेच काय पण "आधुनिक अमेरिकन कविता हीच जगाला तारील," असेसुद्धा म्हणून पाहिले. "हिंदुस्थानातल्या वाढत्या लोकसंख्येच्या प्रश्नापेक्षा नवकथेची घडी जरा विस्कटत चालली आहे तो धोका मला फार मोठा

वाटतो," असे स्वतःच्या खर्चाने कॉफी पाजून दोन-चार कथाकारांना आणि त्यांच्या आजूबाजूच्या टीकाकारांना (काय जात आहे म्हणून सांगू, बा वाचका!) ऐकवले. शेवटी एकदा त्या लोकांनी मला त्यांच्यात घेतले. मी त्यांच्या वाङ्मयीन चर्चा ऐकायला आतुर होतो. प्राज्ञपरीक्षेच्या विद्यार्थ्यांच्या उत्साहाने मी सदैव पेणसल आणि वही घेऊन सज्ज होतो. त्या गंभीर साहित्यिकांच्या चार दिवसांच्या सहवासानंतर साहित्यविषयक सखोल चर्चा म्हणजे काय ते कळले. ती मंडळी, सौंदर्य, मूल्य, आकार, आकृती, घन, वर्ग, त्रिज्या, आवर्त, वगैरे जे-जे काही बदली, तेच म्यां इमानाने लिहून काढले आणि छापले.

परिणामी विनोदी लेखक म्हणून ख्याती अतोनात वाढली. ह्या गंभीर मंडळींचा एकूण आव मात्र "मनात आणीन, तर पन्नास विनोदी लेख लिहीन; पण जाऊ दे, विनोदी लेखक जगतोय एकटाच! जगू दे त्याला." असा असतो. नुसता आव चालेल. पण एखादा असला लेखक जेव्हा विनोदी म्हणून काहीतरी लिहायला जातो, तेव्हा त्या लीळा काय वर्णाव्या? "अंगें भिजलीं जलधारांनीं" अशा युवतींना आलिंगन द्यायला गेलेला एखादा चारुदत्त केळ्याच्या सालीवरून निसटून पडावा, हातातली छत्री उलटी व्हावी, आणि भिजल्या रस्त्याचे चुंबन घेताना पाठीवरचा बुशकोट वर जाऊन आतल्या बनियनची फाटकी भोके दिसावी, म्हणजे जे काही होईल, ते होते.

मग ही माणसे टीकाकार होतात. अशात ललितवाङ्मय आणि लग्न दोन्ही न जमलेली जर एखादी विदुषी असली, तर फारच बिकट अवस्था! अशीच एक विदुषी विनोदी लेखक किंवा लेख पाहिला रे पाहिला, की त्याला किंवा त्याच्या लिखाणाला खोली नाही, खोली नाही, असा आक्रोश करते. ज्यांच्या पुस्तकांनी फक्त अडगळीची खोली पाहिली, त्यांनी हे अवश्य म्हणावे, "जीवनाचं सखोल दर्शन घडल्याचा साक्षात्कार ह्यांच्या विनोदात नाही." ही विद्वान मंडळी सदैव खोलीच्या शोधात असतात. वाचकाच्या मनात जागा मिळाली नाही की हे असे होते.

शेक्सपिअरला तरी जीवनाची खोली दिसली होती का? हॅम्लेटच घ्या. (बाकी शेक्सपिअरचे आणखी काय घ्या म्हणा!) त्या राजपुत्राच्या आईने त्याच्या काकाशी लग्न केले, तर ह्याच्या काकाचे काय गेले? राजपुत्राचा विरोध का? तर स्वतःचा बाप सुंदर होता म्हणून! आणि काका कुरूप! (पाहा : हे चित्र आणि ते चित्र.) आता जिचा मुलगा वीस वर्षांचा आहे (मराठी रंगभूमीवर हॅम्लेटचे वय साठीपलीकडे आहे. तो विनोद चालतो!)—तर अशा प्रौढ बाईशी आणि जिचे नाव गर्ट्रूड आहे (खतरुडाशी यमक जुळणारे) तिच्याशी पाट लावायला काय मदनाचा पुतळा तयार होईल? त्याने म्हणे कानात विष ओतले. आता एकमेकांच्या कानांत विष ओतणारे गंभीर लेखक काय कमी आहेत? बरे, तरुण नवरा मिळेपर्यंत त्या गर्ट्रूडने थांबावे तरी किती वर्षे? तिला नवरा हवा होता, विडोज पेन्शन नव्हे. आणि असल्या शेक्सपिअरला तो केवळ विनोदी लेखक नाही, म्हणून खोली लाभली. विनोदी लेखक असता, तर कायमचा रस्त्यावर पडला असता!

खाऊनपिऊन तुस्त असलेल्या कवीचे,

*“हे जीवन...*
*आहे असार*
*सारसापरि*
*लाखातील*
*की पितील*
*जोडीदारणीने*
*भरवता भरवता ”*

असले काहीतरी लिखाण करुणकाव्य म्हणून खोल जाणारे! आणि इकडे दाढ ठणकते आहे, शेजाऱ्याच्या रेडिओवर ‘तिसऱ्या पंचवार्षिक योजनेत बोकडांची पैदास’ किंवा ‘ताडगूळ’ ह्या विषयावर श्रुतिका चालली आहे (माझा चिमुकला पुतण्या तिला ‘सुतिका’ म्हणतो), बायकोने “एवीतेवी दाढदुखीनं झोप येणारच नाही तुम्हांला. पहाटे चारला नळ येतो. तेवढी ती दोन पिंपं आणि बादल्या भरून ठेवा,” हा हुकूम दिला आहे,—अशा अवस्थेतदेखील चुरचुरीत विनोदी वाङ्मय लिहिणाऱ्या बिचाऱ्या लेखकाला जीवनाचे सखोल दर्शन घडले नाही काय? (वास्तविक अशा वेळी निषेधाचा मोर्चाच काढायला हवा विनोदी लेखकांनी. पण दोनअडीच लोकांचा मोर्चा तो कसा निघणार? कवींना हे सोपे जाते. कारण वीण मोठी.)

साहित्यिक जीवनातले हाल सोडा, ते आमचे आम्ही पाहून घेऊ. पण सामाजिक जीवनाचे काय? माणसे जेवायला बोलावतात आणि “वरणाला उकळी येतेय तंवर जरा हसवा बुवा मंडळींना,” म्हणतात. म्हणजे विनोदाची आणि वरणाची उकळी एकाच मापात!

एका आदरणीय कापडदुकानदाराच्या शोकसभेत बोलताना भरल्या गळ्याने मी म्हणालो, “आज माझा गळा भरून आला आहे. (हशा) हृदय भरलं आहे.” (हशा)—एवढी वाक्ये म्हणून कोटाचे बटण नीट केले, तर न बोलताच लोकांनी “आणि पोटही भरलंय” ह्या वाक्याच्या अपेक्षेने हसून घेतले.

नवीन विनोदी पुस्तक खपले, म्हणून आनंद वाटावा. वाचकांच्या पत्रांपैकी निम्म्याहून अधिक पत्रांत कोणाचा काका, मामा, बाप, आत्या वगैरे वारल्याच्या दुःखाचा विसर पाडल्याबद्दल अभिनंदन! वुडहाउस ह्या इंग्रज विनोदकाराला तर कोणीही त्याचा लेख ‘आवडला’ म्हटले की तो चटकन विचारतो, “घरची सर्व मंडळी सुखरूप? आत्याबाई बऱ्या आहेत? जॉन्‌काकांचा मधुमेह? ठीक? मेरीकाकीचा संधिवात? उत्तम?” ही सगळी खात्री झाली की मग तो अभिनंदनाबद्दल “थँक्यू” म्हणतो. आम्हीही हेच करतो. जगातील सर्व श्रेष्ठ विनोदकार हेच करतात, असे ऐकिवात आहे!

जोडीच्या साहित्यिकाच्या कानी लोकांच्या घरून निघताना “आपल्यासारखी विद्वान

माणसं घरी आली की धन्यता वाटते," हे वाक्य पडते, आणि विनोदी लेखकाला तेवढे "या बोवा, असेच अधूनमधून करमणूक करायला! हॅ हॅ हॅ!"

कुणी म्हणेल, मी हे चिडून लिहितो आहे. चिडून काय उपयोग? परवा एका नाटकात लिहून गेलो की, "स्थितप्रज्ञ गाढवासारखा असतो." लोक हसले. पण चिडलेल्या स्थितप्रज्ञांच्या किती धमक्या याव्यात? वर गाढवाच्या भावना दुखावल्या-बद्दल प्राणिदयामंडळाच्या आणि पांजरपोळकेंद्राच्या तारा—"शब्द मागे घ्या! हा अपमान आम्ही सहन करणार नाही!" म्हणजे गाढवाला आमच्यापेक्षा जास्त भाव! बाकी हल्ली शिक्षण 'ग गणपती'ऐवजी 'ग गद्धया' पासून सुरू होते, तेव्हा गणपती-हूनही त्याला अधिक भाव आलाय, तिथे आम्ही कोण?

एखाद्या लग्न झालेल्या बाईने नवऱ्याचा डोळा चुकवून, अगर लागला आहे असे समजून, काही नवकथायोग्य मसाला पुरवला, आणि त्यावर गंभीर कथा आली, की ते जीवनाचे सखोल दर्शन! आणि चुकून एकदा आम्ही "महिलामंडळांची वाढती संख्या" म्हणण्याऐवजी "वाढत्या महिलांची मंडळे" म्हटले, तर तो अखंड स्त्रीजातीचा अपमान! सौ० नैनाबाई पळसुले यांनी आपले वजन उतरविण्याचा "दृढ निश्चय" केला, ह्याऐवजी "सुदृढ निश्चय" लिहून गेलो, तर मोर्चा यायची वेळ आली दारात!

तात्पर्य, दिवस हे असे आले आहेत. पण चुकी आमची! गंभीर लिहिणे इतके सोपे आहे, हे कळूनही विनोदामागे आम्ही का लागावे? विदूषकाचा मुखवटा एकदा तोंडावर चढवला, की तो निघता निघत नाही. पण आता तो तोंडाचे कातडे सोलणारा मुखवटा काढून, विद्वत्तेचा पितळी असून सोन्याचा म्हणून खपणारा दुसरा मुखवटा चढवणे महामुष्किल. एक निश्चित. यापुढे विदूषकाचा मुखवटा चढवणारी धाडसी तोंडे मिळणे अवघड होणार आहे. हापिस चुकवून बंडोपंत पळाले म्हटले की क्लार्क्स युनियनचा मोर्चा, चांभारचौकशी म्हटल्याबरोबर चर्मकारसंघ पाठीचे कातडे सोलणार, हेड क्लार्कची उलटी केली असे लिहिले की नाभिक-संघ आपली उलटी करणार, कॉलेजयुवतीवरून विनोद केला की विद्यार्थि-संघ बसेस जाळणार, बाकी मजूर, गोदी-कामगार, मिल-मजदूर वगैरे ज्वालाग्राही पदार्थांच्या वाटेलाच जायची सोय नाही. बावळट माणसाचे नाव सोमण ठेवल्याबरोबर सोमणकुलवृत्तांताचे संपादक छडी घेऊन दारात, कम्युनिस्टावर विनोद झाला की लालबागला सभा, सोशालिस्ट शिवाजी पार्कवर आक्रोशाला जमणार, प्रजा-सोशालिस्टांची लाल टोपी उडवावी तर शुचितेची होळी झाली म्हणून शंख, संघवाल्यांच्या हातात लाठी, जनसंघवाले पणती घेऊन ग्रंथ पेटवणार, स्वतंत्र पक्षवाले हापिसांत शेठजींना सांगून नोकरीवरून काढून टाकतील आणि कॉंग्रेसवाले सत्तारूढ! नागपुरी लोकांची थट्टा केली की स्वतंत्र विदर्भाला मते. पुणे हा विनोदाचा सनातन विषय पुरामुळे हळवा झालेला. मराठवाडा तर मराठीचे माहेर! माहेरच्या माणसांची का थट्टा करायची असते?

अशाने पंचवार्षिक योजना आणि पाटबंधारे यांखेरीज विषय कुठला काढायचा? हल्ली लोक "कंपोस्ट खते कशी करावी?" वगैरे लेख विनोदी म्हणून वाचू लागले

आहेत. चाळीस लाख टन साखर-उत्पादन वगैरे वाक्ये वाचून हसून हसून गडबडा लोळतात, म्हणे ! कारण त्यात कुणाच्या धार्मिक भावनांना दुखापत नाही, अधिकारारूढ पक्षाची गैरमर्जी नाही. आणि अशीच परिस्थिती राहिली, तर मग विनोदी लिखाणाचा मुख्य भार स्त्रियांसाठी (पुरुषांनी) चालविलेली मासिके, माहितीखात्यातर्फे प्रसिद्ध होणारी पुस्तके, साहित्य ॲकेडम्यांनी केलेली भाषांतरे, निरनिराळ्या देशांतील 'वार्ताहर' वगैरेछाप मासिके, दिल्लीच्या असंख्य इन्स्टिट्यूट्स, काउन्सिले, ॲकेडम्या इत्यादिकांचे वार्षिक अहवाल, आणि तमाम मंत्र्यांची भाषणे ह्यांनाच उचलावा लागेल. मग आम्ही हसवण्याचा धंदा करणाऱ्यांनी पोटासाठी काय करावे ?

मी गंभीर वाङ्मयाकडे केव्हाच वळलो आहे ! (ही धमकी वाचल्यावर आता लोक माझ्या विनोदी वाङ्मयाकडे वळतील. लोकांचे असेच आहे !)

# माझे खाद्यजीवन

## थोडे कडू, थोडे गोड, पण बरेचसे तिखट

*"माणसाचा सारा इतिहास म्हणजे त्याच्या खाण्याचा इतिहास आहे. चराचर सृष्टी ह्याचा अर्थच मुळी कशावर तरी चरणारी सृष्टी असा आहे. आदिमानव मिळेल त्यावर चरला. पुढे तो सुधारला आणि स्वतः चरता चरता दुसऱ्याला चारू लागला. त्यानंतर फारच सुधारला, तेव्हा दुसऱ्याचे चोरून स्वतः चरू लागला. मानवाची सारी वाटचाल स्वतःच्या हाताने चरणे, चारणे, चिरणे आणि चोरणे ह्या चकारी बाराखडीतून होत होत चम्-चःपर्यंत आली आहे."*

(हे वाक्य वस्तुतः माझेच आहे. केवळ त्याचा गंभीर विचार व्हावा, म्हणून अवतरणे टाकली आहेत. कारण नावामागे कै० लागल्याशिवाय चांगल्या वाक्यांनादेखील सुभाषितांचे मोल येत नाही.)

एका जुनाट घरातले स्वैपाकघर आहे. काळोखे. कोनाड्यात रॉकेलची चिमणी भणभणते आहे. एके काळी लाल असलेल्या पाटासमोर पत्रावळ मांडलेली आहे. चुलीवरच्या भाताला भांड्यातल्या भांड्यात गुदगुल्या होत आहेत. पोटात भूक आहे. डोळ्यांत नीज आहे. दारातून वाकून वडील आत येत आहेत. ते काहीतरी गुण-गुणताहेत. पलीकडे झोळण्याच्या पाळण्यात धाकटा भाऊ ट्यँ ट्यँ करून रडणे आणि बोलणे ह्यांच्या सीमारेषेवरचे आवाज काढतो आहे. इतक्यात निखाऱ्यावर टाकलेल्या पापडाचा वास येतो. झोप उडाल्यागत होते. पोटाची मागणी वाढते. "झालं हं—" म्हणून आई तो चिमटीत धरून फूऽफूऽऽ करते. वडील शेजारच्या पाटावर बसतात. इतक्यात कढईच्या पोटात चर्र होते. पळीतून अंबाडीच्या भाजीच्या पोटात शिरलेली लसूण साऱ्या घराचा ताबा घेते. झोप पळते. पोटात रणकंदन सुरू होते. चुलीच्या एका बाजूला भिंतीला पाठ लावून उभ्या असलेल्या भाकरी चतकोरा-चतकोराने पानात

पडतात. "आज काय शिकवलं रे मास्तरांनी ?" ओट्यावर नित्यनेमाने येऊन बसणारे शेजारचे दादा कणखर आवाजात विचारतात. गरम भाकरीच्या तुकड्यात दडलेला आंबाडीच्या भाजीचा खमंग वास घशात अडकतो. माझ्या खाद्य-जीवनातल्या कडू-गोड स्मृतींची आठवण करीत बसलो की हे दृश्य मला सदैव प्रथम दिसते. खाण्याच्या कितीतरी आठवणी आज जिभेवर आहेत! कधी कधी अशा उफाळून येतात. अगदी भलत्या ठिकाणी येतात. एका गरीब कारकुनी घरात वाढलो. घर कसले ? पत्र्याच्या भिंतींचे एक झोपडे. खेड्यातले नव्हे. मुंबईजवळच्याच एका उपनगरातले. त्या वेळी मुंबईला माणसे अशी येऊन झोंबली नव्हती. रविवारी दुपारी इंजिनाच्या झुकझुक गाडीतून कधीमधी वडील मुंबईला घेऊन जात, त्या वेळी स्टेशनात दहा-बारा माणसे असत.

पत्र्याच्या झोपडीतले ते स्वयंपाकघर म्हणजे मध्येच उभा केलेला एक पत्रा. त्याच्या एका बाजूला आमचा हॉल-कम-बेडरूम आणि दुसऱ्या बाजूला स्वयंपाकघर. बाहेर एक ओटी. तिथे एकच आरामखुर्ची असे. आम्ही जेवण झाल्यावर खाली पाय सोडून बसत होतो. वडील आरामखुर्चीवर बसायचे. शेजारी तसलेच एक घर. तिथे 'शेजारचे दादा' राहायचे. ते नेहमी अभ्यास विचारायचे! दादा दुष्ट आहेत, हे माझेच नव्हे, तर दादांच्या मुलाचेही मत होते. कारण त्यालाही ते अभ्यास विचारायचे! पुढे शेजारच्या दादांचा मुलगा पळाला. पण शेजारच्या मामी मात्र भलत्याच चांगल्या होत्या. तिच्या हातच्या सांजोऱ्या खाल्ल्या, तसल्या पुन्हा नाही मिळाल्या. त्यांच्या घरी हळदीचे पान घालून लोणी कढवीत. त्यामुळे त्यांच्या घरी जेवायला गेलो, की मी तूप-भात खूप खाऊन घेत असे. आता शेजारच्या मामी गेल्या, ती पत्र्याची झोपडी गेली. राहिली आहे ती त्या सांजोऱ्यांची आणि तूप-भाताची आठवण! माझ्या खाद्यजीवनातल्या ह्या पहिल्यावहिल्या स्मृती आहेत.

खाण्याच्या बाबतीत माणसे घरचे खाणे आणि बाजारचे खाणे असा एक ढोबळ पंक्तिप्रपंच करतात. खाण्यात घरालाही स्थान आहे आणि बाजारालाही आहे. खाद्य-साधन हे एक प्रकारचे योगसाधन आहे. अनेक इंद्रियांवर विजय मिळवून खावे लागते. त्यांत मुख्य आवरावे लागते ते स्वच्छतेचे इंद्रिय. त्यानंतर आरोग्यविषयक पाणचट कल्पना. आरोग्य ह्याचा अर्थ वाटेल ते, वाटेल तेव्हा, वाटेल त्या ठिकाणचे आणि वाटेल तितके खाण्याची ताकद! खाण्याची साधना जसजशी वाढत जाते, तसतशी खूप खाण्याची प्रवृत्ती कमी होते. शंभर लाडू खाणाऱ्या इसमाला 'खवैय्या' म्हणतात, हे चूक आहे. शंभर गाणी म्हणून दाखविणाऱ्यास 'गवैय्या' म्हणण्याइतके हे चूक आहे! खाण्याच्या पहिल्या उमेदीच्या भरात खूप खात जाण्याकडे प्रवृत्ती असणे हे ठीक आहे. पण त्यानंतर पारख यावी लागते. खरा मत्स्याहारी सरंग्याचा एकच तुकडा किंवा मालवणी परिभाषेत 'कुडकी' सगळ्या जेवणाबरोबर पुरवतो!

भेळ, मिसळ आणि उसळ ह्या 'ळ'-कारान्त चिजांनी जिभेचा चावटपणा खूप वाढवला. इथे 'चावट'पणा हा शब्द गौरवार्थी आहे. कारण चावट हा शब्दच मुळी 'चव' ह्या धातूचे लडिवाळ स्वरूप आहे. चविष्ठ → चविष्ट → चावट्ट आणि चावट!

ह्या शब्दाचा चावण्याशी काही संबंध नाही. बेचव शब्दपंडितांनी तो जोडला आहे. (पाहा : धातुकोश—किंवा खरे म्हणजे कशाला पाहता?)

खाद्यसंस्कृतीत काही उपऱ्या मंडळींचीही भरती आहे. चकली, चिरोटा ह्यांच्या-प्रमाणे 'शंकरपाळे' नामक जो पदार्थ आहे तो ह्यांतला. ह्या पाळ्याचा शंकराशी काय संबंध आहे, देव जाणे! कारण शंकर हा देव हे असले पुळचट खाणाऱ्यांतला वाटत नाही. रुंडमाला धारण करून तांडव करता-करता मधूनच बशीतले शंकरपाळे तो आपल्या तोंडात टाकील, हे पटत नाही.

म्हणजे त्याला गोडाचे वावडे नसावे. कारण भांग जिथे चालते, तिथे मिठाई आलीच! शंकर शेवेचा लाडू खाईल, मिसळ खाईल,—कारण तसा तो शेतकरी-कामकरी पक्षाचा पुढारी आहे. सरळ तर सूत, नाहीतर एकदम तिसरा डोळा उघडून जाळपोळ सुरू. हल्ली सगळी नावे बदलण्याची चळवळ चालू आहे. त्या गडबडीत ह्या शंकरपाळ्याचेसुद्धा साखरपाळे करावे. म्हणजे त्यातल्या त्यात 'सेक्युलर'ही झाले. ह्या अगदीच बिनबूड खाद्याला त्या महादेवाचे नाव देण्याइतका त्याचा अपमान फक्त त्याची मुळमुळीत चित्रे काढणाऱ्या चिताऱ्यानेच केला आहे. अन्य कोणी नाही.

पुराणप्रियता आणि पुरणप्रियता हे महाराष्ट्राचे वैशिष्ट्य आहे. आम्ही नव्याचा स्वीकार सावधपणे करतो. म्हणूनच टिकून आहो. नवेदेखील चांगले वापरून जुने झाल्याखेरीज आम्हांला आवडत नाही. पण जुन्यांतले जुने जर काही टिकून राहणार असेल, तर पुरणपोळी. ज्या घरात वर्षातून एकदा तरी पुरणपोळी म्हणून झाली नाही, ते घर मराठी नव्हे! महाराष्ट्रातल्या चारी वर्णांनी आणि साऱ्या जाती-जमातींनी जर एकमताने मान्य केलेली गोष्ट कुठली असेल, तर पुरणपोळी! हीसुद्धा जसजशी अधिक शिळी होत जाते, तसतशी तिची चव वाढते. ती दुधाबरोबर खावी, तुपाबरोबर खावी किंवा कोरडी खावी. महाराष्ट्राच्या सीमा ठरविताना पुरणपोळीचा निकष वापरायला पाहिजे होता. मात्र हे नाजूक हाताचे काम नव्हे. चांगल्या पुरणपोळीला चांगले तीस-पस्तीस वर्षांचे तव्याचे चटके खाल्लेला हात हवा. म्हणूनच आज्जीने केलेल्या पुरणाच्या पोळीची सर आईच्या हाताला येत नाही; पत्नीच्या तर नाहीच नाही. वडीलधाऱ्यांनी ती करावी आणि लहानांनी खावी! बेळगाव-सीमेवर पुरणाचे कडबू होतात, आणि कारवार-सीमेवर सुकुरउंडे होतात. पण पुरण ही गोष्ट पापडांच्या लाट्यांसारखी नुसतीच खाण्याचा आनंद 'आया' नावाच्या स्त्रिया आपल्याला कधीच लाभू देत नाहीत! "हवे ते, हवे त्या वेळी, आणि हवे तितके खाऊ न देणारी ती आई!" अशी आईची जराशी कठोर (कारण सत्य म्हणून) व्याख्या आहे. ताज्या करकरीत कैऱ्यांचे लोणचे—ती कधीही देणार नाही. बरणीत घालून ते सहा महिने मुरल्यावर मग इच्छा गेली की ते पानावर यायचे! सांडगे वाळण्यापूर्वीची चव वाळून तळल्यावर नसते. पण कोहळ्याचे सांडगे करताना ते पीठ मिळायचे नाही. ओल्या नारळाचे खोबरे किसताना मिळणार नाही. ते गरम पोह्यांवर पडून निष्प्राण झाल्यावर "खा"! गरम भाजलेले शेंगदाणे हाती येणे कठीण. ते कुटून साबुदाण्याच्या खिचडीत बेपत्ता झाले

की "गिळा"! स्वयंपाकघर नावाच्या खोलीत बायका शिरल्या की त्यांना तिथे चार पोरांना जमू द्यायचे नाही, हे एकशे-चव्वेचाळीस कलम जारी करावेसे का वाटते, कोण जाणे. शिजत येणाऱ्या स्वैपाकाचा सुगंध स्वैपाकघराच्या उंबरठ्यावर शांतपणे बसून घेण्यातला आनंद बायकांना कळणार नाही.

आणि म्हणूनच जिथे हवे ते मिळते तिथे पुरुष जातात! चवीने खाण्याचा स्त्रीवर्गाला षोक कमी. त्यांची मजल फार तर आइस्क्रीमपर्यंत जाते. बायका स्वयंपाका-विषयी बोलतात, पण खाण्याविषयी बोलत नाहीत. 'बोलेल तो करेल काय?'–प्रमाणे. 'करील तो खाईल काय?' हेच खरे! हॉटेलात स्वैपाकाचे खाते पुरुषांकडे असते. त्यामुळे तिथे कोणाला काय हवे ते नेमके कळते! कदाचित खाणे ह्या गोष्टीची बाय-कांच्या बाबतीत अतिपरिचयामुळे अवज्ञा होत असावी. कारण शेतकरी हुरडापार्टीला उत्सुक नसतो. मक्याची कणसे भाजून ती भुकेला खातो.

भुकेचे खाणे हे खाणेच नव्हे! तिथे खाण्याला कलेचा दर्जा येत नाही. कलेला गरज मानवत नाही. फुफ्फुसांना व्यायाम म्हणून कोणी गाईल, तर तो गवैय्या नव्हे, आणि आरोग्याला चांगले म्हणून खाईल, तो खवैय्या नव्हे! मथुराभुवनातली जिलबी आणि गाठ्या ह्या दुर्दैवाने पैलवानी आरोग्यात जमा झाल्या. लग्नातल्या जिलब्यांना तर अर्थच नाही. फार काय, लग्नातले जेवण हे जेवणच नव्हे! तिथे ते भुकेचेही खाणे नव्हे, आणि षोकाचे तर नव्हेच नव्हे. ज्या पुण्याची 'लग्न' ह्या उद्योगधंद्याबद्दल उगीचच ख्याती आहे, तिथल्या पंगतीतल्या जेवणाइतकी तर जेवण ह्या संस्कृतीची इतर कोणीही अवहेलना केली नसेल. एक तर 'पत्रावळ' हा प्रकार गळ्यात काड्या अडकवणारा. त्यातून महत्त्वाच्या जागी उसवणे हे पत्रावळीने तुमानीकडून शिकून घेतले असावे. चुकून एखादी भाजी आवडलीच, तर ती जिथे वाढली जाते तिथेच नेमकी पत्रावळ आ वासते! असल्या त्या पत्रावळीत—मिठात ओघळलेले लोणचे, कोशिंबीर ह्या नावाखाली केलेला टोमॅटो आणि शेंगदाण्याचा सत्यानाश, त्यात घुस-णारे जळकट खोबऱ्याचे तुकडे टाकलेले पंचामृत, त्याच्या बाजूला मठ्याच्या द्रोणाला टेकण ह्याहून अन्य कार्य न साधणारा तो वांग्याची भाजी नामक चिखल, ह्या सर्व पदार्थांना पानशेतच्या लोंढ्यासारखा वाहून नेणारा अळवाच्या फतफत्याचा लोंढा, गारगोट्या भाताची उदबत्त्या लावायच्या सोंगटीएवढी मूद, तिच्यावर डाळीपासून फटकून निघालेले वरण आणि त्या मुदीची गोळी पोटात जाईपर्यंत तिथे येऊन कोसळ-णारा मसालेभात नावाचा भयाण ढीग! एवढ्याने संपले नाही, म्हणून नुसतेच तळून काढलेले भज्यांचे पीठ आणि मग 'जिलेबीचे जेवण' ह्या मथळ्याला शोभ-णारा मजकूर नसला तरी ठसठशीत मथळा हवा, म्हणून पडणारी ती अंगठ्याएवढ्या जाड वळणाची जिलबी! एवढ्याने संपत नाही. मग 'मठ्ठा, मठ्ठा' असा आरडाओरडा होतो, आणि त्या लवंड्या किंवा बिनलवंड्या द्रोणात कोथिंबिरीच्या देठासकट पाचोळा घातलेले आंबूस पाणी ओतले जाते! कोंड्याचा मांडा करून खावे हे खरे, पण उगीचच उंदराला ऐरावत म्हणून कसे चालेल? ज्याला 'ताक' म्हणणे गळ्याशी

येते, त्याला 'मठ्ठा' कसे म्हणावे! आणि असल्या भोजनाला अमका बेत होता, तमका बेत होता, म्हणून वाखाणायचे! प्राणाखेरीज इतर कशाशीही न बेतणारा हा बेत 'पेशवाई थाट' वगैरे शब्दांनी गौरविला जातो.

बाकी ताटपाट, रांगोळ्या न् उदबत्त्या ह्या थाटातल्या खाणाऱ्यांनी आपला एक पक्ष बनविला आहे. पक्षनिष्ठा ही खऱ्या खाणाऱ्यांना रुचत नाही. हा एकांड्या शिलेदाराचा रस्ता आहे. आपला मेळवाला भय्या आपणच शोधून काढावा लागतो. एके ठिकाणची कांदाभजी संपविल्यावर बटाटवड्यासाठी प्रसंगी पायपीट करावी लागते. देशीविदेशी भेद मानून चालत नाही. गुडमनचा चहा (युद्धपूर्व) घेण्यापूर्वी कयानीकडील किंवा बस्तानीकडील पॅटिस संपवून यावे लागते. खाऱ्या बिस्किटाला डरायसच हवा. आणि चहा आणि मस्कासिलेस (ह्याला लोक चुकून 'स्लाइस' म्हणतात.) अलाइसचा. मात्र युद्धापूर्वीचा इराणी गेला! दुधाचीसुद्धा जेव्हा भुकटी झाली, त्या वेळी इराण्याचा अवतार संपला. आता उरला आहे तो नावाचा इराणी! मावानी केक आता पहिली उरली असेलच का? इकडे कोरोनेशन मात्र आपला दरबार सांभाळून आहे. तरीदेखील अलीकडे चवीपेक्षा स्वच्छतेकडचे लक्ष वाढले आहे. पण अजूनही मुर्गी तिथे 'गल'ते, तशी अन्यत्र नाही. बाकीच्या मोगलाई मुर्ग्यांनी पंजाबी शलवार-कमीज चढवली. अस्सल मऱ्हाटी कोंबडी हवी असेल, तर पिकेट रोडवर जावे लागेल. पिकेट रोड हा कोंबडी, मारुती आणि वकील ह्यांच्यासाठी प्रसिद्ध आहे. झुंजणे हा तिघांचाही स्थायिभाव तिथे अचानक एकवटला आहे. नवशिके वकील अशिलाच्या माना मुरगाळायला तिथल्या मटण प्लेट हाऊसवाल्याकडून शिकत असावेत. पण ही कोंबडी पोटात घर करते! इथला 'भेजा फ्राय'देखील दाद घेऊन जातो!

कोटात फार प्रचंड हॉटेले आहेत. तिथे फक्त खायला तेवढे मिळत नाही. बाकी सारे असते. ते जेवण त्याला पडलेल्या बिलामुळे स्मरणात राहते! तिथे रात्री तर कधीच जेवू नये. कानाशी ब्यांड ठणठणत असतो. अंगाच्या दांडीवर कपडा वाळत टाकलेली एखादी गौरांगी पाणी चढवलेले सोनेरी केस कुरवाळीत उघड्या गळ्यापेक्षा गळ्याखालचा भाग उघडा ठेवून मायक्रोफोनमध्ये गुणगुणत असते. आणि मुख्य म्हणजे ताटात काय वाढून आले आहे तेदेखील दिसत नाही, इतका अंधार केलेला असतो. इथले दिवे उजेड करण्यासाठी नसून अंधार करण्यासाठी असतात. आणि जेवण झाल्यावर आयुष्यभर त्यातले फक्त बिल लक्षात राहते. असल्या तथाकथित बादशाही हॉटेलात खऱ्या अर्थाने जेवायला जायचे नसते. आपली आर्थिक भरभराट सिद्ध करण्याची ही स्थाने आहेत. ह्या जेवणाबद्दल पुढले दोन-तीन दिवस 'सहज म्हणून' चार ठिकाणी बोलायचे असते. विशेषतः, नवश्रीमंत स्त्रियांना हॉटेल आणि हिल स्टेशन हे दोन विषय दुपारच्या चहाबरोबर चांगले पुरतात.

"ताजमधला कोल्ड ब्यूफे फार..."

"अलीकडे ॲम्बेसेडरमध्ये..."

"मिराबेलमधलं..."

"ग्रीन्सच्या लंचला..."

ही वाक्ये पुरी झाली काय, न झाली काय, त्यांतल्या खाद्यांच्या नावांपेक्षा हॉटेलांची नावे महत्त्वाची! त्यातून त्या नवश्रीमंत वर्गातली मंडळी नवमांसाहारी असली, तर आणखीनच इज्जत बढते.

आपण "खातो" हे सांगण्याचीही एक नवी ऐट आहे. जन्मजात 'खाणारा' आपण कधी मासा खाल्ला किंवा मटण खाल्लं, हे मुद्दाम म्हणून बोलणार नाही. "आज काय मिळालं होतं हो?" ह्या प्रश्नाचे उत्तर बांगडा, कर्ली, पापलेट, कुर्ल्या किंवा जैतापूरची कालवे ह्यांपैकी कुठल्यातरी अर्थाचे हवे असते. त्यामुळे "आम्ही आज फिश खाल्लं," म्हणणारी मंडळी ही होतकरू आहेत, हे समजावे! "आम्ही नॉन्‌व्हेज खातो बुवा!" हे एक असेच बावळट वाक्य. संगीताच्या जाणकारांत कुणीही आपल्याला मालकंस फार आवडतो किंवा दुसरा अमका-एक राग आवडतो असले विधान कधीच करीत नाही. त्याप्रमाणे खाणाऱ्यांच्या दुनियेत आपल्याला पापलेट फार आवडते, किंवा सरंगा फार आवडतो, असले विधान ऐकू येणार नाही. एखादा जाणकार मालकंसांतल्या अमक्या-अमक्या चिजेची बंदीश मस्त आहे म्हणेल, तसा जातिवंत खाणारा पेडव्याचे किंवा कुर्ल्यांचे 'धबधबीत' (उच्चारात ह्या शब्दातला शेवटला 'त' लुप्त आहे.) नाहीतर कोलंबीचे 'भुजणे' अगर शेवट्याचे 'हुमण' स्वतःला फार आवडत असल्याची कबुली देईल. नुसते मटण ह्याला अर्थ नाही. मटणाचा रस्सा की सुके, हे महत्त्वाचे. त्यामुळे अलीकडे साहित्यातली काही कोंडीफोड्या मंडळी आपली अत्याधुनिकता दाखविण्यासाठी आपल्या लेखनात अधून-मधून उगीचच मासे-मटण पेरतात. पण हा झरा मूळचा नाही हे ओळखायला वेळ लागत नाही. मागे एकदा एका मराठी कादंबरीकाराने आपल्या नायकाला ताजमहाल हॉटेलात (जिथे ते सांद्र-मंदिर पाश्चात्त्य संगीत असते) जेवायला धाडला आणि त्याचा नायक तिथे जेवता जेवता अधूनमधून सूप भुरकीत होता! हाय कंबख्त! तूने सूप-देखील पीही नही! मोठ्या हॉटेलांत हल्ली पिण्याच्या लायकीची फक्त सूप ही गोष्ट राहिली आहे. आपल्या देशात दुर्दैवाने 'सूप' ही संस्कृतीच नाही. एके काळी असली पाहिजे. एवढेच नव्हे, तर युरोपातील प्रत्येक चांगली गोष्ट ज्याप्रमाणे त्यांनी आमच्याचकडून उचलली असे चांगल्या चांगल्या विद्वानांचे मत आहे, त्याप्रमाणे हे 'सूप'देखील त्या लोकांनी आमच्याचकडून चोरले, आणि आमच्या चांगल्या गोष्टी पाहायला आम्हांला आता तिथे जावे लागते तसे चांगले सूप प्यायलादेखील आता युरोपात जावे लागते! एरवी, आपल्या भोजनविद्येला 'सूपशास्त्र' कशाला म्हटले असते? ज्यात सूप अजिबात नाही ते सूपशास्त्र होईलच कसे? मात्र युरोपने सुपाची कितीही ऐट केली, तरी 'सूप' करावे चिन्यांनीच. सध्या चिनी मंडळी आपल्याकडे जरा तिरक्या डोळ्यांनी पाहू लागली असली, आणि 'हिंदी-चिनी भाऊ-भाऊ' हे राहिले नसले, तरी 'हिंदी-चिनी भोजनभाऊ' हे मान्य करावे! ह्या बड्या

हॉटेलांतील सूपमध्ये मलगटानी ह्या सिंधी आडनावासारखे जे सूप येते ते डाळीच्या आमटीसारखे असते. तेदेखील इतालियन आहे म्हणून सांगण्यात येते. परंतु त्या सुपाचा शोध कोण्या सिंध्यानेच लावला असावा. कारण सुरुवातीचा 'मल' (पाहा : आसूमल.) आणि अखेर 'आनी' सिंधीच आहे. 'आनि–मल'चा पुरावा असताना तो सिंधी नाही, हे कसे शक्य आहे?

माझ्या खाद्यजीवनात मी उत्कृष्ट म्हणवणाऱ्या हॉटेलांना निकृष्ट स्थान दिले आहे. तिथे पार्टी देता येते, चवीने खाता येत नाही. ज्या पंगतीत "अरे, जरा मसालेभात फिरवा—", "वाढ–वाढ, मी सांगतो, वाढ जिलबी—" असल्या आरोळ्या उठत नाहीत ती काय पंगत आहे? पंगत ही तीतल्या आरड्याओरड्याने रंगत असते, पानातल्या पदार्थांनी नव्हे! हल्ली हॉटेलांना नंबर दिले आहेत. हे नंबर तिथल्या चवींच्या गुणानुक्रमाने दिले नसून टेबलावरच्या चादरी, काटे-चमचे, वेटरचा गंभीरपणा, मॅनेजरचा सूट, आतली कृत्रिम थंडी आणि अनेक दिवे लावून केलेला अंधार ह्या कारणांनी दिले आहेत. खाणाऱ्याने सावध राहावे! आपल्याला आरोग्यापेक्षाही खिसा-पाकीट सांभाळायचे आहे. टेबलावरच्या त्या चकचकीत सुऱ्यांनी लोणी कापले जात नाही, पण खिसे मात्र सफाई कापले जातात. खरी हॉटेले म्हणजे जिथे माणसे, माश्या, आणि "पोऱ्या, फडका मार" ही आरोळी सुखाने एकत्र नांदतात, ती! विशेषतः, "पोऱ्या, फडका मार" आणि "दोनिस्संव" ह्यांपैकी पहिल्याचा खर्ज आणि दुसऱ्याचे तारसप्तक एक हार्मनी साधून जाते, ते हॉटेल! तिथला बटाटवडा नुसती जीभ, झणझणणारे कान आणि डोळेच काय, पंचेंद्रियांची खबर घेऊन जातो. इथल्या वेटरला टिप दिली, तर त्याला गिऱ्हाईक खुळे वाटते. त्या मोठ्या हॉटेलांतून वेटरला केवळ टिप घेण्यासाठी नेमलेले असते. त्यातून आपण देशी भाषांतून बोलणारे असलो, की खेळ खलास! ही असली मोठी हॉटेले किंवा खानावळी ह्या जेवणाच्या जागाच नव्हेत. मोठ्या हॉटेलांत फॅशन म्हणून आणि खाणावळींत अविवाहित, किंवा कुटुंब माहेरी, म्हणून जायचे असते. विशेषतः, 'अमुक भोजनालय, तमुक विहार' वगैरे नावांच्या खाणावळींना तर अर्थच नाही. हे म्हणजे माणसांचे पेट्रोलपंप! टाकीत एक लिटर पेट्रोल टाकल्यासारखी ही जेवणे! मग ती राइस प्लेट असो, नाहीतर 'भरपेट' असो. उदरभरण म्हणजे भोजन नव्हे. ह्या खाणावळींना अपवाद म्हणजे आत्मारामाची, राजारामाची, गंगारामाची, भागवताची, निमकराची, अशी ज्या कोणी स्वतः स्वैपाकाची साधना केली आहे, त्यांनी चालविलेल्या खाणावळी. ह्या परंपरेची स्फूर्तिदेवता सखूबाई. (ईश्वर मृतात्म्यास शांती देवो!) तिथे आस्था आली. दाजी रेग्याला गाब्रोळी आवडते आणि अंता नेरुरकराला सोलाच्या कढीत मिठाची एक कणी जास्त लागते, हे इथे स्मरले जाते. गुळवणी-मास्तरांना भाताची खरपुडी काढून ठेवण्यात येते. आणि ग्यासिसचा त्रास सुरू झाल्यापासून अप्पा जोश्यासाठी ताकाच्या वाटीत हिंगाची चिमूट पडते. पण इथल्या पदार्थांना आवर्जून जाऊन खावेत असे गुण नाहीत. तिथे घरच्यासारखे वाटते ते

जेवणाच्या चवीमुळे नव्हे, तर आत्मारामबापू किंवा निमकरकाकाच्या आपुलकीमुळे. असल्या खाणावळींतले जेवण तिथल्या चविष्ट गप्पांनी रंगते. कारण मालकांना अनेक गोष्टींत मत असते. गम्य असण्याचा संबंध नाही. कधी-काळी तिथे केशवराव भोसले जेवून गेल्यामुळे "तसा गवयी झाला नाही, आणि होणार नाही," हे त्यांचे मत माणसे खालच्या मानेने ऐकतात. शिवाय "उधारी बंद आहे" ही पाटी फक्त भिंतीची शोभा वाढवण्यासाठी असते!

कधी-कधी कुठल्या तरी कोपऱ्यात पडलेली हॉटेले भलताच धक्का देऊन जातात! मुगभाटात एके काळी चंपाचे हॉटेल होते. (चंपा हे पुरुषाचे नाव आहे, हा खुलासा प्रथम करावा, हे बरे!) तिथल्यासारखी पिवळी बटर-बिस्किटे जगात मिळत नसावीत. रॉकेलच्या डब्यांतून भरलेली ही बिस्किटे माझ्या लहानपणी रुपया शेकडा होती. हे बिस्कीट चहाच्या कपात असे काही फुगून येत असे की, हंटलेपामरने चंपाच्या पायाशी बसून ते शिकावे! भिस्कुटाची चव बिस्किटांना आली नाही. सुरती बटरचे नाव झाले, पण बटर-बिस्किटे सावंतवाडीची. तिथल्या लाकडी खेळण्यांहूनही चांगली.

परमेश्वरकृपेला पूर्वसंचिताची जोड मिळाल्यामुळे माझा जन्म एका मत्स्याहारी कुटुंबात झाला! आमच्या घरात परमेश्वराच्या ह्या प्रथमावताराचे मोठ्या प्रेमाने भजन-पूजन-सेवन व्हायचे. मला गुलाबांच्या फुलाला काटे असतात हे कळण्यापूर्वी करलीतले काटे कसे पचवावे ते कळायला लागले. पोटात काटे भरून तृप्तीचा ढेकर देणारे आम्ही मत्स्याहारीच! माझ्या एका मत्स्यगोत्री कविमित्राची तर अंतिम इच्छा, आपली समाधी समुद्रात बांधावी, अशी आहे. 'ज्या माशांच्यावर मी आजन्म जगलो, त्यांनी निदान एक दिवस तरी माझ्यावर जगावे!' हे त्याने मला एकदा काटे चुकवीत बांगडा खाताना ऐकवले होते. मी मात्र असा पक्षपाती राहिलो नाही. माझ्या देहावर साऱ्या चराचर सृष्टीचा अधिकार आहे. कारण मी ह्या सर्वांभूती खाद्य पाहिले!

मी शाकाहाराचा भोक्ता आहे, तसाच स्वाहाकाराचा! मला तळलेले निषिद्ध नाही, पोळलेले नाही. लाटलेले (दुसऱ्याचे नव्हे, पोळपाटावर) नाही, वाटलेले नाही. ऊन-ऊन भात, वरण, लिंबू, वांग्याचे भरीत, बाजरीची भाकरी, चटणी, चांगले ताक हा मेनू मला जितका प्रिय, तितकीच 'तिरफळ' घालून केलेली बांगड्याची लाल भडक आमटी, भात आणि खोबरेल तेलाचे बोट लावलेला पापड, सोलाची कढी! मात्र दुसऱ्या मेनूनंतर नुकत्याच फोडलेल्या नारळाची कातळी हवी, आणि पहिल्या मेनूनंतर पान हवे. भारतीय संस्कृतीबद्दलचा माझा आदर दर सणामागल्या पक्वान्नातून (ताटाबाहेर) सांडतो. होळीच्या पोळींची चव रामनवमीला नाही. रामनवमीचा सुंठवडा कृष्णजन्माला पटत नाही. बुंदीचा लाडू दिवाळीला चालतो, तसा दसऱ्याला चालवून पाहावा! आणि भुसभुशीत मोतीचूर बुंदीच्या लाडवावर माझी श्रद्धा नाही. मुग-दळाच्या आणि बुंदीच्या लाडवांनी दातांची खोलवर चौकशी केली पाहिजे. अनारशावर आणि चिरोट्यावर मात्र माझी अजिबात भक्ती नाही. अनारशाला काही 'कॅरेक्टर'च नाही. अनारशामागे कोणतीच संस्कृती उभी नाही. आणि चिरोटा? कुण्या पुस्तकी

सुगरिणीचा घरी करायला घेतलेल्या खाऱ्या बिस्किटांचा साचा मीठ घालायला विसरून बिघडला, आणि ते पीठ थापून त्याच्यावर साखरपेरणीची मखलाशी करून बिस्किटा-ऐवजी चिरोटा म्हणून तिने नवऱ्याला बनवले.

खाद्यांचेदेखील एक खानदान आहे. ह्या खानदानाचा ते पदार्थ तिखट-गोड किंवा आंबट-तुरट असण्याशी काही संबंध नाही. चकलीला खानदान नाही. ती उपरी आहे. तिच्याभोवती वातावरण नाही. ती खुसखुशीत असो, अरळ झालेली असो, पण तिला आपला असा स्वभाव नाही. नुसतीच तुकडेमोड आहे. पण कडबोळ्याला मात्र कूळ आहे. उद्या पदार्थांच्या जातीच करायच्या ठरविल्या, तर कडबोळे हे देशस्थ वैष्णव कुळीचे, कानडी उच्चाराने मराठी बोलणारे आहे, म्हणावे लागेल, तर चकली आंतर-जातीय विवाहातून जन्मलेले अपत्य आहे. कारवारकडे कडबोळ्याचेच दोन वळसे कमी करून मुदी करतात. कारवारीत मुदी म्हणजे अंगठी. चकली भानगडगल्लीतली, तसा चिवडाही. पण चिवड्यात अठरापगड गोष्टी असून त्याच्या भोवती मित्रमंडळीच्या अड्ड्याचे कुंपण आहे. मात्र चिवडा हा एकट्याने खाण्याचा पदार्थ नव्हे. चिवड्याची चव खाणाऱ्यांच्या संख्येने गुणले असता वाढते! पण चिवड्यातला अत्यंत चविष्ट भाग तळाशी उरलेले तिखट-मीठ इतरांची नजर चुकवून तर्जनीने चेपून ती जिभेवर दाबल्यावर कळतो. ह्याला धैर्य लागते! चिवड्याचे मूळ स्वरूप म्हणजे भत्ता. ह्याला मजूर-चळवळीच्या प्रथम चरणात 'लेनिन मिक्श्चर' म्हणत असत. म्हणजे भोवती मार्क्सवादी गप्पा सुरू झाल्या की भत्त्याचे लेनिन मिक्श्चर होत असे! कुरमुरे, डाळ, दाणे, कांदा, बारीक शेव, कोथिंबीर, मिरच्या आणि उघड्यावर गप्पा! चारचौघांत जो ओतला की "अरे बाप रे! एवढं हे कोण संपवणार?" असा सार्वजनिक उद्गार निघून ज्याचा शेवट रिकाम्या कागदाखाली पडलेला शेंगदाणा हळूच उचलून तोंडात टाकण्यावर होतो, तो खरा भत्ता!

जगातली उत्तम सुखे फुकटात मिळतात, हे सूत्र जातीच्या खाणाऱ्यांनाच कळावे! उकडलेल्या गावरान शेंगा हे याचे उत्कृष्ट उदाहरण. कॉलेजात पत्त्यांचा अड्डा बसला की क्लबात मणभर शेंगा आणून उकडत लावलेल्या असायच्या. भोवतालच्या बघ्यांकडे क्लबातून आळीपाळीने त्या शेंगा उपसून आणण्याचे काम असे. पण शेंग खावी फक्त गावरान! मी खुद्द जपानात जाऊन जपानी शेंगा खाल्ल्या. त्या शेंगा एखाद्या गोऱ्यापान पण फोफशा बाईसारख्या. त्यांना 'तें' म्हणतात, ते आकर्षण नाही. गावरान शेंगेच्या चवीला माळावरच्या शिडशिडीत पण जवानीच्या तेजात तळपणाऱ्या काळ्यासावळ्या गोफणवालीचे 'इट्ट' आहे! पहिल्या चार शेंगांत तोंड खवळते. मन म्हणत असते, आता पुरे! नको त्या दिशेला पाहू! पण इथे मनावर जीभ पट्टा फिरवून जाते. आपण शेंगा खातो, तसे चिनी लोक खारवलेल्या कलिंगडाच्या बिया दातांतल्या दातांत उघडून खातात आणि पुटक्कन् फोल्पटे टाकतात. मी दोन-तीन बियांत जीभ चावली! शेंगा उकडता उकडता त्या मातीच्या पाण्याशी आणि मिठाशी मुरतात. मग सालीवरची माती, मीठ, ती साल आणि आतला दाणा यांचा असा काही चवदार मेळ बसतो की ती

भुईमुगाची शेंग भुई आणि मूग ह्यांचे अद्वैत होऊन पोटी जाते! शेंगा दुपारी उकडत लावाव्या आणि उकडल्यावर तशाच ठेवून संध्याकाळी खाव्या. पूर्वी मुंबईला सिनेमात 'खारी सेंग' मिळे. आता त्याची जागा वेफर्सनी आणि पॉप कॉर्न नामक लाहीने घेतली. एका जुन्या पैशात—हातभर उंचीच्या त्या तिकोणी नळकांड्यात बारा ते चौदा 'खाऱ्या शेंगा' भरणारी कसबी मंडळी गेली कुठे? बाकी भाजलेल्या शेंगा ह्या नेहमी दुःखान्त शेवट करून जातात. शेवटली शेंग ही नेहमी थूः थूः करायला लावते. चिवड्यात सालांसकट शेंगदाणे टाकल्यावर पिवळ्या चिवड्यात जी दाण्यांच्या लाल सालीची आणि किंचित तळून पोपटी केलेल्या मिरचीची रंगसंगती जमते, ती मजा शेंगदाणे सोलून पडले की जाते. सोलून केलेल्या भाजल्या शेंगदाण्याचा चैनीच्या खाण्याशी संबंध नाही, उपाशी खाण्याशी आहे! शेंगदाणा कुटून फक्त त्याची चटणी चांगली होते. आणि हे कूट फक्त सोलापूरच्याच लोकांना जमते, असे माझे ठाम मत आहे. शेंगदाण्याची चटणी महाराष्ट्रात सर्वत्र होते, पण तिला स्फोटक चव फक्त सोलापुरीच! सोलापुरी चिवडा ही मात्र एक निव्वळ जाहिरातबाजी आहे.

चिवडा सोलापूरपेक्षा कोल्हापूरचा! छत्रे यांचा! महाराष्ट्रावर ह्या तीन छत्र्यांचे अनंत उपकार आहेत. एक चिवडेवाले, दुसरे सर्कसवाले आणि तिसरे केरूनाना गणिती. उपकार उतरत्या श्रेणीने घ्यावे! कारण चिवडेवाल्या छत्र्यांनी कोल्हापूरच्या 'रम'ला जी झणझणीत साथ दिली, ती असंख्य उघडे शेमले आणि काही चोरट्या झिरमिळ्या अस्मानात पोहोचवून आली. सर्कसवाल्या छत्र्यांनी वाघसिंह संभाळले, यापेक्षा रहिमतखाँसारख्या भूगंधर्वाला पाळले, हे त्यांचे खरे उपकार. शेवटले गणिती असल्यामुळे त्यांना माझा केवळ अज्ञानापोटी आलेला नम्र प्रणाम!

बाकी शेंगदाणा ही वस्तू मात्र केवळ दुय्यम भूमिका करणाऱ्या नटासारखी नाही. 'गुडदाणी'त तिला स्वतंत्र अस्तित्व आहे. गुडदाणी हे पुण्याचे वैशिष्ट्य आहे. विशेषतः राजगिऱ्याची चिक्की आणि गुडदाणी ही बाहुलीच्या हौदापुढे ग्लोब सिनेमा-जवळ, रात्रीचा शो सुटल्यावर, पेट्रोमॅक्सची बत्ती पेटवून लखलखाट केलेल्या हातगाडी-वाल्याकडून घ्यायला हवी. हा प्रकार दिवसाउजेडी खाण्याचा नव्हे! (आणि तो प्रदेशही दिवसाउजेडी जाण्याचा नव्हे!) मुंबईत चिक्की विकतात, पण ती खरी नव्हे. आणि लोणावळ्याची चिक्की ही तर केवळ कागदी करामत आहे. ती घेतल्याचा आनंद ती रंगीबेरंगी कागदी पुडी सोडल्यावर लगेच मावळतो. शिवाय, पिस्त्याची चिक्की, काजूची चिक्की हा चिक्कीचा अपमान आहे. चिक्कीत जाऊन बसणे हे मुळी पिस्त्याचे आणि काजूचे कामच नव्हे. हे म्हणजे नेहमी जार्जेटात वावरणाऱ्या सिनेमा-नटीने ग्रामीण पिक्चरमध्ये नऊवारी लुगड्यातून आणि कुंकवाच्या आडव्या चिरीतून पाटलाच्या पोरीची उसनी लाज मागून आणण्यापैकी आहे. नदीकाठी गुढघाभर पाण्यात कळशी बुडवताना ती वाकली की चटकन केसांच्या कृत्रिम लटा आणि जाणूनबुजून ढळवलेल्या पदरामागली कृत्रिम शोभा दाखवून जाते. चिक्की हे गावरान काम आहे! चिक्की आणि शेवेचा लाडू प्याकबंद संस्कृतीत बसत नाही. चिक्की हे ज्यन्तेचं खाणं

आहे! तिचे पिस्त्याशी आणि काजूशी सूत जमत नाही. पिस्ता हा स्वागतसमितीचा दिखाऊ सदस्य; शेंगदाणा मांडवात राबणारा स्वयंसेवक! काजू मात्र वरच्या आणि मध्यम वर्गातला. तो जरासा बदामाच्या कुळातला. म्हटले तर सात्त्विक, म्हटले तर झक्की! मटणात बदाम चालतो, काजू नाही. दुधात बदाम चालतो, काजू नाही. काजूचा लाडू ही मात्र खरी मालवणी करामत. देशावर ज्योतिबाच्या जत्रेत शेवेचा लाडू खावा आणि कोकणातल्या उत्सवाला साखरेतला काजू आणि खाजे खावे. कोकणात मात्र शेंगदाणा हा उपासालाच! त्याला स्वतंत्र स्थान अजिबात नाही. हिंदीत शेंगदाण्याला 'चीनी बादाम' म्हणतात. शेंगदाण्याचा संपूर्ण अधःपात पाह्यचा असेल तर टोमॅटोच्या कोशिंबिरीत! देशी शेंगदाण्याचे कूट आणि विदेशी टोमॅटोचा रक्तपात मिसळून ही कोशिंबीर होते. हीत टोमॅटो मरतो, आणि शेंगदाणा निष्कारण कुटला जातो! शेंगदाण्याचे खरे व्यक्तिमत्त्व चिवड्यात उजळून येते. पण कौशल्य योग्य योजनेत आहे. बाकी ह्या बिचाऱ्याच्या नशिबी गुण असून एकट्याने मानाने जगणे कमी. कधी गुळाशी सोयरीक, तर कधी तिखटाशी सलगी. कधी चिवड्याचा आप्त म्हणून, तर कधी अळवाच्या फतफत्यात. हा कुणा ना कुणाचा पाठीराखा म्हणून येतो. भाजलेले शेंगदाणे बशीत घालून खात खात वर्तमानपत्री लिखाण चांगले जमते, म्हणतात! काजू, बदाम वगैरे मंडळी स्वतःचे अस्तित्व टिकवून असतात. इतरांशी मिसळत नाहीत असे नाही, पण आपली मिजास ठेवून. विशेषतः, एखादा बदाम आपली कडवट स्मृती कायमची ठेवून जातो! त्यातून शिरा, आटीव दूध, खडी, हलवा वगैरे वरच्या वर्गात याचे बसणे-उठणे. तसा बदाम हा मुळात शाकाहारी खानदानाशी संगनमत करणारा. वृत्तीने सात्त्विक. काजू जरा तामसी. कारण घराणे दारू गाळणाऱ्यांचे; त्यामुळे अधिक विषयासक्त! तरीही मुगाच्या आमटीत भाव खाऊन जातो. काजूची उसळ नावाचा प्रकार मात्र अगदीच येडपट. अस्सल गझल-कवाली-वाल्याला 'धाव रे रामराया' म्हणायला लावावे, तशापैकी! उसळ ही वाल, हरभरे, मटकी, मटार आणि कुळीथ ह्यांचीच.

सुक्या फळांची सगळ्यात गरीब जात शेंगदाणा, आणि अतिमिजाशी अवलाद म्हणजे पिस्ता! ह्याच्या नावातच पेशावरी सुरम्याची ऐट आहे. ह्याची नुसती हिरवी पखरण भाव खाऊन जाते. मात्र मुसलमानी संस्कृतीत हा अधिक रमतो. तिकडलाच आहे तो. आता श्रीखंड-बासुंदीवर त्याला पसरतात, पण ते त्याचे काम नव्हे. पिस्त्याची पखरण पाहावी इराणी फिरनीवर. त्या मुलायम साटिणी पिवळ्याशी ह्याची हिरवी ऐट अशी उठून दिसते की पिवळ्या जर्द शलवार-कमीजवर हिरवी रेशमी ओढणी घेऊन पहुडलेल्या काबूलकन्येची ते दृश्य पाहताना कधी कधी याद यावी! हा गुलाबकळीच्या पाकळीची झाक घेऊन मिरवतो. पिस्ता हा मोठा इब्लिस आशिक आहे! पण मराठी प्रांतात हा पाहुणा. एकतर महागडा, आणि दुसरे म्हणजे आपल्या पदार्थांशी कुठे जमवून घेत नाही. काजू मसाल्याच्या वांग्यातसुद्धा बसतो. पिस्त्याला टाकायचा कुठे? तसा बदामदेखील आपला आपण जमवून घेतलाय म्हणून. पण हेही

उत्तरेकडचेच. खानदान इस्लामीच. कधी वाटीत पडलेच भिजत, तर त्यांचा शेवट सत्यनारायणाच्या शिऱ्यात व्हायचा. (हा शिरा सत्यनारायण होऊन गेल्यावर दुसऱ्या दिवशी अधिक चांगला लागतो. पहिल्या दिवशी नुसताच प्रसाद असतो. पण दुसऱ्या दिवशी आतले केळे अधिक पिकून मुरले, की त्यातले सोवळे प्रसादपण जाऊन तो माणसांत येतो!)

पिस्ता-बदाम ह्यांच्याच घरातला जरदाळू. हा लेकाचा सदैव उधारीत व्यापार केलेल्या बनियाच्या चेहऱ्याचा! वास्तविक ह्याचे तरुण रुपडे इतके आकर्षक आहे की सुकल्यावर "त्याच देहाचं का हे वार्धक्य?" असा प्रश्न पडतो. सर्व गुण असून एखाद्याला नशीब नसावे, तसे ह्या जर्दाळूचे आहे! हा पिवळा म्हणून जर्द, आणि 'आलू' हे नाव उत्तरेत कुठल्याही फळाला मिळते. पण मराठी जर्दाळू म्हटले की कमनशिबी असा अर्थ असावासे वाटते. वास्तविक हा गोड. तसा ह्याला स्वाद आहे. आतल्या बीमध्ये बदामाहून स्वादिष्ट गीर असतो. पण ह्या फळाचा काही जम बसला नाही. हौसेने कोणी जर्दाळू घेऊन खाल्ल्याचे मला स्मरत नाही. त्या मानाने सुका अंजीर म्हातारपणीदेखील रुबाबात असतो. ताज्या केळ्याची कांती नसली, तरी सुकेळे काही गरीब वाटत नाही. (हे खाण्यापेक्षा मला केळीच्या सोपातले ह्याचे प्याकिंगच अधिक आवडते!) ह्या सुक्या मेव्यात लोक 'चिलगोजा' का कुरतडत बसतात, कोण जाणे! हा एक अत्यंत तापदायक प्रकार आहे. ज्या सुक्या मेव्याने यत्किंचितही सुखवले नाही, असा हा चिलगोजा. आक्रोड फोडायला मात्र वेळच्या वेळी काही हाती लागत नसते. मग आक्रोड फोडायचा तो काश्मिरी अडकित्ता शोधायची धडपड. पण तो सापडून आक्रोड फोडून खाल्ल्यावर मात्र ती धडपड सार्थकी लागते. काट्याने काटा काढतात, तसा आक्रोडाने आक्रोड फोडावा. दोहोंपैकी आपल्याला जो फुटावा असे वाटत असते तो फुटत नाही; पण एक फुटतो!

पण अस्सल खवैय्याच्या हिशेबी सुका मेवा ही एक आपली फसवाफसवी आहे. खाण्यातसुद्धा अन्न म्हणून खाणे, आरोग्याला बरे म्हणून खाणे आणि खाण्याच्या आनंदासाठी खाणे, असे तीन प्रकार आहेत. त्यांचे श्रेष्ठत्व उलट्या अनुक्रमाने आहे. भात किंवा गहू हे देह टिकवण्यासाठी भरायचे जळण आहे. पण ते जळणदेखील काय गंमत करून जाते! आजऱ्याच्या जिरग्या तांदळाचा भात आणि तुरीच्या डाळीचे वरण, रसरशीत ताजे लिंबू आणि लोणकढे तूप हे काही जळण नव्हे. जो भात खदखदू लागला म्हणजे प्रियकराचे प्रेयसीवरचे लक्ष उडून आमोद सुनास होते, त्याला काय पोषक अन्न ह्या वैद्यकीय कोष्टकात कोंबायचे? घराचे घरपण स्वैपाकघरातून येणाऱ्या ह्या वासावर सिद्ध होते. इथे सारी सात्त्विकता ताटात वरणाचे पीतांबर चढवून येते. मात्र ही फक्त दिवसा मानवणारी सात्त्विकता! सकाळचे जेवण शाकाहारी असावे, आणि रात्रीचे—रंगीत-संगीत! ह्याला अपवाद म्हणजे रविवार दुपार. त्या दिवशी मात्र मासळिचा स्वाद दुणा हवाच. रोजच्याच मासळीला रविवारी दुपारी असा आगळा स्वाद का यावा, हे एक कोडे आहे! फुटाणे शुक्रवारी लागतात, तसे इतर

वारी लागत नाहीत, आणि पेढा दत्ताला साक्षी ठेवून खावा. अगदी तीन जिभा फुटाव्या, तसा गोड लागतो !

बाकी भोजनाचे ताट हेदेखील एखाद्या चित्रातल्यासारखे रससंगती साधून जाते ! पहिला भात मूदस्वरूप असावा. वरण-भाताबरोबर डाळिंब्या असाव्यात. बाकी वाल खावे कायस्थांनी. असे बिरडे अन्यत्र विरळा ! बटाटा जसा मुंबईला झावबाची वाडी ते भाई जीवनजी लेन ह्या परिसरात 'गोडी बटाटीचा रस' होऊन शिजतो, तशी वालाची डाळ कायस्थाघरीच शिजते, अन्यत्र नाही. आधुनिक जमान्यात जातीय दृष्टी वाईट खरीच. पण जीभ जर योग्य जातीच्या वळणाने वळेल, तर भोजन हे उदरभरण न राहता एक रंगीत मैफिल होऊन जाईल. पुष्कळदा मला केवळ ह्या खाद्यविशेषांच्या परंपरागत संरक्षणासाठी जाती टिकाव्यात, असे वाटते ! उद्या सगळ्यांचेच खाणेपिणे सारखे झाले की महाडच्या सोड्यांचे कालवण खायला जायचे कुठे ? कोल्हापूरच्या पाणकोंबडीने सद्गतीसाठी कुठल्या सवळेकऱ्याकडे पाह्यचे ? भेजा आणि कलेजा तळायचा नाय, असे मटनप्लेटहाउसवाल्यांनी ठरवले, की खेळ खल्लास ! आंतरजातीय विवाह व्हावेत, पण उभयपक्षी खाद्यस्वातंत्र्याच्या करारावर सह्या होऊन. अगदी कळाहीन जेवण पाहायचे असेल, तर नवश्रीमंताच्या घरच्या पार्टीला दिल्लीला जावे. एक तर पंगत नाही. आणि टेबलावर पायरेक्स डिशेसमध्ये तेच पदार्थ ! तोच निस्तेज मसाला घातलेली मुर्गी, तीच कळाहीन बिर्यानी, तीच ती फ्लावरची निःस्वाद भाजी, त्याच टमाटो-मुळे-कांदे-बीटच्या चकत्या, तीच मटणबॉल्सची करी, त्याच पुऱ्या, तीच फिकट पंडुरोगी चटणी, आणि तेच दहीवडे ! अत्यंत संस्कृतिशून्य जेवण ! आपणच ओढायचे, आणि आपणच गिळायचे ! ज्या कोंबडीच्या आणि आपल्या पहिल्या ओठीमेटीत डोळे पाणावत नाहीत, ती कोंबडी खाण्याऐवजी दुध्या भोपळा खाल्लेला काय वाईट ? जो बोकड जाता जाता जिभेला चटका लावून जात नाही, त्याचा निष्कारण बळी का द्यायचा ? पाश्चात्त्यांचे हे नुसतेच अन्न उकडणे म्हणजे आधुनिकता, असे समजण्याच्या ह्या काळात भारतीय खाद्ये आपली सांस्कृतिक पातळी (आणि जाडी) गमावून बसताहेत. दहीवडा हा काय रात्रीच्या जेवणाबरोबर खायचा पदार्थ आहे ? मला 'दहीवडा' हा शब्द मोठ्याने म्हणायलादेखील आवडत नाही. 'गोसावडा' म्हटल्यासारखे वाटते.

खाणे सात्त्विक असो वा तामसी, आपापला रंग घेऊन, ढंग घेऊन, ऐट घेऊन, चैन घेऊन, नव्हे कुळशील घेऊन, आले पाहिजे ! मुरगीची एखादी टांग हाती धरली, की कळले पाहिजे की हिचे खानदान मऱ्हाटी आहे की मुसलमानी. जातीच्या खाणाऱ्याला कुठलीही जात सारखी. किंबहुना, खूप जाती हव्यात, आणि त्यांची सैपाकघरे आणि पाकपद्धती 'पाक' राहायला पाहिजेत, असे न भिता सांगण्याचे धैर्य फक्त खवैय्यालाच आहे. जातिवंत गवैय्याप्रमाणे आम्ही खवैय्यांची घराणी मानतो. मऱ्हाटे बर्चीबहाद्दर म्हणून आम्हांला आदर खराच, पण मिर्चीबहाद्दर म्हणून अधिक ! कारण मिरची हा भारतीय पाककलेचा आत्मा आहे. आम्हांला कुठल्याच

मिरच्या झोंबत नाहीत. कारण आम्ही न भिता हाताने कांदे सोलतो. मिरच्या झोंबणे आणि नाकाने कांदे सोलणे हे धुवट शिष्टांचे काम, खवैय्यांचे नव्हे!

एकच मुर्गी, पण बहुधा वदन्ति! तिचे पंजाबी तंदूरस्वरूप हे मात्र बऱ्या ख्यालासारखे. मुर्गी खावी तंदूरस्वरूप. आणि तीदेखील दिल्लीतल्या आलीशान हॉटेलात नव्हे. तंदूरमुर्गी तिथे रंग जमवते, हे खरे. पण अगदी खरे म्हणजे पंजाबच्या शिखाच्या छातीएवढ्या रुंद रस्त्याकाठच्या मोटर-अड्ड्याशी गाडी थांबवावी. आणि 'हट्टी'च्या दारच्या रांजणाइतक्याच आडमाप सरदारजी मालकाला "सत् श्री अकाल" करावा आणि "की गल है" असे विचारीत तंदूर मुर्गा मागवून "त्वाड्डा ज्वाब नही सरदाराऽ" म्हणत सुरवात करावी. घासाघासागणिक आयुष्य वर्षावर्षांनी पुढे गेल्यासारखे वाटते! मग पनीरमटर मागवून 'प्राठा' बसवावा. माणसे दिल्लीला जाऊन कुतुबमिनार आणि राष्ट्रपतिभवन ह्या सामान्य माणसांस राहण्यास सर्वस्वी अयोग्य अशा जागा पाहतात, आणि 'प्राठा गल्ली'त जाऊन तळहातावर गरम पराठा आणि छोले खात नाहीत! दिल्लीत जाण्याच्या लायकीच्या दोनच गल्ल्या : एक पराठा गल्ली आणि शेजारची छोले गल्ली! नाक्यावरच्या एखाद्या कर्तारसिंगाकडून लस्सीचा जाम संपवावा आणि दिल्ली पाहिली म्हणून परतावे. वेळ असलाच, तर शंकर मार्केटच्या फुटपाथवर 'बर्रा' खावा. याला शीग कबाबही म्हणतात. सळ्यांवर भाजलेला हा बर्रा ही एक खैबरी खासियत आहे. हा झाला पंजाबी ढंग. त्यावरचा काश्मिरी; पण त्या खाण्याला ही पंजाबी मस्ती नाही. वीस वीस वाढणीचे ते जेवण कधी नाजूक, कधी बेमान! कमळाचे देठ खाण्यासाठी वापरावे काश्मिरी पंडतांनीच! पण ह्या जेवणात मूळ मुर्गीला किंवा बोकडाला मसाल्यात फारच लपवण्यात येते. जेवणात मसाला झणझणावा. पण कसा? शराबी डोळ्यांत सुरमा दिसावा तसा! मूळचे डोळे उजळून गेले पाहिजेत. डोळ्यांपेक्षा सुरम्याची ऐट वाढता कामा नये. नुसता सुरमाच डोळ्यांत भरला, की नजरबंदी व्हायची कशी?

मसाल्याचे असेच आहे. मसाल्याने मसालिताचे गुण उजळून जावे. मुर्गीचे मुर्गीपण टिकवणारा मसाला हवा. तिर्फळाने बांगड्यांचा आव राखून झणझणावे. एरवी, हल्लीच्या सतारीच्या साथीच्या तबल्यासारखे व्हायचे! तबलियाचे धोरण अगदीच कातडीबचावू नसावे, पण त्याने तबल्याच्या वादीने सतारियाला बदडू नये. मसाला ही एक उत्कृष्ट साथ आहे. मूळ चिजेची सम साधून बाकीची डौलदार करामत हवी. नाहीतर पेशावरी कोरमा होतो. मसाल्याच्या ढिगाखाली मेल्या कोंबडीला गुदमरून टाकण्यात काय शहाणपणा आहे?

गाण्याप्रमाणे खाण्यातदेखील ध्रुपद-धमारापासून ते छकड-झगड्यापर्यंत सर्व प्रकार आहेत. नित्याचे भोजन हे ध्रुपद-धमारासारखे; ताठ स्वर आणि मात्रांची आलटापालट. त्यात फारसा चवचालपणा उपयोगाचा नाही. (पण खरा मजा, आहे इतरां छंदी!)

चौपाटीवर ज्याने नुसतीच हवा खाल्ली त्याने चौपाटी पाहिली पण अनुभवली नाही. चौपाटीवरच्या भेळ ह्या चिजेने चौपाटीवरचे चौपाटीपण सिद्ध केले आहे. मुंबईवरच्या

सिंध-पंजाब आक्रमणानंतर हळूहळू भेळीचे उच्चाटन होऊन भेळ च्याट होऊ लागली आहे. चौपाटीवर अद्ययावत तरंगती उपाहारगृहे करण्याचा घाट घातला जात आहे. लवकरच भेळेसह चौपाटी राहिलीच पाहिजे, अशी चळवळ करावी लागणार आहे. भेल, पूडी, रगडा, टिक्की वगैरे मंडळींची हकालपट्टी होऊ देता कामा नये. वास्तविक त्या समुद्रकिनाऱ्यावर ज्या दिवशी पहिला भेळवाला उतरला, त्या दिवसापासूनच त्या किनाऱ्याची चौपाटी झाली आहे. भेळपुरी, पाणीपुरी ह्यांत पुरीचा उच्चार पूडी असाच झाला पाहिजे. पाणीपूडी ही सदैव उभ्यानेच खाल्ली पाहिजे. भेळ वाळूत बसून, आणि कागदावर. टेबलावर बसून भेळ खाणे, आणि तीसुद्धा बशीत घालून चमच्याने, म्हणजे सूटबूट आणि फेल्ट हॅट घालून सत्यनारायणाच्या पूजेला बसण्यासारखे आहे. काही अविचारी गृहिणी घरी भेळ करतात. भेळ म्हणजे चणे, कुरमुरे, कोथिंबीर आणि खजुराची चटणी यांचे मिश्रण हीच त्यांची कल्पना! भेळेला भय्याचाच हात हवा, आणि तोदेखील चौपाटीवरच्या. चौपाटीबाहेरच्या नामवंत भेळवाल्यांची आम्ही खूप नावे ऐकली आहेत. त्यांची भेळ खाण्याचा प्रयत्नही केला आहे. पण चौपाटीवरच्या त्या अनामिक भय्याच्या हातच्या वाळूच्या कणाचीही त्यांना सर नाही, असे आमचे स्पष्ट मत आहे. भेळ आणि भजी ह्या स्वैपाकघरात करण्याच्या गोष्टीच नव्हेत! कुचीपुडी, कथाकली नाचात किंवा दक्षिणदेशीच्या कुठल्याही चित्रपटात नायक ह्या तिन्ही भूमिकांना योग्य दिसणारा असा हा मनुष्य विशेष संध्याकाळी साडेचारच्या सुमारास क्षुधाशांतिगृहाच्या पायरीशी बसून कढईत घाणा सोडताना आसमंतात जो परिमल दरवळत असे, तो दरवळ आपल्या स्वैपाक-घरातून कधी आला आहे का? प्रामाणिक आणि निर्भय पतींनी हे जाहीर कबूल करावे! ही कांदा-बटाटा मिस्स् भजी भारतात मुंबईशिवाय अन्यत्र मिळत नाहीत. मिळालीच, तर तो शिष्य ह्या घराण्याची तालीम घेऊन गेलेला असला पाहिजे. क्षुधाशांतिगृहाची आरोग्यभुवने होण्यापूर्वीच्या काळातली ही भजी आहेत. पुढे भज्यांची गुजराती 'भजिया' झाली. आणि मग कांदे आणि बटाटे ह्या जोडीला केळे, मिरची वगैरेंचे शह मिळू लागले. पुढे त्यांचे एकजात 'पकोडे' झाले. आरोग्यभुवनवाल्यांनी तेवढ्यात मखलाशी करून बटाटापुरी नामक पदार्थ आणला. हा प्रकारही खमंग खरा, पण भज्यांचा इरसालपणा त्यात नाही. 'तळणे' हे क्रियापद साजून दिसले फक्त 'भजी' ह्या कर्त्याबरोबर. दुसरा आला तो 'बटाटवडा'! हा शब्द शुद्धलेखनाच्या उन्मादात काही लोक 'बटाटेवडा' असा लिहितात. पण बटाटेवडा हा सुग्रणींचा पुस्तकी स्वैपाकघरातला. खरा 'बटाटवडा'! उगीच लावणीला लावण्यगीत म्हणण्याचा शिष्टपणा करण्यासारखे हे आहे. लसणाची चटणी आणि बटाटवडा आणि लठ्ठ कपातला तो ताम्रवर्णी चहा हे पाच-सवापाचच्या सुमाराला खाण्याचे प्रकरण आहे. ज्याला चावट खाणे म्हणून हिणवले गेले आहे, त्या खाण्याचा स्थळकाळाशी फार संबंध आहे. दुपारच्या चहाला बटाटवडा उपयोगी नाही. रेडियो-वर पाचाच्या सुमाराला आरवणारा गायक भीमपलास किंवा मुलतानी गाऊ लागला

की बटाटवडा मागवावा. हीच वेळ भज्यांची. पण भजी सूर्यास्तापर्यंत चालतात. पट्टीचे भजी खाणारे गरम भज्यांपेक्षा थंडावलेली भजी पसंत करतात. अर्थात हा रुचिभेदाचा प्रश्न आहे. चिवड्यात ज्याप्रमाणे तळीचे तिखटमीठ, त्याप्रमाणे भज्यांत परातीतली भज्यांची लेकरे! त्यांनाही एक स्वतंत्र स्थान आहे. बाकी पात्रा, खमणडोकळा वगैरे प्रकार जेवढ्यास तेवढेच, पण तेसुद्धा 'आर्य' शब्दाने सुरू होणाऱ्या खाणावळीतच खावे. याला एकमेव अपवाद म्हणजे पीला हाउसजवळचे रामभरोसे. तिथे एके काळी उंधियूं नामक सुरती प्रकार उत्तम मिळत असे. भेळेची रुची भेळवाल्याच्या स्वच्छतेच्या व्यस्त प्रमाणात वाढते. आणि म्हणून स्वच्छ हॉटेलमध्ये भेळ खाववत नाही. तमाशाचा मझा उघड्या फडातच! भज्यांचेही तेच आहे. हॉटेल जितके कळकट, तितकी तिथल्या भज्यांची क्वालिटी उत्तम, हे मानून तिथे डोळे मिटून भजी खावी! स्वच्छतेचा निकष भजकाचा घाणा बिघडवतो. भजी खावी पावसाळ्याच्या दिवसांत!

हल्ली मला सुशिक्षित वर्गाचे भजी खाण्याकडे दुर्लक्ष होत चाललेले दिसते. कारण इडली (ड पूर्ण) आणि दॉसाये (दॉ जऽरा दीर्घ) ह्या दाक्षिणात्य जुळ्या भावंडांनी बरीच दंगामस्ती चालवली आहे. पण इडली ही गुंटकलच्या दक्षिणेलाच जाऊन खाल्ली पाहिजे. भेळ जशी कागदावर, तशी इडली केळीच्या पानावरच जमते. ही सकाळी साडे-आठच्या आत संपवण्याची चीज आहे. इडलीच्या घरंदाज मंगळुरी अवताराला 'सान्न' म्हणतात; आकारभिन्नत्वामुळे कारवारच्या बाजूला तिचा 'हीट' होतो. नारळाचा गोड रस आणि हीट ही जोडी कारवारकडे श्रीखंडपुरीच्या तोंडात मारून जाते. ह्याच वंशात 'येराप्पा' जन्मला. ह्याचा येल्लाप्पा हा मराठी अपभ्रंश झाला आहे. परंतु इडली किंवा दॉसाये यांचा सात्त्विकता हा स्थायिभाव आहे. भज्यांना जी एक तिरकस शृंगाराची बैठक आहे, ती ह्या दाक्षिणात्य मंडळींना नाही. इडली-सांबार म्हटल्यावर मायसोर चंदनी अगरबत्तीचा वास नाकाशी दरवळतो, आणि डोळ्यांपुढून सिद्धारूढ ते नित्यानंदस्वामीपर्यंत पाचपन्नास स्वामी चमकून जातात! भज्यांचा खाण्याप्रमाणे मारण्याशीही संबंध आहे. परंतु आजकाल ही दुसरी प्रथा नष्ट होत चालली आहे.

चावट खाणे ह्या सदरात भजी, चिवडा, भेळ, पाणीपूरी हे मानाचे मानकरी आहेत. तसे मग इतर असंख्य पदार्थ आहेत. पण गृहस्थी खाण्यात लाडू हा जसा पहिला मानकरी, त्याचप्रमाणे खाण्यातल्या चावटपणाची परंपरा एका अर्थी भज्यांपासून सुरू होते. ह्या मंडळीतच 'मिसळ' नावाची चीज आली. वास्तविक ही मिसळ म्हणजे भेळेची धाकटी बहीण, पण ही कानामागून येऊन अधिक तिखट झाली, आणि हॉटेलात प्रतिष्ठा पावली. पण उत्तम मिसळ ही पुण्याची माटेकराची. आणि तिच्या जोडीने कोल्हापूरला गंगारामबापूंच्या हातची. आणि नाटकवंद्यात अण्णा किर्लोस्करांचे जे स्थान, तेच मिसळीत माटेकराचे! आणि बापू म्हणजे देवल! माटेकराची मिसळ होती, म्हणून नव्या पुलाचे महत्त्व वाढले. अण्णांनी नाटक संगीत केले. छब्यानें चिवडा संगीत केला. पण चिवडा झणझणला तो गोदातीरी मकाजीचा! ह्या

चिवड्याचा लुत्फच निराळा. शिळ्या भज्यांना सर्वांत वरचे स्थान देण्याचे कार्य मिसळीने केले. दहीमिसळ ही मात्र मिसळीची अधोगती आहे. दह्याने मिसळीचा अंगभूत सुगंध आणि स्वाद बिघडवला!

खाणे ह्या विषयात अराजक माजवणारी दुसरी गोष्ट म्हणजे पाककलेवरची पुस्तके! पुस्तकातले नोटेशन वाचून गाणे शिकण्याचा प्रयत्न करण्याइतके हे बावळटपणाचे आहे. पाककला ही गुरुमुखातून आली पाहिजे. आधी वरण, भात, भाकरी, डाळवांगे, साधे मटण, बटाट्याचा रस्सा वगैरे साधेसाधे राग जमले पाहिजेत. लग्न होईपर्यंत बॅडमिंटन खेळून, त्यानंतर एकदम बायकांच्या मासिकांतली शेवटली पाने वाचून पान मांडता येत नाही. ही तालीम आजी, आत्या, मामी वगैरेंकडून घ्यावी लागते. पाव इंच आले आणि दोन मिलिमीटर मिरच्यांचे तुकडे, पाच औंस अमुक आणि दोन तोळे तमुक—अशा चाली पाठ करून जेवण तयार होत नाही. त्याला म्हणजे "बरं एवढं डाळीचं पीठ घ्यावं, एवढीशी चिंच, उगीच थोडं आलं—" असली संथा मिळावी लागते. आणि मग 'बरं एवढं' किंवा 'उगीच जरासं' ह्यांचे अर्थ अंगात भिनतात. हात नेमका पडतो. शिवाय 'नवा पदार्थ' हा नवा राग म्हणतात तसा फसवा आहे. ही जुन्याची निष्कारण मोडतोड आहे. अमका पदार्थ मधल्या वेळी खायला चांगला हे वाक्य फजूल आहे. हे तो घड्याळाचे कामच नोहे. पोहे खाण्याचा मूड जमावा लागतो. तिखट सांजा 'हवा' ह्या भावनेचे वातावरण तयार होते. काल रात्री डाळीत मुळा पडला होता की नाही, याचे स्मरण ठेवून मुळ्याची कोशिंबीर टाळायची असते. इथे जाणिवा जिवंत हव्या! पान नंबर तेवीस आणि पदार्थ नंबर चोवीस ह्याला काही अर्थच नाही. खाण्यातले स्थायिभाव हाडीमाशी पक्के भिनतात, तेव्हाच अन्य विभाव, सहचारी नि व्यभिचारी भावांची जाणीव होते. सोलाची कढी ही माशांची पाठराखीण होऊन यावी लागते, आणि ह्या साऱ्या खाण्याची एक लय जमावी लागते. पहिला भात, चपाती, पुन्हा माशाच्या आमटीबरोबरचा भात आणि नंतर सोलाची कढी—ह्यांतील प्रत्येक चिजेला किती वेळ द्यावा हे कळावे लागते. हे पुस्तकातून कसे कळणार? त्याला नित्य निरीक्षण आणि तोंडाबरोबर डोळे उघडे ठेवून केलेले विविध भक्षण हवे.

फार वर्षांपूर्वी नळबाजारातून जुनी आरामखुर्ची विकत घेण्यासाठी हिंडत असताना गल्ली चुकून कुठल्या तरी रस्त्याला मी लागलो, आणि हिंडता हिंडता आलो एका चांदभाईच्या भटारखान्यासमोर. तिथल्या बाकड्यावर बसून खाल्लेल्या सामोशाने त्या सामोशाबरोबर मीही विरघळलो! असाच एकदा चिंचपोकळीला मी कांदाबटाटा पातळभाजी आणि पाव खाऊन गेलो आहे. पावाचे सिलेस बुडवण्यापेक्षा पातळ भाजीत पाव हाताने तोडून भिजवावा. पॅरिसमधे 'बूयाबेस' नावाचा एक स्पॅनिश प्रकार खाताना मला चिंचपोकळीच्या त्या हॉटेलची आठवण झाली. तिथे गणपति-उत्सवात एका मेळ्यात मी पेटी वाजवायला गेलो होतो. पद नंबर एक ते पद नंबर सोळा वाजवून भलतीच भूक लागली होती. पूर्वी हॉटेलांना अकराचा नियम नव्हता.

रात्री एकच्या सुमाराला ती पातळ भाजी कांदा, बटाटा, लसूण आणि त्यात वारंवार मिसळलेले पाणी ह्यांत अशी काही एकजीव झाली होती की, त्या पातळभाजीवरून मी ते पॅरिसचे बूयाबेस ओवाळून फेकून दिले असते! पाव आणि पातळ भाजी मिळून मी एक आण्यात चैन केली, ती एक हजार फ्रँक टाकून जमली नाही. शिवाय, मेळ्यातला पेटीवाला म्हणून हॉटेलमालकांनी माझ्यासाठी पुन्हा एकदा फोनोला चावी मारून 'ब्रिजलाला गडे' वाजवले होते. शिरवळच्या मोटार-अड्ड्यावर फार प्राचीन काळी एक 'डायवरांचे पेशल हाटेल' होते. तिथे दोन आण्यांला गरम भाकरी आणि मटणाचा रस्सा आणि दह्यात घातलेला कांदा मिळे. बोरीबंदरावर करीमकडे खिमा मिळत असे. जॉर्ज रेस्टारंटमध्ये फिरनी मिळे. वेलणकरांकडे कंद. पार्ल्यात पावनगडकरांचा विलेरी चिवडा. कोल्हापूरला दगडू बाळाकडला पेढा. नर्सोबाच्या वाडीला कवठाची बर्फी. नाना चौकातल्या पुलाच्या पायथ्याशी असलेल्या आद्यदाक्षिणात्याकडे आंबोळी (ह्याला डॉसाई म्हणत नसत). केळकरांकडे बटाटापुरी आणि केळ्याची भजी. कूपरकडे धनसाक. पीअर्सचा पाव. किंवा कुठल्याही युद्धपूर्व इराण्याकडे पावणा आणि ब्रूनमस्का: हा सकाळी पहिल्या चहाबरोबर खाल्ला, तरच त्याची किंमत कळत असे. आयडियलचे पॅटिस. आणि मेरवानकडे मावानी केक. दवाबाजारात कचोरी. माहीम बाजारच्या नाक्यावरच्या हाटेलात पाया. हा बाहेरच्या बाकड्यावर बसून पुढल्या संगमरवरी शिळेच्या टेबलावरच खावा लागतो.

खाण्याचा आसनाशी फार संबंध आहे. पाटावरचे जेवण चांगले आणि टेबलावरचे वाईट, असे क्षुद्र विचार जातीच्या खाणाऱ्याला नसावेत. काही गोष्टी तर चालत चालत खाण्याच्या आहेत. उदाहरणार्थ, चणेवाटाणे. हे कधीही बसून खाऊ नयेत. उसाचे कांडे चालता चालता तोंडीत जावे. भेळ बसून खावी, पण पाणीपूडी आणि भेलपूडी उभ्याने. भाजलेले शेंगदाणे वाटीत घालून एखादे पुस्तक वाचता वाचता पडल्या पडल्या खावे. मिठाई शक्य तितकी खाऊ नयेच; पण खायचीच झाल्यास खुर्चीवर बसून खाऊ नये. बिछायतीवर बसून खावी.

खाण्याचा आसनाशी तसा बासनाशीही संबंध आहे. मत्स्यगोत्राचे दगडी भांड्याशीच सूत जमते. आंबरस हा चांदीच्या वाटीतून खावा. शिरा द्रोणात. वरणभात, तूप हे वेत केळीच्या पानावर. भेळ चक्क कागदावर. ॲल्युमिनियमच्या डेकचीत पुलाव जमतो, पण खाताना डिश हवी. ताक कल्हईच्या वाटीतून प्यावे, पण करावे मात्र चिनीमातीच्या बरणीत. दूध मातीच्या लोटीत, आणि पापड्या शिजवाव्या मडक्यात. आइस्क्रीम वडाच्या पानावर उत्तम लागते हे ज्याने भय्याकडे चर्रचर्र असा आवाज करीत कापले गेलेले आइस्क्रीम खाल्ले आहे त्यालाच पटेल!

शाकाहारी मंडळींना शाकान्न आणि शाक्तान्न जोडीजोडीने कसे नांदते हे कळणार नाही. तुरीच्या डाळीच्या सांबाऱ्याबरोबर भाजलेल्या सुक्या बांगड्याचा तुकडा काय विलक्षण साथ जमवून जातो! मटारीत कोलंबी आणि वांग्यांत सोडे. व्हिस्की–सोडा आणि वांगे-सोडा ह्या जोडीत श्रेष्ठकनिष्ठ ठरविणे कठीण आहे. काळ्या वाटा-

ण्याची किंवा मसूरची मसालेदार आमटी असली, तर उगीच जोडीला कोलंबी किंवा ताजे बोंबील तळून पाहावे. स्वर्ग ताटात येतो! मटणात बटाटा घरच्यासारखा येऊन बसतो. पण कोंबडी एरवी स्वतः शाकाहारी असली, तरी पकवल्यावर तिला पालेभाजीचा सहवास चालत नाही. तीच गत हरभऱ्याची. हरभरे आणि मासे यांचे जमत नाही. म्हणून पिठल्याच्या जोडीला मासेमटण चालत नाही. मसूर ही जातीने शाकाहारी असली तरी वृत्तीने सामिष. नागपुरी वडाभात हा पुढे अक्खी दुपार झोपायला मोकळी असली तर खावा. आणि डाळबाटे या इंदुरी प्रकारात बाटे हुकवून नुसती डाळ ओरपता आली तर पाहावी. हरभऱ्याच्या डाळीच्या आमटीला तसे खास व्यक्तित्व नाही, पण पुरणपोळीच्या प्रसंगी ती जेव्हा 'कटा'त सामील होते त्या वेळी कधी कधी पोळीच्या तोंडात मारून जाते. डाळीचा सर्वांत मोठा अपमान 'आंबटवरण' नामक पुणेरी प्रकारात होतो. द्विदलांत वाल हे श्रेष्ठ खरेच, पण गोव्यातली 'फॅजांव' नामक चवळी वालाचा नक्षा उतरवून जाते. बाकी कोबी, फ्लॉवर, नवलकोल, बीटरूट वगैरे विदेशी मंडळी आता इथे आसन स्थिरावून आहेत. कोबी-फ्लॉवर हे नवीन होते, त्या वेळी फार ऐटीत होते. पण आता मात्र कोबीचा पार बटाटा झाला. फ्लॉवर अजूनही ऐटीत आहेत. हेही कोलंबीबरोबर रंगात येतात. भेंडी तव्यावरून ताटावर यावी. आणि शेवग्याच्या शेंगांचे नाव झाले असले तरी डाळीत किंवा पिठल्यातच त्यांनी राहावे. पण शेवग्याच्या कोवळ्या पालवीची आणि फुलांची भाजी मात्र लाजवाब असते! तीच गत कोवळ्या बांबूची. कोवळा बांबू ही चिनी-जपान्यांची मिरास नव्हे. गोव्यापासून खाली मंगळूरपर्यंत 'किल्ल' ह्या नावाने तो खाल्ला जातो. केळफुलाची भाजी चांगली जमली हे ती खाल्ल्यावर येणाऱ्या शिंकांवरून ओळखायचे असते. बाकी सुरण, फरसबी, कच्ची केळी, दुध्या आणि लाल भोपळा ही केवळ ताटभरतीसाठी असतात. लाल भोपळ्याच्या वेलीवरची कोवळी पाने पिवळी फुले आणि कोवळे देठ यांच्या भाजीच्या नुसत्या आठवणीने कारवार-अंकोला भाग तरारून उठतो! पुणेरी आणि तत्सम जेवण हे 'आमटी' ह्या प्रकारात अत्यंत अनभिज्ञ. त्यांना 'उडीदमेथी' म्हणजे काय हे समजावून सांगणे म्हणजे व्हिस्की आणि 'पीयूष' (ही एक श्रीखंडाची धुऊन काढलेली पातळ आवृत्ती!) ह्यांतला फरक समजावून सांगण्यापैकी आहे. कढीची 'करी' झाली हे सर्वांना ठाऊक आहे. पण 'उपकरी' म्हणजे काय ते कळायला मंगळूरपर्यंत जाणे शक्य नसल्यास मुंबईतल्या तात्मक्की वाडीत जाऊन यायला हवे! बटाट्याच्या सुक्या, पातळ, थलथलीत अशा प्रकारांचे विष्णुसहस्रनाम होईल. पण बटाट्याची सुकी भाजी केली गिरगावातल्या कुळकर्ण्यांनीच. फार पूर्वी मुंबईची सकाळ ही 'जाॅड अ मीठ' झाले रे झाले की 'कांदी बट्टाटीय' ह्या आरोळीने संपायची. त्या बट्टाटीवाल्याकडे 'संसार बटाटे' नावाचा आवळ्याएवढा बटाटा मिळे. तो हल्लीचे शेतकरी पेरीत नसावे. त्या गोळीबंद बटाट्याचा एक 'आक्खा बटाटा' नामक रस्सा होई. आणि त्याचाच 'सॅंग' नावाचा तिखट-आंबट मंगळुरी प्रकार असे. बटाटा ह्या गृहस्थाची

कारकीर्द 'आख्खा बटाटा', 'सँग' आणि कुळकर्णीकृत भाजी एवढ्या तिहींत संपती तरी तो चिरंजीव झाला असता!

बाकी मुंबईला जसा बटाटा कळला तसा पुण्याला कळलाच नाही. पुण्याने चक्क त्याला मधेच चिरून त्याचा उपयोग उदबत्त्या टोचायला केला! हे म्हणजे कट्यारीच्या टोकाचा उपयोग दात कोरायला करण्यापैकी आहे. किंवा तलवारीने शेपूची भाजी चिरण्यासारखे. कंदमुळांत बटाटा फार श्रेष्ठ. रताळे अगदीच वारकरी पंथातले! आणि मुळा शिजताना जवळ जाऊ नये. मुळा कच्चाच खावा. किंवा डाळीत फेकावा. बटाट्याचा सावत्र भाऊ म्हणजे कांदा. हा चिरताना डोळे पाणावून जातो; पण बेटा गुणी! शिष्टांनी ह्याला धर्मबाह्य केला. पण उद्या जेवणातून कांदा गेला की राहिले काय? भाकर ताजी अथवा शिळी आणि कांदा हे मराठा वीरांचे पूर्णान्न! मला वाटते, शंभर मावळे कांदा खाऊन अंगावर धावल्यावर नुसत्या त्यांच्या मुखश्वासगंधाने मोगली फौजा चौखूर उधळल्या असतील! वास्तविक बाटलेला मुसल्मान जास्त कांदा खातो म्हणतात. म्हणजे कांदा उभयपक्षी प्रिय होता! कांद्याला उर्दूतला 'प्याज' हा मोठा मोहक शब्द आहे. बटाट्याला मात्र 'आलू' हा शब्द शोभत नाही. 'बटाटा' म्हटल्यावर जे एक टम्याचे चित्र डोळ्यापुढे उभे राहते ते 'आलू' शब्दाने राहत नाही. कांदा चिरण्याचेसुद्धा कसब आहे. कोणत्याशा संगीत घराण्याचे उस्ताद कांदा जाईच्या पाकळ्यांसारखा चिरत म्हणतात! डोळे मिटून चिरायची ही एवढी एकच वस्तू. चिरायला अती अवघड असा प्रकार म्हणजे फणस. हाताची बोटे खोबरेल तेलात भिजवून घ्यावी तेव्हा कुठे फणस चिरला जातो. कच्च्या कोवळ्या फणसाला कोकणात 'कुयरी' म्हणतात. ह्या कुयरीची ठेचून आणि उकडलेले काळे वाटाणे घालून, लसणाची झोकदार फोडणी देऊन केलेली भाजी आणि पेज हा अस्सल कोकणी थाट! काळे वाटाणे उकडल्यावर तांदळाच्या कण्या घालून केलेल्या अंबाडीच्या भाजीतदेखील काय चपखल जाऊन बसतात! ही भाजी काल रात्री करावी आणि आज सकाळी ताज्या भाकरीबरोबर तिळेल तेलाची धार ओतून खावी. ही बाटी मस्ती! भाकरीला मिरचीची सोबत हवी. मग ती लसणाच्या ठेच्यातून असो, वा मटणातून. गरम भाकरीसंगे गूळ-तूप चालते, पण ते पोराबाळांचे खाणे! मिशीला पीळ भरल्यावर भाकरीबरोबर गुळचट काही आले की मिशीचा पीळच उलगडत जातो. लसणाचा ठेचा हा तर बहात्तर रोगावर इलाज आहे. ठेचा ठेवलेल्या भांड्यावरचे झाकण निघाले की ओसरीवर वासाची वर्दी गेली पाहिजे, की "धुवा हातपाय!" त्याला ठेचा म्हणतात! काळे तिळकूट असेल तर त्यात कांदा चिरून पडावा लागतो आणि शेंगदाण्याचे कूट असले तर हिरवी मिरची पुढल्या दोन दातांनी तोडीत भाकर मोडावी लागते. भाकर खाणे—जाणून-समजून खाणे—हे गोडीगुलाबीचे कामच नव्हे! ती खाल्ल्यावर ग्लासातून पाणी पिऊन भागत नाही. गडवा तोंडाला लावावा लागतो. भाकर पोटात गेली आणि गडवा एकदाचा रिकामा झाला, की लगेच पोटाकडून ढेकरेची पावती आलीच! मग पान जमवून दोन फिका टाकल्या की आडवे व्हायला

मात्र डेरेदार आंब्याचा बुंधा असावा आणि अंथरायला कांबळं असावं. भाकर आणि लसणाचा ठेचा ही शिमिटाच्या घरात खाण्याची गोष्टच नव्हे. हुरडा जसा वर आकाश आणि खाली चौफेर शेती ह्याच वातावरणात खायचा, उसाचा रस जसा गुऱ्हाळावर प्यायचा, गाभुळल्या चिंचा जशा स्वतः तोडून तोंडात टाकायच्या, तशी भाकरी ही झाडाखाली बसून खायची वस्तू आहे. महाराष्ट्र मुख्यतः भातखाऊ किंवा भाकरखाऊ! पोळी-चपाती ही काही खास आपली नसावी. कारण मराठी जीव भात-भाकरींत जसा रमून गेल्यासारखा वाटतो, तसा काही पोळीत वाटत नाही. कोकणात तर रेशनिंगनं पोळ्या आल्या. कारण मऱ्हाटी वाक्प्रचारांतदेखील डाळभात, भाकरतुकडा, मीठभाकर असे प्रकार आहेत, तसे "चपाती खाऊन जा—" वगैरे नाहीत. सामान्यतः पोळीचा अर्थ तर पुरणपोळी असा आहे. पुरीदेखील आपली नसावी. श्रीखंड आपले, पण श्रीखंड-पुरी ही आपण नंतर जमवलेली जोडी आहे. गोड पदार्थांत शिरापुरी हा एक भयंकर प्रकार आहे. इतकी निर्बुद्ध जोडी वरिष्ठ सरकारी अधिकाऱ्यांच्या घरातदेखील सापडणार नाही. तीतला तो शिराही तूप खाऊन माजलेला आणि पुरीही उगीचच फुगलेली! शिरापुरीचा 'बेत' म्हणण्यापेक्षा शिरापुरीचा 'कट' म्हणणे योग्य होईल. हे म्हणजे बासुंदीत बनपाव बुडवून खाण्याइतके बावळटपणाचे आहे! शिरापुरी ही अगदी मासलेवाईक पेशवाई पोकळ ऐट आहे.

बाळबोध खाण्यातही काही ठसकेदार मंडळी आहेत. पैकी मेतकूट आणि खरे साजूक लोणकढे—अगदी घरी हळदीचे पान घालून कढवलेले—तूप हवे. डांगरही वेळीप्रसंगी रंग जमवते. साबुदाण्याची खिचडी ह्या एकाच कारणास्तव मला उपवास मान्य आहे, आणि ऋषीच्या कुळाइतक्याच अगम्य भाज्या घातलेली ती भाजी असते म्हणून ऋषिपंचमी मंजूर आहे. रताळी चुलीत भाजून खावी. एरवी रताळ्याचे मला 'शकरकंद' हे हिंदी नाव आवडते. बंगाली मिठाई ही नावासारखी—नावापुरतीच—खावी! एरवी 'रोशोगुल्ला' हाच स्थायिभाव! मग त्याचा 'शोंदेश' होवो, नाहीतर 'रोशमोलाय' असो. बंगल्यांना दूध दिसले की प्यावे असे न वाटता फाडावे असे का वाटते, देव जाणे! गुर्जरभोजन मात्र डावखोरे! ताटातल्या उजव्या बाजूच्या पदार्थांपेक्षा डाव्या बाजूचे 'आचार' चांगले असतात. पंजाबी माणूस अक्षरशः हातावरच्या पोटाचा! खटियावर उजव्या हातात छोले आणि डाव्या हातात पराठा (उच्चारी 'प्राठा'!) घेऊन खातो. आणि मद्रासी जेवणाला तर कोपरापासून नमस्कार करावा लागतो. सारमचा ओघळ प्रकोष्ठाच्या मागल्या बाजूने कोपराला येऊन भिडण्याच्या आत हातातला भाताचा चेंडू तोंडात दडपून जिभेने तो ओघळ वाटेत पकडण्याचा द्राविडी प्राणायाम जमला तरच मद्राशी जेवण जमते! आणि ही सर्कस चालू असताना बोलणे थांबवता कामा नये. टिफीन कॅरियरच्या चार भांड्यांपैकी तीन भांड्यांत भात, एका भांड्यात अर्धा लिटर सारम, वरच्या झाकणातल्या डबीत लोणचे आणि कागदात पापडम्! द्रविड देशात मिठाईत कापूर का घालतात, कळत नाही! कोणीतरी मला कापूर हा आरोग्याला बरा, असे त्याचे कारण सांगितले. उद्या

एखादी आरोग्यप्रेमी गृहिणी हे ऐकून कोकमाच्या सारात पोटॅशियम परमँगनेट न घालो! भोजन ह्या विषयात विशेष खोलात न शिरलेला प्रांत म्हणजे बिहार. सातूचे पीठ हा तिथल्या भोजनातला स्थायिभाव! बिहारी मंडळी भाताचा ढीग उपसतात, त्यांच्यापुढे दाक्षिणात्यांचे भात खाणे म्हणजे अगदीच भातुकलीतले. बिहारी लोक नुसत्या पोह्यालाच चिवडा म्हणतात. आणि संयुक्तप्रांती हिंदू हे दूध व दुधाचे पदार्थ यांपलीकडे फारसे पाहत नाहीत. बंगाल्यांनी दूध फाडावे आणि ह्यांनी आटवावे! रबडी हा पदार्थ दोन चमच्यांवर ज्याला पोटात ढकलता येतो त्याला काहीही पोटात भरता येईल. मथुरेची रबडी ही कशी दिसते हे मी अजूनही पाहू शकलो नाही. त्या भांड्यावर सहस्रावधी मक्षिकांचा कुंभमेळा जमलेला असतो. हलवाई हा मुख्यतः मक्षिकापालन करतो. मला वाटते, माशा हाकलण्यासाठी तो सारखा हात हलवत असतो, म्हणूनच त्याला 'हलवाई' म्हणत असावेत. उत्तरेत हलवाई आणि सौराष्ट्रात फरसाणवाला. शेवगाठिया भावनगरच्याच! अमदाबादची जलेबी अने फाफडा. सुरती सुत्तरफेणी. आणि बदामी हलवा खास मुंबईतल्या 'बूढा काका'चा! तांबड्या कागदात अनंत कागद गुंडाळून कागदाइतकाच पातळ असा खरा माहिमी हलवा मिळे, तो गेला. हल्लीचा माहिमी हलवा ही त्या हलव्याची भ्रष्ट नक्कल आहे!

दिल्लीच्या घंटेवाल्याची मिठाई शहाजहान बादशहाच्या दरबारी जात असे, एवढे ऐतिहासिक महत्त्व ध्यानात घेऊन खायची. पण मिठाईवाल्याचे नाव जरा भरघोस असावे! मुसलमानी मिठाईचा गव्हाचे सत्त्व हा स्थायिभाव. त्याच्यावरील बदाम-पिस्त्यांची पेरणी आणि गुलाबपाण्याचा शिडकावा महत्त्वाचा, तर हिंदू मिठाईचा खवा हा आत्मा. मुसलमानी मिठाईदेखील रंगाने छटेल आणि ढंगाने मस्त, तर हिंदू मिठाई अगदी प्रसादाइतकी पवित्र आणि जराशी मठ्ठ! रबडीचा द्रोण पुढ्यात घेऊन ओरपणारा एखादा रामदुलारे साध्या "बे चोक किती?" ह्या प्रश्नाचे उत्तर देईलसे वाटत नाही! पण लखनौच्या बाजारातले पिस्त्यांचे पुरण भरलेली मलईची मुलायम पट्टी उडवणारा आशिकअली "बे चोक किती?" ह्या प्रश्नाचे उत्तर "नऊ" असे देईल, पण अशा थाटात की त्या थाटातच त्याला खरे अंकगणित कळले आहे हे उमजावे! कारण त्या मिठाईला त्याच्या पोटी अनेक नमकीन आधार आहेत. कोफ्ता कोर्मा ह्यांच्या हाजम्यासाठी म्हणून तो एखादी दूध की लोटी ठेवून देतो! रामदुलारे नुसतीच रबडी खातात! मिर्चीचा स्पर्श घडू न देता केवळ दूध व दुधाचे पदार्थ खाणाऱ्या लोकांच्या बुद्धिमत्तेबद्दल मी सदैव साशंक असतो.

परमेश्वराने समुद्रात मासे काही मत्स्यालयांची शोभा वाढावी म्हणून केले नाहीत! कोंबड्या आणि कोंबडे काय पहाटेचा गजर म्हणून जगात आले नाहीत! मिरची काय फक्त पोपटाचे खाणे म्हणून केली नाही! माणसाने काल्र्यापासून कुल्र्यापर्यंत आणि भेंड्यापासून मेंढ्यापर्यंत आपली निवड करावी. माझे खाद्यजीवन ह्या विविध प्रकारांनी समृद्ध झाले आहे. परवाच मला काही कारणाने डॉक्टरांचे पाय धरावे लागले. वास्तविक मी अगदीच अडलो होतो, असे नव्हे. पण कोण्या गाफील

अवस्थेत मी उगीचच ' चेक अप ' करायला म्हणून डॉक्टरकडे गेलो. आणि एका जागी दोन बरे म्हणून दोघांकडे गेलो. एकाने गोड वर्ज्य करा म्हणून सांगितले आणि दुसऱ्याने तिखट! मी पहिल्याचे ऐकून गोड वर्ज्य करून तिखट स्वीकारले, आणि दुसऱ्याचे मान्य करून तिखट वर्ज्य करून गोडही चालू ठेवले! माझ्या न बिघडलेल्या प्रकृतीत भलतीच सुधारणा आहे, असे दोघांचेही मत पडले.

मला माझी प्रकृती बिघडल्याचे निदान चटकन होते. चौपाटीवर जाऊनसुद्धा भेळ न खाता ज्या दिवशी मी परत येईन, त्या दिवशी मी म्हणेन की आता वय झाले, जपले पाहिजे! आणि मग कदाचित मला फलाहार करावा, असेही वाटू लागेल. आता फळे खाल्ली पाहिजेत, असे वाटायला लागले की वय होत आले, असे मानायला हरकत नाही. मोसमात आंबे सोडले, तर फळ ह्या गोष्टीशी माझे जमले नाही. त्याची नावड आहे असे नव्हे. आंब्यात आंबा हापूसचा, म्हणून मी खातो. पण मला सर्वांत आंबा आवडतो तो कारवारचा काळा इशाड्द! त्याखालोखाल गोव्याचा माणकुराद. लंगडा, दशेरी हे उत्तर भारतीय लोक ठीक आहेत एवढेच. फर्नांद कधीमधी. पण आंब्याच्या आमरसापेक्षा आंब्यांच्या बारक्या घोटांचे ' सासव ' हा प्रकार मात्र खायला कारवारी घरातच गेले पाहिजे. तीच गत कैरीच्या कारवारी लोणच्याची. गोव्याचे रसबाळे केळे सोडले, तर केळ्यात खायचे ते काय? शिकरण ही तर आयत्या वेळी उपटलेल्या पाव्हण्याची बोळवाबोळव आहे. संत्री नागपूरची आणि तीदेखील मोसमात फार तर एकदोनदा. द्राक्षांत फकडी बिनबियांची! सफरचंद केवळ ऐट म्हणून खायचे. अंजीर पुण्याला गेलोच आहो म्हणून. सिताफळ हे मात्र माझ्या आवडीचे. पेरूशी माझे जमत नाही. बोरे आणि जांभळे शाळेत असताना खाल्ली, तशी पुन्हा लागली नाहीत. आणि पोपया हा फळांतला खाणावळीतल्या आमरसात केवळ तोतया म्हणूनच उपयोगी! मोसंबी शक्य तितकी घरात येऊ नये याची मी खबरदारी घेतो. कारण त्या फळाचा आजाराशी संबंध आहे. चिकू फ्रूट सॅलड नामक फळांचा चिखल करतात, त्यात केवळ रंग जमवण्याच्या लायकीचा. सफरचंदाचेच नासपाती, बब्बूगोशा वगैरे चुलतघराण्यातले भाऊबंद आहेत. त्यांनाही मी टाळतो. थोडक्यात म्हणजे फळे आणि आरोग्य ह्या गोष्टींचे असे काही नाते जमले आहे, की खाण्याच्या मैफलीत ही मंडळी केवळ आपला शिष्टपणा घेऊन मिरवतात.

अजूनही स्वयंपाकघरातून लसणीच्या फोडणीची पळी कशात तरी जाऊन चुरचुरली, पाट्यावरच्या चटणीचा वास घुमला, चुलीतल्या राखेत वांगडा घुसला, दाराशी कणसे भाजणाराची शेगडी पेटली, आंबेमोहराचा उकळता सुगंध दरवळला, की आत्मा आणि कुडी हातांत हात घालून रिंगण धरतात. सारे ब्रह्म अन्नब्रह्म होऊन विनटते! आता पळांची युगे होतात.

माझी सुखाची कल्पना एकच आहे...आदल्या रात्री चार-साडेचार वाजेपर्यंत गाण्याची मैफल रंगलेली असावी...सकाळी दहा वाजता उठून दोन वेळा चहा झालेला असावा...हवा बेताची गार असावी...हातातली एखादी, लेखकावरून जीव

ओवाळून टाकावा अशी कादंबरी संपत आणलेली असावी...ती वाचून शेवटले पान उलटता उलटता बारा-साडेबारा व्हावे...आणि आतून तव्यावर पडलेल्या सरंग्याच्या तुकड्याने साद घातल्यासारखा स्वाद घालावा...दोन मिनिटांत आंघोळ उरकेपर्यंत पाने मांडली जावी...आणि क्षणार्धात आंबेमोहोर भाताच्या वाफेने ताट खुलून यावे... यथेच्छ भोजन व्हावे...मस्त पान जमावे...इब्राहिमी जर्दाचा तोंडात गिलावा व्हावा... गार पाणी प्यावे...आणि संध्याकाळी पाच वाजेपर्यंत कुणीही झोपेतून उठवू नये! कधी कधी देवाजी करुणा करतो, आणि हे असे घडतेही. त्या दिवशी मी इतका आनंदात असतो की, संध्याकाळी बायकोबरोबर इमानी आणि सालस नवऱ्यासारखा फिरायला-देखील जातो; आणि विश्वास ठेवा अगर ठेवू नका, तिला वेणीदेखील घेऊन देतो! बुद्धाला ही सुखाची किल्ली सापडती, तर तो निर्वाणाच्या मागे लागला नसता. बोधिवृक्ष कधी घरातल्या, तर कधी बाजारच्या चुलीजवळ आहे, हे शुद्धोदनाचा मुलगा असूनही त्याला कळले नाही. कसे कळावे ? त्या बिचाऱ्याने सेकंड लँग्वेज पाली घेतली होती, आणि 'ओदन' म्हणजे 'भात' हे संस्कृतात आहे, पालीत नसावे! ते कळते, तर भाताचा ढीग आणि बांगड्याची आमटी ओरपीत तो 'मत्स्यं शरणं गच्छामि' म्हणत म्हणत निर्वाणाप्रत पोहोचला असता!

दाराशी आलेल्या यमदूताच्या नाकात जर झणझणीत लसणीची फोडणी गेली, तर तो खाणारावरचा आपला हात निश्चित खाण्यावर नेईल. स्वर्गात अमृत असेल, पण लसणाची फोडणी दिलेली अंबाडीची भाजी कुठून असणार ? कांदालसूण खाण्याचे भाग्य देवांच्या नशिबी नाही!

# बिगरी ते मॅट्रिक

## एक भारी विकट वाट

बिगर यत्तेपासून ते मॅट्रिक होईपर्यंतचे माझे सारे आयुष्य मोठ्या हलाखीत गेले. शैशव, बाल्य, कौमार्य, पौगंड असल्या अवस्थांच्या जाळपोळीचा हा इतिहास आहे. तशी माझी काही मुन्सिपालटीच्या दिव्याखाली बसून अभ्यास करायची परिस्थिती नव्हती. असती तर एव्हाना साध्या माणसासारखा माणूस होण्याऐवजी चरित्रनायक झालो असतो. मला कधी वारावर जेवावे लागले नाही. माधुकरी मागावी लागली नाही. आई जेवू घालीत असे. बापाने भीक मागण्याची परवानगी घेण्याचा प्रसंग आणला नाही. वर्षाकाठी दोन-चार अर्ध्या तुमानी आणि पैरणी मिळत. पैरणीऐवजी कॉलरचा शर्ट असावा, असे वाटे. पण लहान मुलांना "करायच्यायत काय रे कालरी?" असे महादेवराव शिंप्याचे मत असे. याचे खरे कारण फार उशिरा कळले. त्याला कॉलरीचे शर्ट शिवता येत नसत. पण सणासुदीसाठी म्हणून ठेवणीतली प्याण्टदेखील होती. चांगली नवी भिकबाळी कानात घालून मुंज लागण्याइतक्या सुखवस्तू कुटुंबात मी जन्मलो होतो. ह्या भिकबाळीवरून आठवले. हा अलंकार कान पिळायच्या जागेवरून कायमचा उठला, हे मला फार मोठे समाधान आहे. भिक-बाळीसकट कान पिळून घ्यायची सालंकृत शिक्षा ज्यांनी भोगली आहे, त्यांनाच माझ्या समाधानाच्या सुस्काऱ्यामागची पिळदार वेदना कळावी. वास्तविक ही चांगली सोन्या-मोत्यांनी मढलेली बाळी. तिला भिकबाळी करण्याचे डोहाळे कुणाला आठवले, कोण जाणे. कदाचित एखाद्या भिकशेट सोनाराने (गेऽले बिचारे!) हा अलंकार शोधून काढला असावा, आणि आपले नाव त्या बाळीला जोडून दिले असावे. पूर्वीच्या काळी स्वतःचे नाव शेवटच्या चरणात गुंफायचे तसे. सांगायचा मुद्दा लहानपणी मला भिकबाळी होती, जरीची टोपी होती, परंपरेने चालत आलेला मखमालीचा सूट होता. तसे काहीही कमी नव्हते. पण बालपण सुखात गेले म्हणताना जीभ अडखळते.

माझ्या तथाकथित रम्य बालपणाला तडा पाडण्याच्या श्रेयाचे पहिले मानकरी दामले-

मास्तर हे नाव धारण करणारे कर्दनकाळ होते. आमच्या मुंबईच्या बाल्या लोकांची एक सवय आहे. कुठेही मांजर दिसले की हातात जे काही असेल ते फेकून त्याला मारतात. ह्या दोन जमातींचे पूर्वजन्मीचे जे काही वैर असेल, त्याचा ह्या जन्मी सूड काढतात. मांजराच्या बाबतीत जे बाल्याचे, तेच मुलांच्या बाबतीत दामलेमास्तरांचे असे. ह्या विभूतीचे चित्र भरपूर हिरवा रंग हाताशी ठेवल्याखेरीज काढणे अशक्य आहे. ते रोजच्या दाढीबरोबर गोटाही रोज करून घेत असावे. कारण घाम पुसायला टोपी काढली की डोक्यावरचे एरंडीचे पान आणि गोट्याचा हिरवा रंग हे मिसळून जायचे. दाढी हिरवीगार असायची. डोळे इतके हिरवे होते की, पुढे 'नानांचे हिरवे डोळे' नावाची ओळ पाठ करताना माझ्यापुढे दामलेमास्तर उभे राहत. एवढ्याने भागले नाही, म्हणून ते हिरव्या रंगाचा डगला घालायचे. हातात हिरवागार चिंचेचा फोक असे. उजव्या हाताला लांबलचक हिरवे बोट फुटल्यासारखा तो ते हातात सदैव वागवीत. सकाळचा दूधवाला त्यांना दुधाबरोबर एक-एक फोक आणून देत असावा. ह्या सगळ्यांच्या जोडीला वाकीच्या हिरव्या रंगाला फिके पाडणारे, अत्यंत हिरवट बोलणे. आपल्या ताब्यात चार घरची पोरे ही केवळ चिंचेच्या फोकाने फोडून काढण्यासाठीच पाठविण्यात येतात, असे त्यांनी शिक्षकाचा पेशा स्वीकारला त्याच दिवशी ठरविले असावे. हा गुरू पहिली चार वर्षे अनिष्ट होऊन माझ्या राशीला आला होता. त्या काळात प्रत्येक वर्गाला स्वतंत्र खोली आणि स्वतंत्र मास्तर, अशी चैन परवडत नसे. पाचव्या जॉर्ज बादशहाच्या कडक पहाऱ्याखाली एका तबेलेवजा जागेत शाळा भरे. एका वर्गाला दोन-दोन बाकडी पुरत. भिंतीवरच्च बिगर यत्ता, पहिली, दुसरी अशा पाट्या असत. फक्त चौथीच्या वर्गाला स्वतंत्र ओसरी असे. आणि निराळे मास्तर. तीन वर्ग दामलेमास्तर हाकीत. आणि बिगारी हा वर्ग मानला, तर चार.

दामलेमास्तर चौफेर शिकवीत. एका तोंडाने दुसरीला हिशेब, हाताने पहिलीतल्या मुलाच्या विधात्याने केवळ शिक्षाच करण्यासाठी निर्माण केलेल्या भागावरून चिंचेचा फोक उठवण्याचे कार्य, तिसरीला शुद्धलेखन, तेवढ्यात एखाद्या मुलाने धरलेले अंगठे सोडले की "बघतॉय हां वास्या!" आणि मधूनच तपकीर ओढणे—एवढ्या क्रिया जोडीजोडीने चालत. त्या तबेल्यातल्या गरीब प्रजेवर एखाद्या सुलतानासारखे ते राज्य करीत. त्यांच्या बोलण्यातला कुठला भाग कुठल्या वर्गासाठी आहे, हे आम्हांला शोधून काढावे लागे. "एका हौदाला—हणम्या, सोडून काढीन—दोन तोट्या आहेत. त्यांतली—तुझ्या बापान् दीर्घ काढली होती का तिखटातली ती? शंभर वेळा लिही तिखट—एका तोटीतून—जन्या, पुढें ये—कर हात पुढें—तुम्ही पाट्या पाडा रे—गांग्या, कान धर त्याचा—पाणी सोडलें तर दोन तास—कावळ्ये, परकरातून काय खातॅयस?—पस्तीस मिनिटें—तो मांग शेजारच्या भंग्याशी बोलतोय, पाहातॉय मी—पाहातॉय—वीस सेकंदांत रिकामा होतो. दुसरा नळ सोडला तर—ए रेड्या, उभा राहा बाकावर—नाडी काय चोखतोयस? बाप उपाशी घालतो काय तुझा!—

तर दोन तास—पंचेचाळीस मिनिटे—हें शुद्धलेखन काढलंयस का हगलायस पाटीवर?—पुन्हा काढ—आज वागळ्याचा विन्या का नाही रे आला?—चूप! काही नको जायला त्याच्या घरी आणायला! उटले सगळे मर्तिकाला निघाल्यासारखे —आणि दहा सेकंदांत भरतो—"

ह्या सगळ्या गुंत्यातून गणित घेणारा वर्ग गणित टिपून घेई. रेड्याला नेमके आपल्याला हाक मारल्याचे कळे. हात पुढे करण्याचे समन्स आलेला आरोपी ते हातावर बजावून घेऊन काखेत हात घालून जागेवर जाई. कुणी अंगठे धरले आहेत, दोन-पाच जण बाकांवर उभे आहेत, कुणाला भिंतीकडे तोंड करून उभे केले आहे, कुणी माराने कळवळून रडतो आहे, आणि बाकीची प्रजा भेदरलेल्या डोळ्यांनी ह्या सुलतानाचे हुकूम पाळीत घंटेची वाट पाहत बसली आहे—ते एक कुणाही सहृदय माणसाचे अंतःकरण भरून यावे, असे दृश्य असायचे. दामलेमास्तर चुकूनसुद्धा आजारी पडत नसत. चौथीचे सोळणकरमास्तर अधूनमधून छान आजारी पडायचे. वर्गातल्या मुलांना गोष्टी सांगून हसवायचे. आम्ही ह्या सुरवातीच्या यत्तांचे कष्ट शेवटी सोळणकर-मास्तरांच्या वर्गात जायला मिळावे, म्हणून सोशीत होतो. पण नशीब हे आपल्या इच्छेप्रमाणे वागत नाही, हा धडा फार बालपणी मिळाला. आणि त्या यत्तेवर पुन्हा दामलेमास्तरांचीच नेमणूक होऊन खालच्या यत्तांना मुलांच्या बरोबर गाणी म्हणणारे दुसरे मास्तर आले.

शालेय जीवनात गणित, भाषा, इतिहास, भूगोल, ड्रॉइंग आणि व्यायाम हे षड्रिपू. त्यांतला गणित हा बलाढ्य. पण मला सगळेच सारखे होते. मी ह्यांपैकी एकाही विषयात गचकलो नाही, पण कुणाशीही मैत्री जमवली नाही. एखाद्या दुबळ्या राष्ट्राने सर्वांशी मित्रभाव ठेवून असावे, तसा राहिलो. पण ह्या सान्या विषयांची माझ्या बालपणाला वाळवी लागली होती. रात्रंदिवस ती माझे बाल्य पोखरीत होती. मी पाढे धडाधड म्हणत असे, पण घाबरून. त्यांतल्या तेरा, सतरा, एकोणीस, तेवीस आणि एकोणतीस यांच्या पाढ्यांना मी आजही भितो. त्या संकटातून सुटत सुटत विसाच्या किंवा तिसाच्या पाढ्यावर आलो की आपल्या पोटात एक चिमुकले भांडे आहे, आणि त्यात जीव नावाची वस्तू पडल्यावर गार वाटते, याचा मी प्रत्यक्ष अनुभव घेतलेला आहे. मॅट्रिक नावाच्या जीवावरच्या दुखण्यातून उठल्यानंतर पुन्हा माझा कधीही ह्या तेरा-सतरा-एकोणीस-एकोणतिसांशी संबंध आला नाही. पाउणकी, सवायकी, अकरकी, औटकी ह्यांतली प्रत्येक गतजन्मीची चेटकी आहे, ह्यावर माझा नितांत विश्वास बसायचा. चेटक्या लहान पोरांना पळवतात म्हणे. ह्या चेटक्यांनी माझे बाल्य पळवले. दामलेमास्तरांना बाल्यं आलेच नसावे. माझ्या वर्गातल्या अच्च्या वायंगणकराने एकदा मला हळूच सांगितले होते की, "ते खरे हरणटोळ आहेत. पण दिवसा मास्तरचे रूप घेऊन येतात." सगळी पोरे त्यांचा हळूच 'हरणटोळ' असाच उल्लेख करीत. हरणटोळ नावाचा हिरवाचार साप म्हणे माणसाच्या टाळूचा चावा घेतो. दामले-मास्तरांनी आमच्या चिमुकल्या डोक्यांची तीच दुर्दशा चालवली होती. पाढे, हिशेब

आणि गणिते ही त्यांची आवडती हत्यारे. आम्हांला डोक्याबरोबर डोळे बिघडवणाऱ्या बारीक टायपात छापलेले गोखल्यांचे अंकगणित असे. इतके कुरूप पुस्तक त्यानंतर माझ्या पाहण्यात नाही. गणितवाले गोखले तेच गोपाळ कृष्ण गोखले हे कळल्यावर पुढल्या सर्व पिढ्या त्यांना सोडून गांधींच्या मागे कां गेल्या, हे गणित मला अचानक सुटले. अलीकडेच मी एक गणिताचे पुस्तक पाहिले. ते गणिताचे आहे यावर माझा विश्वासच बसेना. गणिताच्या पुस्तकात चित्रे ! माझ्या नासलेल्या बालपणी ड्राइंगच्या पुस्तकातदेखील ज्या रेघोट्या असत त्यांना चित्र म्हणणे जिवावर येई. भूगोलाच्या पुस्तकात एकच चित्र राजाबाई टॉवर आणि वसईचा पूल असा निरनिराळा मजकूर घालून छापले होते. राजाबाई टॉवरचेच चित्र आडवे छापून त्याच्याखाली 'वसईचा पूल' असे लिहिले होते, हे मला फार उशिरा कळले. ह्या गणिताच्या पुस्तकात चित्रे पाहून मला ते गोखल्यांचे अंकगणित आठवले, आणि भडभडून आले. गोखल्यांच्या गणितातला "बाळे लीलावती, तुजसाठी मी कर्णभूषणे आणली." यासारखा वात्सल्य-पूर्ण मजकूर वगळला, तर बाकीचे सारे पुस्तक फुटके आणि गळके हौद, पाली, अ-ब- आणि क-नामक मजूर, असल्या दुर्गंधीनेच भरलेले असायचे. हे चित्रमय गणित पाहून मला तर धक्का बसला. तेव्हापासून सिनेमानटीच्या अंगोपांगांचे दर्शन घड-विणारी चित्रे घातलेली पंचांगेदेखील पाहायची मी माझ्या मनाची तयारी ठेवली आहे.

ह्या मानाने माझ्या पिढीने खूपच सोसले. या नव्या चित्रमय गणितातले गणित तरी किती गोड शब्दांत घातले होते :

"बाळांनो, (आमच्या वेळी हा शब्द शाळेत मोठ्याने उच्चारायची शाळाखात्याने मास्तरमंडळींना बंदी केली होती. आम्हांला बाळपण नव्हतेच, कारटेपण होते.) तुम्हांला चाकलेट आवडते ना ! अरविंदाच्या वाढदिवसाला त्याच्या आईने शंभर चाकलेटे आणली होती. गोडगोड चाकलेटे. सुंदर सुंदर चाकलेटे. तुम्ही चांद्या जमवता ना ? त्यांत बांधलेली. किती ! शं...भ...र ! अबब..."

पुढले गणित वाचताना मला हुंदका आला. एक तर बाळ ह्या शब्दाप्रमाणे वाढ-दिवस हाही शब्द आमच्याकालीन मराठीत नव्हता. नवीन वर्ष लागल्याची घोषणा "घोडा नऊ वर्षांचा झाला, तरी लोळतोय बघा कसा गाढवासारखा !" अशा शब्दांत होई. गाढवाचे लाथ मारण्याचे हक्क घोषणा करणाऱ्याच्या स्वाधीन असत. जिथे वाढदिवसच नाही, तिथे चाकलेट कुठले ? आम्ही क्वचित खाल्ल्या त्या चाक्या. आणि जेम्स नावाच्या साहेबाने खास हिंदी पोरांच्या पोटात चिकटा धरावा ह्या उद्देशाने काढलेली बटणबिस्कुटे. त्या बिस्कुटांचेही उभ्या चिमटीने दोन भाग करून पुरवून पुरवून खावे लागत. असली वाढदिवसाची प्रेमळ गणिते माझ्या बालपणी असती, तर भारताला आणखी एका भास्कराचार्याला का मुकावे लागले असते ?

गणिताचे एक जाऊ द्या. नसते एकेकाच्या नशिबात. निदान कविता तरी ? दामले-मास्तरांच्या हिरव्या रंगाच्या प्रेमात पूर्वजन्मीच्या हरणटोळाप्रमाणे इस्लामच्या हिरव्या प्रेमाने पेटलेल्या औरंगजेबाचाही अंश असावा. कवितेला चाल लावणे हे त्यांना

अजिबात मंजूर नव्हते. ते ज्या आवाजाने 'भातें पिकुनी पिवळीं झालीं' म्हणत, तो ऐकून हिरवी भाते पिवळी झाली असती. दिपोटी येत, त्यांच्यासमोर दामलेमास्तरांच्या घराण्यात शिकलेल्या आम्हां विद्यार्थ्यांचे 'सुसांगति सॅदा घाडो सुजॅन वॅक्य कॅनी पॅडॉ' सुरू झाले की त्या बिचाऱ्याच्या पगडीच्या झिरमिळ्यादेखील 'कलंक मतिचा' झडल्यासारख्या झडत.

शाळेला काही लोक कोंडवाडा म्हणतात. आमचा कोंडवाडा नव्हता; कसाईखाना होता. तीन वर्ग मिळून तीस-चाळीस कोकरे आणि दामलेमास्तर नामक कसाई. त्या वेळचे शाळाखातेदेखील काय खाऊन ती गणित, भूगोल, इतिहास वगैरे पुस्तके लिहीत याचे संशोधन करणे आवश्यक आहे. एकट्या दामलेमास्तरांनाच काय दोष द्यायचा ? अनेकांच्या सुऱ्या आमच्या कोवळ्या मानेवरून फिरत. त्या सामुदायिक कत्तलीत तत्कालीन आईबापे आणि पंक्तीचे पाहुणेही मोठ्या हौसेने भाग घेत. त्यामुळे शाळेत खाल्लेला मार काखेत दडवून ठेवावा लागे. तो दिसला, तर पुन्हा एकदा समाचार घेतला जाण्याची शक्यता होती.

पुस्ती नावाची एक मांडी मोडून आणि मानेवर खडा ठेवून भोगायची शिक्षा असे. पुस्त्या काढण्याचा अक्षर सुधारण्याशी सुतराम संबंध नाही. अक्षर हे आवाजासारखें मुळातच गोड हवे. चांगली पुस्ती काढणाऱ्या मुलांचे अक्षर पहिल्या श्रीच्याच दिवशी चांगले असते. मी चार वर्षे पुस्त्या काढल्या. पण माझ्या अक्षराने आपला हट्ट कधीही सोडला नाही. एक तर बोरू ही वस्तूच मला कधी आवडली नाही. दौतीत बुडवून त्याला पुस्तीच्या वहीवर टेकला रे टेकला, की वहीवर त्याचा अश्रुपात होई. अक्षर चांगले हवे हे मला कळत असे, पण वळत नसे. नुसत्या पुस्त्या काढताना लागणाऱ्या रगीने नव्हे, तर जोडीला बोटांवर उभी पट्टी मारली तरच अक्षर सुधारते, अशी दामले-मास्तरांची खात्री होती. मी पुस्ती काढल्याचा पुरावा सदऱ्यावरच अधिक असायचा. त्या पुस्तीपायी मी फार हालअपेष्टा भोगल्या.

माझे बालजीवन होरपळून टाकण्याची पहिली जबाबदारी दामलेमास्तरांनी घेतली, आणि नंतर अनेक मास्तरांनी तिला हातभार लावला. 'भाषा' हा माझा अत्यंत आवडीचा विषय. मागल्या बाकावर बसून ती वापरीत राहण्याचा मला अनावर मोह होई. शाळेत खाल्लेल्या एकूण मारापैकी तीनचतुर्थांश मार मी बोलण्याबद्दल खाल्ला आहे. आमच्या काळात सगळ्या शाळांचे बोधचिन्ह "गप्प बसा" असे होते. 'न हि ज्ञानेन सदृशम्', 'प्रज्वालितो ज्ञानमयः प्रदीपः', 'निर्वाहः प्रतिपन्न', 'मामनुस्मर' या साऱ्यांचा अर्थ 'गप्प बसा' असाच करण्यात येत असे. शाळेचा पहिला दिवस मला आठवतो. कैदी कितीही निर्ढावला, तरी त्याला तुरुंगाच्या गजाआडचा पहिला प्रवेश विसरणे शक्य नाही. मुलांना डबा भरून देऊन, छान कपडे घालून शाळेत पोहोचविणाऱ्या आया त्या वेळी जन्माला यायच्या होत्या. आसपासच्या चार पोरांच्या घोळक्यात पोर ढकलून दिले, की पोर आपोआप जाऊन शाळेला लागे. त्यानंतर महिन्याची फी देताना ते शाळेत जाते याचे जन्मदात्यांना स्मरण होई. कधी तरी

तीनचार वर्षांतून एखाद्या वेळी बापच मुलाला विचारीत असे, "गधड्या, कितवीत आहेस रे?"

"तिसरीत." गधडा सांगे.

मास्तरांचे त्या काळी गुर्जी झाले नव्हते, तसेच आईबापांचे पालक झाले नव्हते. 'पालक' हा तत्कालीन मराठीत एक पालेभाजीचा प्रकार होता. वर्गातदेखील मास्तर पालकाचा उल्लेख "बाप मेला काय लेका तुझा?" असा निर्मळपणे करीत. एकूणच स्वच्छ आणि साधा जमाना होता तो. शाळेतले बापाचे येणे हे बाप, मुलगा आणि मास्तर या तिघांनाही रुचत नसे. परस्परांचे हे संबंध संपूर्ण तिरस्कारावर आधारलेले असत. चुकून वडलांनी मुलाच्या प्रगतीची पृच्छा करणारी चिठी पाठविलीच, तर "तुझ्या बापाला सांग, म्हणावं, आम्ही हजामती करीत नाही इथं." हे उत्तर येई. ह्या वाक्याचा वर्गातल्या न्हाव्याच्या मुलालाही राग येत नसे. आता हेडमास्तरांचे मुख्याध्यापक झाल्यापासून त्यांचे आणि पालकांचे मेळावे भरतात. पूर्वी ह्या दोन्ही शत्रूंशी निरनिराळ्या आघाड्यांवर लढावे लागे. आणि मार हा निमूटपणेच खाल्ला पाहिजे, असा दंडक होता. मास्तरांनी छडी मारल्यावर जर रडावेसे वाटले, तर मोकळे-पणाने रडता येत नसे. "रडायला काय झालं? बाप मेला का लेका?" हे पुन्हा वर. मार हा हसतहसत खाऊन, आभाराचे भाषण करून खाली बसावे, अशी ह्या गुरुजनांची अपेक्षा असावी. सवयीने न रडता मार खाता येत असे, आणि कोडगेपणा नावाचा एक असामान्य दैवी गुण वाढीला लागे. ह्याच गुणाचा अमर्याद विकास झाला, की त्यातून स्वतःच्या पोरांना अमेरिकेला पाठवून दुसऱ्यांच्या मुलांना सूतकताईत घालणारे पुढारी तयार होतात; फसवाफसवीवर आधारलेले धंदे करून गीतामंदिरे बांधणारे भगवद्भक्त पुंजीपती उत्पन्न होतात; हातभट्टीची झोकून दारूबंदीप्रचार समितीचे अध्यक्ष होतात. इहपरलोकी कल्याण करणारा हा गुण आहे.

इंग्रजांच्या राज्यावर सूर्य न मावळण्याचे ते दिवस. त्यामुळे स्वदेश, स्वभाषा, स्वधर्म यांविषयी चुकूनही प्रेम उत्पन्न होऊ न देण्याची शाळाखाते भरपूर खबरदारी घेई. 'भाषा'नामक विषयाचे गद्य आणि पद्य असे ठळक दोन हिस्से वाटले होते. जे गद्य नाही ते पद्य, आणि जे पद्य नाही ते गद्य असे. पद्यातले आणि गद्यातले तलाठ्याने काढून दिल्यासारखे उतारे असत. भाषा ह्या विषयावर प्रेम निर्माण होण्याचा संशय उत्पन्न झाला, की त्याच्यावर एक-एक उतारा लागू पडे. लेखन हे ऱ्हस्व, दीर्घ, अनुस्वार आणि विरामचिन्हे एवढ्यांचा योग्य उपयोग करता येण्याइतके सीमित असे. पद्य म्हणजे पाठ करायच्या मात्रेचे वळसे, एवढाच अर्थ होता. उदाहरणार्थ "प्रफुल्ल होवोनि सुपुष्प ठेले" ह्या ओळीत फुलासंबंधी काही आनंददायक बातमी आहे याचा पत्ताही लावून देण्यात येत नसे. कारण ती ओळ आपल्या करड्या आवाजात वाचून मास्तर कडाडत, "ठेले म्हणजे काय? —ठाकले!" ठेले–ठाकले अशासारखे शब्द टो टो करीत आले, की ते सुपुष्प नावाचे प्रकरण रामोश्यासारखे खांद्यावर फरशी घेऊन उभे राहिल्यासारखे वाटे. ते

पद्य गर्भगळित होऊन पाठ करावे लागे. किंबहुना, भीतीपोटीच ते पाट होई. पाठ्य पुस्तकात मुलांना आवडेल असा मजकूर शिरू न देण्याची शाळाखाते विलक्षण खबरदारी घेई. मोरोपंत, वामनपंडित वगैरे पद्यविभागातले मातबर अधिकारी अन्वयार्थ नावाच्या चरकात आमचे शैशव पिळून काढीत. काशीकर, कवीश्वर, निजामपूरकर-बोवा असल्या भरघोस नावांच्या कीर्तनकारांच्या तोंडी खडीसाखरेसारखी लागणारी आर्या वर्गात उतारा होऊन आली की काडेचिराइतासारखी व्हायची. जमिनीत रुतलेले कर्णाचे चाक काढण्यासाठी त्या बिचाऱ्याची चाललेली आटापीट पाहून माझे बालमन भरून येई. ड्रायव्हर कसा का असेना, पण टायर बसली की त्याचा चेहरा पंक्चरून जातो. त्यातून, का कोण जाणे, उपजताच नदीच्या पाण्यात सोडून दिलेल्या कर्णाविषयी मला फार प्रेम वाटे. अर्जुन हा इसम त्याच्याशी फारच रडीचा डाव खेळत होता. कर्णाने "रथचक्र उद्धरू दे..." असे अर्जुनाला सांगून गल्लीतल्या गोटी ब्याटमध्ये घालतात तसा 'टायम प्लीज' (उच्चारी—टॅम फ्लेज) घातला होता, तरी त्याने त्याच्यावर बाण मारला. हे म्हणजे, बोलरला टाइम प्लीज घालून, हंपायरला किरंगळी दाखवून, ब्याटसमनने रस्त्याच्या कडेला बसावे, आणि इकडे त्याची दांडी उडवून त्याला औट करावे, त्यासारखे झाले. कृष्णाचे वागणेसुद्धा अगदीच त्रिकेखाव हंपायर-सारखे होते. हा असला रडीचा डाव खेळणारा अर्जुन मला कधीच आवडला नाही. म्हणूनच शेवटी चोरांनी त्याला खिंडीत गाठून चोपला. रडीचा डाव खडी म्हणतात ते काय खोटे आहे? माझ्या ह्या मौलिक संशोधनाचे कधीच कौतुक झाले नाही. 'गप्प बसा' संस्कृतीत शंका विचारणे हा गुन्हा होता. "द्रौपदी कपाळावर कुंकवाचे पाच ठिपके लावीत होती का?" ह्या प्रश्नात खरे म्हणजे मार खाण्यासारखे काय होते? पण मी खाल्ला आहे. मोरोपंतनामक कवीने तर पहिली-दुसरी ते मॅट्रिकपर्यंत नुसता छळ मांडला होता. कीर्तनकारांनी जर ह्या आर्या-साक्या-दिंड्यांच्या बोथाट्या सफाईदार फिरवल्या नसत्या, तर पंतकाव्याबद्दल आजन्म तिरस्कार उत्पन्न व्हावा, अशी कामगिरी शाळाशाळांतून चालली होती. कविता ही अन्वयार्थाची रांग लावण्याची सवय व्हावी म्हणूनच करतात, अशी समजूत होती. उनाड मुले ही जशी कधी ओळीने चालत नाहीत, तसे हे शब्द नेहमी क्यू मोडून यायचे. मग त्यांचा कान पकडून त्यांना नीट रांगेत उभे करायचे. "न धरीं शस्त्र करीं मी गोष्टी सांगेन युक्तिच्या चार" म्हणजे काय ते नीट कळले तरीदेखील "मी शस्त्र करीं न धरीं चार युक्तिच्या गोष्टी सांगेन" अशी त्या शब्दांची वेवस्था करून, मी म्हणजे मी, शस्त्र म्हणजे हत्यार, करीं म्हणजे हातात,—करीत हा प्रवास चालत असे. त्या वेळी जशी झोप आली तशी पुढे आधुनिक नाटके पाहतानादेखील आली नाही. मग कवितेत काही 'गण' असायचे, त्यांचा पत्ता लावावा लागे. 'मामा' कुठे आला, 'गागा' कुठे सांडला, हे शोधून काढायला लागे. संधी आणि समास यांचा गुंता सोडवायचा. द्वंद्व, द्विगू वगैरे भटजींची सोय पाहावी लागे. काही वृत्तांच्या नावांचा आणि देशी औषधांच्या नावांचा असा काही घोटाळा होत असे की एकदा 'उपेंद्रवज्रा'ऐवजी मी 'दद्रुगजकेसरी'

असे वृत्ताचे नाव दिल्यामुळे मास्तरांनी माझा लघू कान गुरू केला होता. 'तभजाज-गौगा' नावाचा काही गुण असलेली 'वसंततिलका' आणि यौवनाचा आनंद मनमुराद लुटायला लावणारी 'वसंतगुटिका' नामक काही अपरिचित चीज ह्यांचा गोंधळ केल्यामुळे पाठ मऊ झाली होती. थोडक्यात म्हणजे फणस सोलतात तशी कविता सोलायची आणि गरे फेकून देऊन बाकीचा भाग चावत चावत बसायचे, असे हे शिक्षण चाले. इंग्रजी दुसरीत गोळे नावाचे एक मास्तर आम्हांला कविता शिकवीत. म्हणजे वेळापत्रकात मराठी पद्य नावाचा रकाना असे तो वर्गात येऊन स्वतःच्या अस्तित्वाने भरत. गोपाळ कृष्ण गोखल्यांनी एका भावी भास्कराचार्यांची मुळी लहानपणीच उपटली, आणि ह्या गोळ्यांनी मराठीतल्या एका होनहार महाकवीची भ्रूणहत्या केली. हे गोळेमास्तर सगळ्या कविता "कळविण्यास अत्यंत दुःख होत आहे की" ह्या सुरावर वाचायचे. 'गोपिकाबाईचा पुत्रशोक' आणि 'म्हातारी उडतां नयेचि तिजला' ह्या दोनच कविता त्यांनी अतितन्मयतेने वाचल्या. अर्धवट झोपेत आणि अर्धवट बेशुद्ध अशा अवस्थेत ते एखादा कणकेचा गोळा ठेवल्यासारखे येऊन खुर्चीत बसत आणि तासभर सर्व विद्यार्थ्यांना अगम्य अशा भाषेत बोलत. त्यांच्या तासाला ते आणि मुलेच काय, फळासुद्धा दोन पाय पुढे आणि हात उशाशी घेऊन डुलक्या काढीत पडल्यासारखा दिसे. "खबरदार जर टाच मारुनी जाल पुढे चिंधड्या" अशी दणकेबाज सुरवात असलेली एक कविता आम्हांला असे. गोळेमास्तरांच्या मुखातून ती ऐकताना तो मराठा बहाद्दर बालवीर आपल्या नंग्या तलवारीने बुळबुळीत भेंडी चिरत बसल्यासारखा वाटे. कधीतरी ह्या मृतप्राय अवस्थेतून त्यांना जाग आलीच, तर अत्यंत रडक्या स्वरात मुलांना "तू सांग, तू सांग," करीत शब्दांचा अर्थ सांगायला लावून त्यांची झोपमोड करीत. मराठी शाळेतल्या दामलेमास्तरांनी गणपती तेलंगाने 'पवन' या शब्दाचा अर्थ का कुणाला ठाऊक, पण 'जानवे' असा सांगितल्यामुळे त्याचेच जानवे त्याच्या कानावर लावून त्या क्रियेचे सार्थक होईपर्यंत चिंचेचा फोक त्याच्या अंगभर उठवला होता. वर्गात निदान त्या हाणामारीचे चैतन्य असे. पण शार्दूलविक्रीडितापासून ते पांडव-दिडकी नावाच्या एका हलाखीची परिस्थिती असलेल्या जातीपर्यंत कुठल्याही कवितेला 'राजहंस माझा निजला'ची एकच चाल लावणारे गोळेमास्तर केवळ आपले आडनाव सार्थ करीत जगत असत.

मराठी पद्याची ही अवस्था, तर 'धडे' या नावाने येणाऱ्या गद्य अवताराने त्याहून वैताग आणला होता. प्राथमिक शाळेत 'धट्टीकट्टी गरिबी आणि लुळीपांगळी श्रीमंती' नावाची एक फसवणूक होती. तीत धट्ट्याकट्ट्या गरिबीचा भरपूर उपभोग घेणाऱ्या आम्हां कारकुनांच्या पोरांना रुचिपालट म्हणून लुळीपांगळी तर लुळीपांगळी, श्रीमंती कशी असेल, तिची चव घेण्याचा मोह अनावर होई. पण श्रीमंती आली की पांगळे व्हायला होते हे अशा जोरात ठसवण्यात आले होते की आमच्यापैकी सगळेजण गरिबीच्या मागे लागले. आणि श्रीमंतीसारखे धट्टेकट्टे दुसरे काही नाही हे कळेपर्यंत

बहुतेक पार लुळेपांगळे होऊन गेले. मराठी शाळा सुटून इंग्रजी शाळेत गेल्यावर मिरवणकरमास्तरांनी आमच्या मराठीचा ताबा घेतला होता. मास्तर-मंडळींचे आपण बारसे करायचे असते, हा एक नवीन धडा इंग्रजी शाळेत गेल्यावर शिकलो. हे मिरवणकरमास्तर सदैव वैतागलेले असल्यामुळे मुले त्यांना ' राखुंड्या ' म्हणत. मास्तरांना ही नावे प्रथम कोण देतो हे ओव्यांची पहिली कवयित्री कोण हे शोधून काढण्याइतके अवघड आहे. सगळ्यांनाच मिरवणकरमास्तरांइतकी सकारण टोपणनावे नसतात. संस्कृताच्या शास्त्रीबुवांना ' नादिरशहा ' हे नाव त्यांनी संस्कृताच्या पेपरात चालवलेल्या कत्तलीमुळे मिळाले असेल. पण आम्हांला भूगोल शिकवणाऱ्या एका शिक्षकांना उगीचच आठवा हेन्री म्हणत. ड्रॉइंगमास्तरांना 'दोडका' म्हणण्यासारखी त्यांची आकृती होती, पण इतिहासाच्या एका पन्नाशीपलीकडल्या मास्तरांना 'शेंगदाण्या' का म्हणत त्याचा इतिहास उपलब्ध नाही. 'राखुंड्या' मात्र सदैव डोक्यात राख घातल्यासारखा वागत असे. त्यांचे आणि हेडमास्तरांचे बरे नव्हते. मुलांपुढेही ते हे वैर उघडे करीत. हेडमास्तरांचा उल्लेख 'माय स्वोर्न एनेमी' असा करीत. आपण इंग्रजीचे उस्ताद असूनही ही दरिद्री नेटिव्हांची भाषा शिकवायला लावून आपल्यावर 'इन्जस्टिस्' केला आहे, असा त्यांचा दावा होता. राखुंड्यांचे कुणाशीच पटत नसे. त्यामुळे ते वर्गात येण्यापूर्वी एकदा कुणी तरी बोर्डावर "खालील शब्दांचे अर्थ लिहा" असे लिहून राखुंड्या, भडकू, दुर्वास, यडचाप आणि खवीस ह्या सगळ्या शब्दांचा अर्थ 'मिरवणकर' असा लिहिला होता. मिरवणकरमास्तरांनी वर्गातल्या प्रत्येक मुलाला समोर घेऊन मुस्काटीत मारले होते. त्यांना मराठी ह्या शब्दाविषयीच राग होता, ते तो आमच्यासारख्या मराठी शिकणाऱ्यांच्यावर काढीत. शाळेतले पोर बदडायला पालकाची परवानगी लागत नसे. धर की हाण!

मी शाळेत असताना, राखुंड्याच्याच नव्हे तर एकूणच सगळ्या खातेविभागणीच्या बाबतीत घोटाळा झाला होता. कारण इंग्लिशच्या मास्तरांना (ह्यांना थॉमस् वूल्झे म्हणत) मराठी कवितेची आवड होती. संस्कृतच्या नादिरशाहांचे ड्रॉइंग चांगले होते. ते "पुंडरीक म्हणजेऽऽऽ" असे म्हणून बोर्डावर बऱ्यापैकी कमळ काढीत. इतिहासाच्या मास्तरांना भूगोल प्रिय होता, आणि भूगोलाचे 'आठवे हेन्री' गणित शिकवायला न मिळता भूगोलासारखा बिनशिकवणीचा विषय मिळाला म्हणून टाफडायचे. गणिताचे मास्तर फिजिक्सच्या मास्तरांची अक्कल काढायचे. व्यायाम आणि ड्रॉइंग शिकवायला एकच मास्तर होते. त्यांना आपल्याइतके फाडफाड इंग्रजी बोलणारा साहेबदेखील जन्माला यायचा आहे असे वाटे. ते मराठी शब्ददेखील अशा सफाईने आपल्या इंग्रजी वाक्यात दडपायचे की, पत्ता लागायचा नाही. उच्चारात साहेबी ऐट असायची. त्यांचे लहानपण मनमाडच्या रेल्वे कॉलनीत गेल्यामुळे कानावर तत्कालीन गार्ड, इंजनवाले वगैरे निमगोऱ्या साहेबांचा संस्कार होता. "आय ॲम दठेलिंग ह्यू टु ड्रॉ थिस ठ्यॅब्यॅ ॲंड फूल फॅट्र!" म्हणून तांब्याभांड्याचे चित्र काढायला लावीत. लांब केस मागे फिरवून, हाफ पॅंट आणि स्काउटचा शर्ट घालून, बूटबीट घालून येणारे हे एकच मास्तर.

बाकी बहुतेकांच्या नाकासमोर घातलेल्या टोप्यांखाली झिरो नंबर किंवा वस्तरे फिरवलेले गोटे होते. संस्कृताचे नादिरशहा तर वर्गात आल्यावर डोकीचा रुमाल काढून टेबलावर ठेवीत, आणि "व्हेअर वेअर वुइ लाष्ट टाईऽऽम?" एवढे इंग्रजी बोलून बाकी संस्कृत-इंदु-मराठी करीत. ह्या सर्व असंतुष्ट मंडळींनी माझ्या बालपणाचा खिमा केला.

भूगोल हा विषय मी कां शिकलो, आणि माझ्या बालवयात नको त्या यातना कां भोगल्या, याचा उलगडाच होत नाही. भूगोल आणि इतिहास हे मुळीं आयुष्याची आठ-दहा सोन्यासारखी वर्षे फुकट घालवण्याच्या लायकीचे आहेत, असे मला मुळीच वाटत नाही. तेच, तेच, तेच, तेच, तेच—कितीदा शिकायचे? पृथ्वीच्या पोटा-भोवती विषुववृत्त नावाचा एक पट्टा आहे, हे मी एकदा पहिलीत जे शिकायला सुरवात केली ते आपले मॅट्रिकपर्यंत शिकतच होतो. तीच गत इतिहासाची. शहाजीचा मुलगा शिवाजी याने मावळे गोळा करून मोगलांचा काटा काढला आणि हिंदूंचे राज्य स्थापन केले. एवढ्या एका वाक्यात दामलेमास्तरांनी सारा इतिहास सोपपत्तिक नसला तरी समर्पक रितीने गुंडाळला होता. त्यात त्यानंतर फालतू तपशिलांची भर पडत गेली. मोगलांचा काटा काढला म्हटल्यावर त्यात शाहिस्तेखानाच्या बोटांपासून अफझुल-खानाच्या वाघनखे खुपसलेल्या पोटापर्यंत सारे काही आले होते. पण त्यानंतर त्या इतिहासाला आमच्या बालपणाचा काटा काढायचा होता. म्हणून तहाची कलमे आली, सन आले, वंशावळ्या आल्याने तुघलुघवंश काय, बहामनी काय, मलिकंबर काय, आणि चांदबिब्बी काय! पुढल्या आयुष्यात ज्यांचे अजिबात सोयरसुतक धरावे लागले नाही अशा ह्या महापुरुषांनी त्या रम्य बालपणाची चव घालविली. हाच शिवाजी नाटकात किती मौज करून जाई. इतिहासातला शिवाजी आणि हा शिवाजी ह्यांत वर्गातल्या आणि देवळातल्या आर्येइतका फरक होता. इतिहासातला शिवाजी फक्त सन घोकायला लावीत होता. ग्यादरिंगमधला शिवाजी "माबदौलत, मनसुबा, माय भवानीच्या आशीर्वादाने आणि वाडवडिलांच्या पुण्याईने हिंदुपदपातशाही..." असे बोलायला लागला की ओरडून विचारावेसे वाटे की, "शिवबा, तुम्ही इतिहासात जाण्याऐवजी नाटकातच का नाही हो राहिलात?"

माझ्या लहानपणी साऱ्या चांगल्या चांगल्या गोष्टींचे 'धडे' झाले. 'विषय' झाले. प्रत्येकावर शंभरापैकी इतके, पन्नासापैकी तितके, अशी किंमतीची लेबले लागली. सगळे शिक्षक विद्यार्थ्याला विषयाची गोडी लागेल म्हणून भीत असत. मला मराठी कविता आणि कादंबरी वाचायला अतिशय आवडत असे, पण मराठी हा विषय होऊन पुढे आला, की हलवायाच्या रुचकर मिठाईवर माश्यांची विन्हाडे बसल्यासारखे वाटे. समुद्राच्या लाटा पाहण्यात जरी मी दिवसच्या दिवस घालवले नसले—आणि लाइफ-गार्ड सोडला तर कुणी घालवीतही नसावा—तरीदेखील अधूनमधून मी त्या पाहत असे. पण ह्याच लाटा भूगोलाच्या तासाला गुरुत्वाकर्षण वगैरे भानगडी आणीत. अशा वेळी वाटे की, मीठ आणि मासे उत्पन्न करायला देवाला समुद्र तयार करण्यापलीकडे दुसरे काही कां सुचले नाही? "हे सागरा, तुझ्या अफाट विस्ताराकडे पाहून" अशा

थाटात सुरू होणारा धडा मराठीद्वेष्टे राखुंडे "हे सॅम्रा—तुझ्या ऑफट विहस्थाराकडे फावून—" असा खिस्ती कबरस्तानातल्या पाद्रयाच्या थाटात वाचून आपले इंग्लिश हाय असल्याचे भासवीत आणि त्या शब्दांच्या मजेदार आतषबाजीची होळी पेटवीत. ज्याच्या बापाचे नाव वेंकट आणि मुलाचे नाव मच्छिद्र होते, अशा ह्या काळ्या मेणकापडाच्या वर्णाच्या इसमाने आपल्याला मराठी येत नसल्याची ऐट मिरवण्याचे कारण नव्हते.

जी गत मराठीची तीच इंग्रजीची. दोन 'मेड इन इंग्लंड' गोष्टींविषयी मला खूप प्रेम आहे. एक क्रिकेट आणि दुसरी त्यांची भाषा. ह्या भाषेची मजाच निराळी. फक्त स्पेलिंग वगळून. पण तेच बोकांडी बसले. या भाषेचा स्वादच कुणी घेऊ दिला नाही. धरा शब्द की तोडा स्पेलिंगच्या पाकळ्या. आमच्या नशिबी 'रोज'चा गुलाब न होता 'आर–ओ–एस–ई' व्हायचा. काही काही शब्द लिहिताना आजही त्या शब्दांनी दिलेल्या इंपोजिशनच्या शिक्षेची आठवण होते. 'डिसिप्लिन' हा शब्द मी मोजून हजार वेळा लिहिला होता. अजूनही हा शब्द मी 'डि–आय–एस–पी–एल'—चुकले वाटते—'डी–आय–एस–सी–आय–पी–एल–आय–एन–ई' असा मोठ्याने म्हणत लिहितो. शिस्तीविषयीची शिसारी ह्याच शब्दामुळे माझ्या मनात बसली आहे. 'ऑपोझिट' हाही एक असाच माझ्या विरुद्ध गेलेला शब्द. केवळ धसक्याने त्या शब्दाचे स्पेलिंग मी गडबडीत 'ओ–डबल प्पो–एस–आय–टी–ई' असे सांगितले होते, आणि मास्तरांनी माझे विरुद्ध दिशेचे कान पिळले होते. सुदैवाने त्या वेळी कानावर भिकबाळी नव्हती. धाकट्या भावाच्या मुंजीत ती त्याच्या कानावर गेली. आम्हांला इंग्रजी शिकविणारे मास्तर दशग्रंथी इंग्रजी शिकवीत. त्यामुळे 'यज्ञेनऽ यज्ञ मऽय जन्त देवाः' ह्या चालीवर 'ज्याक् अँड जील—वेऽण्ट अऽऽप् द हीऽऽल टु फेऽच एऽऽऽ पेऽल आफ वाऽटर' चालत असे. मास्तर एक 'गो' धरायचे आणि गो—वेण्ट, गॉन्, गोइंग, इज गोइंग, वॉज गोइंग, विल गो, इज गॉन, वॉज गॉन, विल्बी गॉन, हॅज गॉन, हॅव गॉन करीत त्या 'गो'ला आमच्या मुखातून हाकलीत न्यायचे, आणि आमच्या मुखाचे गोमुख करायचे. जी गत 'गो'ची तीच 'कम'ची आणि साऱ्या इंग्रजी क्रियापदांची! त्यामुळे आम्हांला इंग्रजी कर्ता आला, कर्म आले, क्रियापद आले, फक्त इंग्लिश आले नाही.

आणि ते गणित! आणि त्याहूनही ते शिकवणारे भणगेमास्तर. त्यांनी मला मॅट्रिक-पर्यंत धारेवर धरले. मला विषय यावा म्हणून नव्हे, तर स्वतःच्या जिभेची धार लावण्याचा दगड म्हणून. 'विद्वान' ह्याखेरीज कोणत्याही शब्दाने मला कधी त्यांनी हाक मारली नाही. एवढेच काय, त्यांनी माझे खरे नाव घेतले असते तरी ते मला कळले नसते. गणिताच्या धास्तीने मी मॅट्रिकमध्ये त्या विषयात डिस्टिंक्शन मिळविले. माझा गणिताचा पेपर तपासणारांची बेरीज कच्ची असावी, असाही मला संशय आहे. आपल्या भारतात ते अशक्यही नाही. एखाद्या एकांताच्या क्षणी—म्हणजे मी एकटा असताना—मी विचार करतो की, आपण हे इतके गणित शिकलोच कां?

इतके गणित शिकून आजही ते न शिकलेली भाजीवाली "सतरा पैशे पाव किलोचे आणि यकोणच्याळीस पैसे किलो म्हणजे सव्वा दोन किलोचे झाल्येऽ" हा हिशेब मी त्या भाजीची पिशवीत कोंबाकोंब करण्यापूर्वी संपवते. साहेब, हेडक्लार्क आणि मी; मी, ही आणि हिची आई; शेजारी, घरमालक आणि मी; बस कंडक्टर, एक भांडखोर पॅसेंजर आणि पब्लिक;—असल्या नित्याच्या त्रिकोणांच्या सोडवणुकीचा एकही सिद्धांत भूमितीने सोडवला नाही. प्रेमाचे त्रिकोण वगैरे जीवनातली सॉलिड जॉमेट्री तर सोडाच! त्रिकोणाच्या दोन बाजूंची बेरीज ही तिसऱ्या बाजूपेक्षा अधिक भरते. भरत असेल. बरे, आम्ही हे नाकारीतही नव्हतो. भाईसाहेब चौबळांच्या मुलींची बेरीज त्यांच्या मुलांच्या बेरजेहून अधिक आहे, त्याची कोणी भूमिती नाही ती केली? दोन समांतर रेषा नसतील एकमेकींना भेटत. असतो एकेकीचा स्वभाव. दोन समांतर शेजारी कुठे भेटतात? पर्पेंडिक्युलर, हॉरिझॉंटल असली वल्लभभाई स्टेडियमवरच्या परदेशी कुस्तीगिरांसारखी नावे असलेल्या ह्या उभ्याआडव्या रेषांनी मला निष्कारण पेचात धरले होते. मॅट्रिकनंतर हे लोक पुन्हा कधीही माझ्या आयुष्यात आले नाहीत. पण त्या वेळी जे काही छळून घ्यायचे ते घेतलेच. कंपासपेटी नावाची हरवण्याचा गुणधर्म असलेली वस्तू अशीच टोचून गेली. मी जितक्या कंपासपेट्या घेतल्या, त्यांत एकदेखील वर्तुळाची दोन टोके मिळवणारा कंपास नसे. फूटपट्टीवर चौकोनाच्या एका बाजूचे चार इंच बरोबर येत, पण बाकीच्या तिन्ही बाजू अर्धांगाने लुळ्या पडत. त्यामुळे सारी भूमिती मी इंच इंच लढवीतच शिकलो. ह्या कंपासमध्ये डिव्हायडर नावाची एक वस्तू असे. माझ्या आणि गणिताच्या शिक्षकात फूट पाडण्यापलीकडे ह्या डिव्हायडरने काहीच साधले नाही.

फिजिक्स-केमिस्ट्री नावाचे अही-मही होते. मी शरीरशास्त्र विषय अधिक सोपा आहे, हे ऐकले होते. म्हणून त्या वर्गात जाऊन बसलो. तिथले ते मास्तर वर्गात एक साक्षात हाडांचा सापळा घेऊन जादूगारासारखे शिरले, आणि मी त्या विषयाची धास्तीच घेतली आणि विषय सोडला. खरे म्हणजे भ्यायचे कारण नव्हते. त्या मास्तरांपेक्षा तो हाडांचा सापळाच अंगापिंडाने भरल्यासारखा दिसत होता. पण माणसासारख्या माणसाचा माकडहाड हा आधार आहे, हे ऐकून त्या वर्गात बसवेना. मज्जा, यकृत, प्लीहा, मूत्रपिंड ह्या संस्कृत भाषेतल्या शिव्या आहेत, अशी माझी समजूत होती. जॉमेट्रीत त्रिकोण, चौकोन, वर्तुळे वगैरे होती एवढे तरी स्मरते; पण फिजिक्समधली, आर्किमिडीज नावाचा कुणी संशोधक पाण्यात वस्तू बुडवल्यावर पाणी बाजूला सांडते हा शोध लागल्यावर "युरेका!", "सापडला!" असे ओरडत न्हाणीघरातून उघडाबंब धावत सुटला, ही गोष्ट लक्षात आहे. पण मला ह्या गोष्टीत काहीच स्वारस्य वाटत नाही. केवळ मोठ्यांची छोटी गोष्ट. एक तर इतर अनेक लोकांप्रमाणे तो बाथरूममध्ये जाताना पंचा न्यायला विसरला असेल आणि घरात कुणी नाही असे समजून न्हाणीतून तसाच बाहेर आला असेल. आणि दांडीवर पंचा पाहिल्यावर "अरेच्या! सापडला!" असे ओरडला असेल. त्याचे "युरेका!" ते

काय आणि एवढे कौतुक काय! पण समोरच्या मुलांचा एकही गुण पाहायचा नाही, उलट त्यांना नाउमेद करायचे, आणि कुठल्यातरी पंचेवाल्याचे कौतुक करायचे, ह्यातच आमचा गुरुजन धन्यता मानीत असे. इतिहासाच्या परचुरेमास्तरांचीच गोष्ट आहे. हाताशी चार घोडी, चार रिकामटेकडी पोरे, समोर मोगल आणि आसपास एखादा किल्ला असता, तर कुणीही घेतला असता. पण शिवाजीने गड सर केल्याचा त्रास आम्ही किती म्हणून भोगायचा! नाटकात मी शिवाजीचे काम करून बक्षीस मिळवले. दुसऱ्याच दिवशी हे इतिहासाचे मास्तर अत्यंत खत्रूडपणाने म्हणाले,

"अहो, गोब्राह्मणप्रतिपालक, सातव्या हेन्रीनं काय केलं?"

"आठव्या हेन्रीला जन्म दिला." मी छत्रपतीचे गांभीर्य चेहऱ्यावर ठेवूनच उत्तर दिले. म्याट्रिगमधल्या नाटकातल्या जिरेटोपाचा आणि भवानी तलवारीचा कैफ उतरला नव्हता.

"असं काय? पाटला, मार महाराजांच्या थोबाडीत!"

पाटील कशाला चान्स सोडील?

ह्या परचुऱ्यांना कुणाचेच बरे पाहवत नसे. स्वतःच्या आरशात पाहताना काही प्रसन्न असतील तेव्हढेच. एरवी विलक्षण तिरके बोलायचे. विद्यार्थ्यांचा पाणउतारा करीत राहणे एवढेच त्यांचे जीवितकार्य होते. शिवाजीमहाराजांबद्दल अप्रीती निर्माण करण्याच्या कार्यावर खास औरंगजेबाने नेमणूक केल्यासारखा त्यांनी आम्हांला इतिहास शिकवला. साऱ्या ऐतिहासिक विभूती आमच्या हिशेबी दोन-दोन मार्कांच्या टिपांचे धनी होऊन गेल्या.

खेळ हा बालजीवनातला एक आसरा असतो, म्हणतात. पण ड्रिल्मास्तर नावाच्या शत्रूने तोही उद्ध्वस्त केला. उजवीकडून काही पाहण्यासारखे जात असताना हे ड्रिल्मास्तर नेमके "बायेंऽ निघाऽ!" करायचे. आणि उजव्या बाजूची सिनेमाची जाहिरात वाजतगाजत निघून जाईपर्यंत आमची "बायें निघा" चालायची. हिंदी ह्या भाषेशी पहिला संबंध "दाहिने निघा", "बायें निघा", "कदम खोल" असल्या क्रूर शब्दांतून आल्यामुळे त्या भाषेविषयी मी धास्तीच घेतली आहे. उद्या ही सगळ्या राष्ट्राची भाषा झाल्यावर ड्रिल्मास्तरपुढे आम्ही करीत होतो तसे एका जागी एकदा उजवे आणि एकदा डावे अशी पावले आपटत राहण्याचे धोरण संभाळीत एक इंच-भरही पुढे जाणार नाही, स्वतःचे पाय दमवीत तिथल्या तिथे राहू की काय, अशी भीती उत्पन्न झाली आहे. जेव्हा उजवीकडे पाहायचे तेव्हा डावीकडे पाहणार, आणि समोर पाहायचे तेव्हा 'धुम जाव' करणार! शाळेतल्या क्रीडांगणावर इमारतीच्या काचा फुटतात म्हणून विटीदांडू खेळण्याची बंदी होती, आणि क्रिकेट परवडत नसे. वास्तविक फुटबॉल हा स्वस्त खेळ. पण पोरांनी पायांनी लाथा मारून त्या चेंडूतली हवा घालवली म्हणून हेडमास्तरांनी तो कपाटात घालून ठेवला. माझे बालपण त्या सगळ्यांनी वैयक्तिक आणि सांघिक रितीने नासले.

माझी कोट घालायची हौस आयुष्यात पहिला कोट घालून वर्गात शिरल्यावर "या

नवरदेव!" म्हणून एका शिक्षकाने धुळीला मिळवली. त्यानंतर पुन्हा शाळेतून अखेरची सुटका होईपर्यंत अंगाला कोट लावला नाही. आईने त्याची बरणी घेतली. दामलेमास्तरांच्या तालमीतून बाहेर पडूनही माझा गळा ठिकाणावर होता, पण परचुरे-मास्तरांनी कुठल्याशा लढाईत किती घोडी मेली ते सांगायला चुकल्यावर "बालगंधर्व, शाळा सोडून नाटकात शिरा!" असे कुजकटपणाने सांगितले. ते त्याच वेळी ऐकले असते तर सुखी झालो असतो. सगळेच असे नव्हते; काही भले शिक्षक असत. पण मंगळाच्या मुलीसारखे आम्हांला ते लाभत नसत. ते शाळा सोडून जात. दुसऱ्या वर्गावर जात. आणि ज्यांनी जावे असे वाटे, ते मात्र दगडावरच्या शेवाळासारखे चिकटून बसत. त्यांच्याशी संबंध आला की कपाळमोक्षच.

क्वचित आमच्याही बाजूने आगळीक व्हायची. पण आगळिकीच्या मानाने शिक्षा अमर्याद असे. हणमू खऱ्याने व्हिक्टोरिया राणी ही आठव्या हेन्रीची बायको म्हणून काही गफलत केली असेल, किंवा पानपताच्या युद्धावर सदाशिवरावभाऊंच्या ऐवजी शाळेचे कारकून भाऊराव मेहेंदळे गेले होते, अशी 'क्लेरिकल मिस्टेक' केली असेल. पण म्हणून काय त्याचा पेपर वर्गात वाचून दाखवायचा? वास्तविक समाजाला नवा इतिहास घडविणारे लोक हवेत, असे हेच मास्तर सांगत. हणमू खऱ्याचा प्रयत्न चुकला असेल, पण त्याचा पेपर वाचून दाखवण्यात मास्तरांनी शिक्षक आणि विद्यार्थी ह्यांच्यातला एक गुप्ततेचा करार मोडला होता. पेपर हा प्रेमपत्राइतकाच गुप्त असावा. प्रेमपत्र कितीही 'गो'च्या पुढे शंभर अवग्रह काढल्याइतके 'गोऽऽऽऽड' असले, तरी त्याचे जाहीर वाचन नेहमीच हशा पिकविते. ह्या प्रेमपत्राइतकीच 'पेपर' ही मास्तरांच्या आणि पोरांच्यातली खाजगी भानगड आहे. तिचा बोभाटा मार्कांनी करावा. तपशील उघडा करणे दुष्टपणाचे आहे. पण जाहीर बदनामीत आनंद मानण्याचा सद्गुण मी शाळेतल्या पेपर वाचणाऱ्यांनंतर जाहीर पेपर छापणाऱ्यांतच पाहिला. चार लढाया ह्याच्याऐवजी त्याच्या खात्यावर जात. एखादा त्रिकोण काही अंशांनी युक्लीडसाहेबांच्याच अंगावर आपल्या भुजा उंचावून जाई. एखादे ठोकळ्याचे चित्र ठोकळ्यापलीकडल्या ड्रॉइंगमास्तरासारखे दिसे. एखादा संस्कृताचा प्रत्यय आम्हांला शास्त्रीबुवांहून निराळा येई. म्हणून काय त्याची जाहीर बदनामी? अशा वेळी शाळानामक तुरुंगाच्या भिंती आकाशाला लागत. कोणत्याशा सिंहाच्या गुहेत आत शिरलेल्या जनावरांच्या खुरांचे ठसे दिसत, पण बाहेर येणारांचे दिसत नसत, म्हणतात. शाळेत शिरताना उत्साही असलेले बाल्य अकरा वर्षांनंतर (कुणाला काही अधिक वर्षांची सजा लागे) जळून राख होऊन बाहेर पडत असे.

एवढ्याने जणू काही ते यथेच्छ तुडवून झाले नाही म्हणून पंक्तीचा पाहुणा आपली हौस भागवून घेई. मुलांना जेवताना अभ्यास विचारणारा बाप, पाहुणा, अगर कोणीही असो, त्याला काकामामांशी लढणाऱ्या अर्जुनाचे स्मरण करून शत्रू मानावे. पंगत ही काय समास सोडवायची जागा आहे? पानपतच्या पराजयाची कारणे सांगायचे ठिकाण आहे? अशाच एका पाव्हण्याने मला विचारले,

"काय रे, नेपोलियनाचा जन्म केव्हा झाला?"

"त्याची आई बाळंत झाल्यावर!" मी पोळीबरोबर पाहुण्याचा तुकडा मोडला. त्यानंतर पंक्तीला पाहुणा आला की मला आधी वाढून काढीत. पण हा नैमित्तिक त्रास वाचला, तरी नित्याचे काय?

शाळेत हे चालत नसे. तिथला छळ चालूच होता. भूगोलाच्या मास्तरांनी "मसाल्याची बेटे कुठली?" हा प्रश्न सदैव सुषुम्नावस्थेत असणाऱ्या शामू तळेकरला विचारल्यावर बेडेकर आणि कुबल असे उत्तर देऊन त्याने मान टाकली होती. मास्तरांनी त्याला धरून कुबल कुबल कुबलला! वास्तविक पुढल्या आयुष्यात त्याला हीच माहिती उपयोगी पडली असेल. पण जास्तीत जास्त निरुपयोगी माहिती असलेला मुलगा हुषार अशी आमच्या वेळी समजूत होती. आता वाढदिवसाची आणि चाकलेटांची गणिते आल्यापासून काय झाले असेल, कळत नाही. हल्ली इतिहासाच्या तासाला मावळी नृत्य आणि गणिताच्या तासाला काळ-काम-वेग करणाऱ्या मजुरांची लोकगीते शिकवतात, असे मी ऐकले आहे. माझ्या बालपणी मास्तर फक्त थैमान नावाचा नाच करीत. परवाच कुठेसे वाचले की, आता यापुढे फक्त 'गांधी' तयार करण्याचे शिक्षण देण्यात येणार आहे. ह्या नव्या शाळांचे चित्र काय रमणीय आहे! नव्या मुलांचे बालपण काय आनंदात जाईल! पहिल्या तासाला तासभर प्रार्थना, कारण जगातल्या सर्व धर्मांना एक-एक मिनिट दिले तरी तास गेला. दुसऱ्या तासाला मास्तरांचे मौन. तिसऱ्याला मुलांचे. चौथ्याला सगळ्या शाळेचे. नंतर उपासाचा तास. आणि मग सामुदायिक सत्याग्रह! त्यांतूनही मुलांनी आगळीक केलीच तर मास्तर आमरण उपोषण करणार! नवीन मुलांचा मला हेवा वाटतोय. गांधींनाही वाटला असता. कारण त्यांच्या बालपणी 'गांधी' करण्याच्या शाळा कुठे होत्या? अकरा वर्षे चाललेल्या या निरुपयोगी उद्योगात सारे बालपण पायाखालच्या चटके देणाऱ्या वाळूसारखे सरकले. हाताला चिकटून राहायच्या लायकीचा एकही कण राहिला नाही. साऱ्या हिंदुस्थानचा भूगोल पाठ करकरून तळेगाव दाभाड्याला न जाता ढमढेऱ्यांच्या तळेगावाला कसे पोहोचावे ते कळले नाही. सगळे तर्खडकर आणि काळे कोळून प्याल्यानंतरही, "आमच्या हिच्या हातच्या थालपिठाची सर कश्या-कश्याला नाही" हे वाक्य काही चटकन् इंग्रजीत बोलता येत नाही; की साहेबाला "उद्या सर्वपित्री अमावास्या आहे," हे इंग्रजीत कसे सांगावे ते सुचत नाही. हेच का? आयत्या वेळी उपयोगी पडणारे हाती काहीच लागले नाही. हाती लागला फक्त मार! आणि म्हणूनच त्या बालपणाला ज्या कोणी महाभागाने विद्यार्थि-दशा म्हटले, त्याचे कौतुक करावेसे वाटते!

# माशी

नुकतीच एका औषधाच्या बाटलीत माशी मरून पडलेली आढळली, आणि त्या माशीने देशभर मोठी खळबळ उडवून दिली. औषधात जाऊन मरणे हा चमत्कारिकच योग आहे. औषध पोटात जाऊन माणसे मरू शकतात. पोटात जाणारे औषध आणि बाहेर येणारे प्राण यांची वाटेत गाठ पडल्याचीही कैक उदाहरणे आहेत. पण बंद कुपीत जाऊन आत्महत्या करणे हे एक अजब योगसाधन आहे. पुराणात अद्‌भुत चमत्कार करणाऱ्या ऋषिमुनींनी सूक्ष्म देह धारण करून नाही नाही त्या ठिकाणी प्रवेश केल्याचे दाखले आहेत. बंद कुपीत ही माशी अशीच काही योग-विद्येने तर शिरली नसेल ना ! ती ज्या औषधात मेली ते औषध इतरांना मृत्यूच्या दारातून मागे आणते म्हणतात. स्ट्रेप्टोमायसिन किंवा असेच कुठले तरी 'सिन' करणाऱ्या सरकारी औषधात तिने आत्मार्पण केले. वास्तविक आजच्या जगात माणसांना ही नाना प्रकारची सिन्सच तारतात. अशा वेळी असले हे तारक सिन माशीला मात्र मारक ठरावे, हे एक दैवदुर्विलसित आहे. वास्तविक असे होऊ नये. इतरांना संजीवनी ठरणाऱ्या औषधाने माशीला का जगवू नये ! तिला जगवण्याच्या वाटेवर कुठे माशी शिंकली ! का तीच स्वतः शिंकली !

माशी शिंकण्यावरून आठवले. मी काही स्वतः माशी शिंकताना ऐकली नाही. किंबहुना, मी अनेकांना हा प्रश्न विचारला. पण भुताप्रमाणे हा प्रत्यक्ष अनुभव असलेली माणसे मला आढळली नाहीत. तरीही ती शिंकत असावी. त्याखेरीज लोक उगीच बोलणार नाहीत. नेहमी उघड्यावर वावरणाऱ्या माशीला सर्दी होणे अगदी साहजिकच आहे. प्रस्तुत दिवंगत माशीलादेखील सर्दी झाली असेल. औषधाच्या कारखान्यात अन्यत्र वावरणाऱ्या एखाद्या प्रौढ माशीने तिला सांगितलेही असेल की, "स्ट्रेप्टोमायसिनमध्ये एक बुचकळी घे, आणि दोन दिवस मिठाईवर जरा बेतानं बस. एवढी-एवढी साखर खा पलीकडल्या वाण्याकडील—चांगली उघड्यावर

असते. शाळेपुढं गुडदाणीवाला बसतो, त्याच्या गुडदाणीवर बसत जा पाच मिण्टं —फारच भूक लागली तर! एरवी, थोडा खाण्यावर कंट्रोल हवा!" सरकारी कारखान्यात वावरणारी माशी असल्यामुळे 'कंट्रोल' वगैरे शब्द त्या प्रौढ माशीला येत असावेत. ह्या प्रौढ माशीचे त्या तरुण माशीने ऐकले असावे, आणि सर्दीवर उपाय म्हणून ती बाटलीत शिरली. शिरता शिरता स्वतःच शिंकली आणि तिने हा अनर्थ ओढवून घेतला. तेवढ्यात वरचे झाकण बसले. हा हन्त हन्त! "सर्दी बरी झाल्यावर हलवायाच्या दुकानी जाईन, हॉटेलात इतर मैत्रिणींना भेटायलाही जायचंय. तेवढ्यात रस्त्याच्या कडेला बसणाऱ्या पोरांचंही होईल. दुपारी दोन घटका कुणाच्या तरी तोंडावर बसून येईन. मग जत्रेला जायचंय. काल मुन्शिपाल्टीच्या हापिसातली माशी म्हणाली होती...बाकी त्या हलवायाच्या दुकानातल्या निळ्या माशा स्वतःला फार शहाण्या समजतात—आप्पलपोट्या! आम्हांला जरा बसू देत नाहीत पेढ्यावर! साखरफुटाणे म्हणून तरी किती खायचे! तरी हल्ली पावसानं मेहेरबानी केली आहे. उद्या उघाडी आली की मात्र पंचाईत!..." अशी नाना तऱ्हेची स्वप्ने रंगवीत सर्दी बरी करायला म्हणून बिचारी बाटलीत शिरली, आणि गेली ती गेलीच! पण तिचे बलिदान वाया गेले नाही. जगात अनेक माशा आल्या आणि गेल्या, पण ही माशी अमर झाली. आज ती अमृताच्या पेल्यावर जाऊन बसली असेल. इंद्रचंद्रादी देवांच्या तोंडावर विसावली असेल. कारण मृत्युलोकातदेखील तिच्या मृत्यूबद्दल केवढी प्रचंड खळबळ उडाली. आजवर औषध पिऊन माणसे काय कमी मेली! पण त्यांचे वर्तमानपत्रातून फोटो नाही झळकले. पण ह्या माशीला अग्रपृष्ठाचा आणि अग्रलेखाचा मान मिळाला. माशी मेल्याचे दुःख एवढ्या मोठ्या प्रमाणावर क्वचितच व्यक्त झाले असेल. त्या बाटलीत आपले अतिरम्य पंख पसरून ती दुर्दैवी माशी तरंगत पडली होती. आजवर ती तिथल्या अनेक अधिकाऱ्यांच्या आणि ही सरकारी करामत पाहायला येणाऱ्या मंत्री, मानकरी, पुढारी, पाहुणे यांच्या मुखमंडळाची शोभा वाढवण्यात धन्यता मानीत बसली असेल. सरकारी कचेरीत तिच्या सख्या-सहेल्यांची शिकार करीत बसलेल्या अनेक वरिष्ठ-कनिष्ठ अधिकाऱ्यांना हुलकावण्या देत तिने त्यांचा वेळ घालवला असेल. पण शेवटी औषधाची धार हेच तिचे धारातीर्थ ठरले. माशी मेल्याचे दुःख नाही, पण अशाने सरकार सोकावते.

सकाळच्या चहाबरोबर वर्तमानपत्र वाचताना त्या मृत माशीचे ते अंत्यदर्शन पाहून भडभडून आले. समोरच्या कषायपेयपात्रावर वर्तमानपत्र टाकीत नवीन मक्षिकांची आत्महत्या टाळायची खबरदारी घेत मी त्या कुपीतल्या मृत मक्षिकेला उद्देशून ती प्रसिद्ध विलापिका गाऊ लागलो :

*अहह! आम्रफलमोसम येइल*
*अम्हि असूं परि तूं नसशील*
*फेकुं सालटिं चोखुनि चोखुनी*
*तुजविना परि जातिल वाळुनी*

एक माशी गेली, म्हणून जग काही ओस पडत नाही. पण हळहळ वाटल्याखेरीज कशी राहील? विशेषतः माझ्या कनवाळू भारतीय अंतःकरणाला तर फार दुःख झाले. साखरेचे खाणार त्याला देव देणार, म्हणतात. माशी तर सदैव साखरेचेच खाणार! तिच्याइतकी गुळाची चव असलेले प्राणी क्वचित आढळतील. क्वचित ती आपल्या आहारात बदल करते. माणसासारखी माणसे नाही श्वापदांचा आहार करीत? तिथे माशीनेच काय घोडे मारले आहे? माणसाला जरी ही निष्कारण दुसऱ्याचे घोडे मारायची सवय असली, तरी माशीचे मात्र घोड्यावर फार प्रेम असते. बाकी माशीचे हे सगळे घोड्याचे, गोडाधोडाचे आणि क्वचित प्रसंगी उकिरडा फुंकण्याचे किंवा घाणीत तोंड घालण्याचे प्रेम पाहिले, की गतजन्मीची राजघराण्यातली मंडळी पुढला जन्म माशीचा घेऊन येतात की काय, असे वाटते.

पाश्चात्य देशांतले लोक मात्र माशीला उगीचच भितात. घरात एक माशी दिसली की वाघ शिरल्यासारखा हलकल्लोळ होतो. फवारे काय मारतील, माश्या मारायचे जाळीदार थापटणे घेऊन जिथे-जिथे ती बसली असेल ती जागा बदडून काय काढतील. त्या भिण्याला काही सुमार नाही. काळ-वेळ नाही. एका इंग्रज मित्राच्या घरी मी एकदा जेवायला गेलो होतो. पहिले सूप आले. (भारतीय संस्कृतीतला आणि पाश्चात्त्य संस्कृतीतला हा भेद चिंत्य आहे. ते सूप आले की जेवण सुरू करतात, आपण हातात सूप घेऊन आलो की मांडवातले पाहुणे पांगतात.) माझा इंग्रज मित्र चमचा सुपात बुडविणार, इतक्यात त्याच्या बायकोने काडकन त्याच्या तोंडात वाजवली. ती बराच वेळ आपल्या नवऱ्याच्या चेहऱ्याकडे निरखून पाहत होती. पण मी तो पाश्चात्त्य प्रेमाचा भाग समजत होतो. आपल्याकडे चारचौघांतच नवराबायको तोंडाला तोंड देत नाहीत. त्यांच्याकडे चारचौघांत अधिक देतात. त्यांच्या सरकारी अधिकाऱ्यांचे तिथे मुळीच लक्ष नाही. तोंडात फाडकन बसल्यावर माझा इंग्रज मित्र एकदम कावराबावरा झाला. दुसऱ्या क्षणी "सापडली!" म्हणून मड्डम ओरडली. त्यानेही सुपात नजर टाकून "डार्लिंग" म्हणून तिचे प्रेमभराने चुंबन घेतले. चौकशीअंती उघडकीला आली ती गोष्ट अशी. गेला तासभर साहेबाच्या चेहऱ्यावर माशी बसली होती. उडत नव्हती. ती माझ्याही लक्षात आली होती. किंबहुना, साहेबाच्या गालावरच्या दोन गोष्टी माझ्या लक्षात आल्या होत्या. एक म्हणजे त्याच्या उजव्या गालावर लिपस्टिकचा ठसा उमटला होता. आणि त्या लाल धनुष्यावरच माशी बसली होती. बंदुकीवर माशी असते, पण धनुष्यावर असते, ह्याचे मला नवल वाटले. मी साहेबाला सावध करणार होतो. कारण साहेब झाला, तरी तो एक हाडामासाचा नवरा होता. त्याची दुःखे एक समदुःखी नवरा म्हणून मला कळत होती. कचेरीतली त्याची सेक्रेटरी मुलगी माझ्याकडे पाहूनदेखील हळूच गोड हसली होती. तिथे साहेब तर गोरापान! त्याच्यावर ती निश्चित खूष असणार. त्यामुळे ते लाल इंद्रधनुष्य पाहून माझे अंतःकरण वर्डस्वर्थसारखे नसले तरी निराळ्या अर्थाने उडाले होते. त्यामुळे त्या मुखभंगाचा मी निराळा अर्थ लावला. पण माझा रहस्यकथांचा व्यासंग मोठा, त्यामुळे कार्य-

कारणभाव चुकीचे लावण्याकडे ओढा अधिक! वस्तुस्थिती अशी होती की, सकाळपासून घरात एक माशी शिरली होती! "ओ, दॅट् हॉरिबल थिंग!" कोकणात "चुलीवर फुरसं बसलं होतं" हे वाक्यदेखील बायका सहज म्हणतात. पण मडमेने "माशी शिरली" ह्या वाक्याला भुवया वर नेल्या, ओठांचा चंबू केला, आपले सोनेरी सोनेरी केस उडवले, आणि दोन्ही हातांनी भरतनाट्यम्‌मधल्या नर्तकी जसा शहारा आणल्याचा अभिनय करतात तसा केला. दिवसभर ती त्या माशीच्या मागे होती. (तिचा नवरा त्या सेक्रेटरी पोरीमागे असतो तशी!) "शेवटी डार्लिंग, मला एक ट्रिक सुचली. मी लिपस्टिकमध्ये चुइंग गम मिसळून—माझ्या लाडक्या राजा, (इंग्रजीचे हे मराठी भाषांतर सुपरिचित असावे.) माझ्या ओठाला लावलं, आणि तू आल्याबरोबर तुझं चुंबन घेतलं. तुझ्या चेहऱ्यावर माशी बसणार, ही मला खात्री. त्यातून लिपस्टिकच्या ठशात च्युइंग गमचा स्वीटनेस होता ना माझ्या सशा, तेव्हा ती डेव्हिलिश माशी तिथंच बसून राहिली—आणि आता बरोबर सापडली! ती बघ सुपात मरून पडली आहे!"

पिपात उंदीर मेल्यावर काव्य झाले. एक क्रौंच मेल्यावर महाकाव्य झाले. सुपातली माशी मात्र तशीच मेली. तिच्या मृतदेहावर ना कुणी स्तोत्र गाइले, ना कुणी फुले वाहिली. मला त्या दिवशी जेवण गेले नाही. मी मनातल्या मनात "सुपात मेली माशी! उपाशी" हे "होई विजयी तूं रंभे शुभांगे"च्या चालीवर रचण्याचा प्रयत्न केला. पण जमले नाही. प्रस्तुत कथेचा बोध एवढाच की, साहेब आणि मडुम माशीला भितात. ह्याचे कारण काय? त्यांनी माशीला फक्त एकाच दृष्टिकोणातून पाहिले. ते माशीला 'फ्लाय' म्हणतात. उडते ती माशी! पहिली गोष्ट म्हणजे हा शब्द अतिव्याप्तीचा दोष घेऊन आला आहे. उडणाऱ्या सर्व वस्तू 'माशी' कशा? अत्तर उडून जाते. कावळे उडतात. हा सर्व उडुगण असताना माशीच तेवढी उडते म्हणून हिणवणे अयोग्य आहे. ह्या विधानाने साहेबाचा राग होईल. कदाचित भारत-इंग्लंड आंतरराष्ट्रीय संबंधही बिघडतील. पण माशी हा आम्हां भारतीयांचाही मानबिंदू आहे. किंबहुना, भारतात माणसांहून माश्या अधिक आहेत. 'वंदे मातरम्' हा 'वंदे मच्छरम्'चा अपभ्रंश आहे, हे पटवणे अवघड नाही. एवढेच काय, पण "माती असशी मातित मिळशी" हे मुळात "माशी असशी माशित मिळशी" होते, हेच खरे!

माशी आपल्या पायाने रोग नेते, असा एक सार्वत्रिक गैरसमज आहे. भारतात तरी रोग आपल्या पायाने चालत येतात. त्यांना माशीचा आधार लागत नाही. शतकानुशतके आम्ही आणि माश्या गुण्यागोविंदाने नांदलो आहो. कम्युनिस्ट चीनमध्ये चिन्यांनी किती अब्ज, किती लाख आणि किती हजार माश्या मारल्या, ह्याचा हिशेबही म्हणे एकं दहं म्हणत एकेका माशीला मारीत केला होता. माणसे मारण्याचे सोडून कम्युनिस्ट देश माश्या केव्हापासून मारीत बसले? भारत सध्या उत्पादनवाढीच्या मार्गावर आहे. आम्हांला आमच्या भारतीय माशीचा अभिमान आहे. किंबहुना,

मध्यंतरी आमचा राष्ट्रीय पक्षी कोणता, असा वाद चालला होता. मी माशीच्या बाजूचा आहे. कारण माशी माझ्या बाजूला असते. माशी हा पक्षी नाही, असेही काही लोक म्हणतील. दोन पंखांचा हा उडता प्राणी जर पक्षी नसेल तर कारभारच आटोपला!

मला पुष्कळदा शंका येते—माशीचे पुल्लिंग काय? आणि डासाचे स्त्रीलिंग काय? मासा हे माशीचे पुल्लिंग नव्हे, आणि माशी हे माशाचे स्त्रीलिंग नव्हे. माशाचे स्त्रीलिंग मासळी, मासोळी असे होते. मग माशीचे काय फक्त स्त्रीराज्यच आहे की काय? कारवारी भाषेत माशीला 'मूस' म्हणतात. तिथे मात्र मूस पुल्लिंगी! माझी आजी मला सांगत असे की, 'मूस' बाहेर पडताना आपल्या बायकोला सांगतो की, रात्री माझी जेवणाला वाट पाहू नकोस. आलो तर येईन! कारण बाहेर पडलेला 'मूस' जिवंत परतेलच याची खात्री नाही! हर हर!

मला माश्या मारणाऱ्याचा फार राग येतो. हातात ते जाळीदार उलथणे घेऊन फटाक-फटाक करीत माणसे माश्या कशा मारतात, मला कळत नाही. मी एकदा तो प्रयत्न केला. माझी पत्नी मात्र सफाईने माश्या मारते. जातीला जात वैरी म्हणतात ते खोटे नाही. काही हॉटेलांतून कागदाच्या पट्ट्यांवर डिंक लावून माश्या पकडतात. हा दुष्टपणा आहे. जीवदयामंडळ इथे लक्ष का देत नाही? का त्यांचेही सदस्य माश्या मारीत बसले आहेत?

ह्या साऱ्या दुःखात एकच सुख आहे की, जगातल्या निदान एका माशीच्या मृत्यूची तरी आता चौकशी होईल. मरणालादेखील सरकारी महत्त्व यावे लागते, तेव्हाच हे भाग्य लाभते. एरवी, ती बाटली उघडकीला आली नसती, तरीदेखील ती माशी असंख्य माणसांना 'मारता मारता मरावे' म्हणत मेली असती. कसेही पाहिले, तरी तिचे ते राष्ट्रीय बाटलीतले बलिदान व्यर्थ गेले नसते.

त्या मज्जितमक्षिकेस माझे प्रणाम!

# साता वारांची कहाणी

माझी आजी लहानपणी मला एक सात वारांची कहाणी सांगत असे. मला ती कहाणी आज आठवत नाही, पण ती सांगणारा आजीचा थरथरता मंद आवाज आठवतो. वास्तविक ह्या कहाण्या म्हणजे झोपेच्या बाळगोळ्या होत्या. मंद प्रकाश, तुडुंब भरलेले पोट, आजीचा अधूनमधून पाठीवरून फिरणारा हात आणि मायेने भरलेल्या शब्दांची संथ धार ह्या रसायनातून ती बाळगोळी तयार व्हायची. आजीच्या प्रत्येक वाक्यानंतर "हूं" म्हणावे लागे. पाचसात मिनिटांत हे 'हूं' मंदावत जाई. मग पायांवरचे पांघरूण कमरेवर येई. आणि आजीची गोष्ट संपता संपता कष्टाने डोळ्यांबाहेर ठेवलेली झोप डोळ्यांत शिरे. ह्या नित्य कार्यक्रमामुळे सलग गोष्टी स्मरत नाहीत. पण ही साता वारांची कहाणी अर्धवट अर्धवट आठवते. ह्या कहाणीत सात वार सात भाऊ होते.

पूर्वी म्हणजे फार फार पूर्वी...हो, तेव्हा आताच्यासारखं नव्हतं, तेव्हा डोंगरांना पंख होते, आणि पशुपक्षी माणसांसारखं बोलत होते. झाडं बोलत होती,...त्या वेळी पूर्वेला ह्या वारांचा एक म्हणे मोठा महाल होता. त्याला सात दालनं होती. हे सात भाऊ त्या एका मोठ्या महालात राहायचे खरे, पण त्यांना एकमेकांच्या दालनात जायची परवानगी नव्हती. ते फक्त दिवाणखान्यात भेटू शकत. तिथं सगळ्या सुखसोयी होत्या.—इथे आजीच्या सुखसोयीच्या कल्पना येत. सुस्वर गाणारे पक्षी, हिऱ्या-मोत्यांनी जडवलेली दारांखिडक्यांची तोरणं, सोन्याच्या समया, आणि बागेत बारमहा फळं देणारी हापूसची झाडं, कडबोळ्यांच्या वेली, लाडवांचे वृक्ष, करंज्यांची रोपं, त्यांना लहान-लहान वांग्यांसारख्या करंज्या लागत. कितीही खाल्लं तरी न संपणारी श्रीखंडाची वाटी आणि कितीही ओतलं तरी न संपणाऱ्या दुधाची चरवी. एवढं सगळं असलं, तरी ह्या वारांना एक दुःख होतं,—म्हणजे एकाला दुसऱ्याच्या खोलीत न जाण्याच्या नियमाचं! त्यांच्यावर पहारा करायला इंद्रानं एक यक्ष नेमला होता. तो

यक्ष त्यांना वाटेल ते देत असे. पण जरा कुठे सोमवार मंगळवारच्या खोलीकडे गेला की ओरडत असे, "सबूर!" आजीच्या गोष्टीतला यक्ष हिंदी बोलायचा. त्यामुळे यक्ष हा साधारणपणे आमच्या चाळीतल्या भय्यासारखा दिसणारा इसम असावा, असे मला वाटे. आमच्या चाळीतला भय्यादेखील एरवी प्रेमळ होता. पण आम्हांला चाळीपुढल्या अंगणात गोटीबॅट खेळू देत नसे. रस्त्यात घालवायचा. यक्ष भय्यासारखा दिसतो ही कल्पना माझ्या डोक्यात इतकी ठाम बसली आहे की, कालिदासाच्या विरही यक्षाचे चित्रदेखील माझ्या डोळ्यांपुढे भय्याच्या स्वरूपात येते. बाकी स्वतःचा देश टाकून, घरवालीला आणि बालबच्चांना सोडून मुंबईत दूध वाटायला आणि चाळीची बिले गोळा करायला आलेले हे पुरभय्ये एका अर्थी चिरविरहीच! आजीच्या गोष्टीतल्या यक्षाचा मला राग येई. मला हे कळत नसे की, सात भाऊ एका महालात राहणारे; गेला एक भाऊ दुसऱ्याच्या खोलीत, तर याचे काय बिघडले? पण तो झाला, तरी इंद्राच्या हुकुमाचा ताबेदार! इंद्र हा गृहस्थ मला कधीच आवडला नाही. सदैव ह्या ना त्या कारणाने हलणाऱ्या सिंहासनावर बसून अमृत पीत अप्सरांचा नाच पाहणे आणि ऋषींचा तपोभंग करणे एवढेच काम करणाऱ्या ह्या इसमाला देवांनी आपला राजा म्हणून कसे काय मानले, हे मला कळत नसे. विशेषतः सती अहिल्येच्या प्रकरणात तो माझा लहानपणापासून वैरी झाला होता. तात्पर्य, आजीच्या गोष्टीतल्या सात वारांना सर्व सुखसोयी—न संपणारी श्रीखंडाची वाटीसुद्धा—देऊन त्यांना एकाला दुसऱ्याच्या खोलीत जायची परवानगी त्याने देऊ नये हा अन्याय होता. बाकी सर्व परवानग्या होत्या. ह्या साती भावांना प्रवासाचा खूप षोक. सूर्योदयाबरोबर हातात हात घालून हे त्रिखंडाचा प्रवास करून संध्याकाळी परत येत. तिथेही एक अट होती. वाटेत कुठे थांबायचे नाही, नि जरादेखील मागे वळून पाहायचे नाही. तरीदेखील हे भाऊ रोज भल्या पहाटेला निघायचे. खूप खूप हिंडायचे. बरे, सगळे भाऊ दिसायला सारखे, एका रूपाचे. त्यामुळे लोकांनादेखील थोरला कुठचा आणि धाकटा कुठचा हे कळायचे नाही. वास्तविक त्यांच्या स्वभावात तसा फरक होता. त्यातल्या त्यात शनिवारच्या. हा शनिवार सगळ्यांत धाकटा. रविवार सगळ्यांत मोठा. शनिवार अतिशय खट्याळ होता. त्याने एकदा विचार केला, "हा काय ताप आहे? रवीच्या खोलीत काय आहे, मला का पाहायला मिळू नये?" लहानपणी मलादेखील माझ्या कॉलेजात जाणाऱ्या मामाच्या खोलीत जाण्याचे कुतूहल असे. त्याची वरच्या माळ्यावर गच्चीत एकुलती एक खोली होती. आजोबासुद्धा त्या खोलीत जात नसत. आम्ही चुकून त्या खोलीत गेलो, की मामा वसकन अंगावर येई. तो कॉलेजात गेला, की आम्ही त्याच्या दाराच्या फटीतून त्याची खोली पाहत होतो. झकास खोली होती. भिंतीवर खूप बायकांचे फोटो होते. वाढत्या वयाबरोबर त्या बायांची नावेदेखील आम्हांला कळली. आणि मामाचे लग्न झाले; त्यानंतर त्या सगळ्या नट्या भिंतीवरून नाहीशा झाल्या. परवा खूप वर्षांनी आजोळच्या त्या खोलीत गेलो. मार्लिन डिट्रिचच्या जागी साईबाबा पाहिले, आणि मामाची दया आली. एका फळीवर आरसा, तेले आणि फणी-ब्रश

असे. आमच्या घरात भांग पाडणारा तो तेवढा एकच वीर होता. बाकी आमची कॉंपिटिशन कुणाची शेंडी नाकाला लागते याची होती. हल्ली त्या फळीवर तो आरसा आहे. आणि मामाच्या डोक्याला गरगरीत टक्कल आहे. पण आजही त्या खोलीत शिरताना एक चमत्कारिक परकेपणा वाटतो. लहानपणी ती खोली हे कुतूहल होते. इथे तर सात भावांच्या सातही खोल्यांचे कुतूहल! शेवटी शनीने एके दिवशी हिय्या केला. आणि तो हळूच रवीच्या खोलीत गेला. दार उघडून आत पाऊल टाकले. आणि इंद्राच्या सिंहासनाला हादरे बसायला लागले. त्याने एकदम वरुणाला हुकूम सोडला. सगळ्या पृथ्वीचा प्रलय करून टाक! आणि मग प्रचंड प्रलय झाला. शेवटी मग देवांनी प्रार्थना केली, आणि इंद्राचा राग शांत झाला. मात्र त्या प्रलयात वारांचा तो महाल बुडाला. बारा महिने हापूस देणारे झाड (कोकणातल्या आजीची बिचारीची समृद्धीची कल्पना याहून पुढे जात नव्हती!) वाहून गेले, श्रीखंडाची वाटी गेली, करंज्यांची रोपटी गेली, पंखवाले डोंगर बुडाले. इंद्राने साती भावांना विभक्त केले. आणि ताकीद दिली, "याद राखून ठेवा, पुन्हा एकमेकांना भेटायचंदेखील नाही."

आज सातही वारांची सात घरे वेगळीं, चुली वेगळ्या, संसार वेगळे. सगळा शनीचा चावटपणा! पण मला हे कळत नसे की, दुसऱ्या भावाच्या खोलीत एका भावाला जावेसे वाटले, तर त्यात असा काय अपराध झाला? पण आजीच्या गोष्टीतल्या माणसांच्या अटीच चमत्कारिक असायच्या. एका राजाला मूल होत नव्हते. त्याला देवाच्या कृपेने मूल झाले. मात्र अट अशी की, रोज त्या देवाला सतरा पाकळ्यांचे कमळ वाहायचे! आता राजा झाला म्हणून काय झाले? त्या बिचाऱ्याने रोज सतरा पाकळ्यांचे कमळ आणायचे कुठून? पण गोष्ट व्हायची तयार, ती त्यातूनच!

वारांची ही गोष्ट अशीच तयार झाली. त्यातूनच शनिवार नावाच्या गृहस्थावर माझे मन जडले. वास्तविक शनिवार हा इतरांच्या दृष्टीने न-कर्त्याचा वार आहे. पण आजदेखील मला शनिवारचे आकर्षण विलक्षण आहे. शाळेत असताना मी शनिवारची वाट जितकी पाहिली, तितकी रविवारची नाही. एक तर माझ्या लहानपणी महिन्यातला एक रविवार एरंडेलाचा. सगळी वडील मंडळी घरात. त्यामुळे कुणाच्या विड्या आणून दे, कुणाचे निरोप घेऊन जा, कुणाचे पाय चेप, कुणाची पाठ खाजव, बाजारात पळ, या उद्योगांत अर्धा दिवस जायचा, आणि उरलेला अर्धा दिवस सुट्टीचे जादा होमवर्क करण्यात जायचा. काही चतुर मुले शनिवारी अभ्यास उरकीत आणि रविवार मोकळा ठेवीत. हे सारे धोरणी वर्गबंधू आयुष्यात इमानी नवरे आणि पोरांचा अभ्यास घेणारे नेमस्त बाप झाले असावेत. ज्याने शनवाराच्या स्वभावातला खट्याळपणा ओळखला नाही, अर्धाच दिवस पोटासाठी राबून उरलेल्या अर्ध्या दिवसात आणि संपूर्ण रात्रीत गंमत केली नाही, त्याने जीवनातला महत्त्वाचा वार ओळखला नाही. जीवनात रंगणाऱ्या लोकांचा हा वार आहे. शनिवारी संध्याकाळी जसे जग दिसते, तसे रोज

संध्याकाळी ज्यांना पाहता आले, त्यांच्यासारखे भाग्यवान तेच! अर्थात शनिवारचे मोठेपण रविवारच्या मोकळ्या स्वभावामुळे आहे हे अमान्य करू नये. रविवार हा काही झाले तरी 'दादा' आहे. किंबहुना, घरातला कर्ता पुरुष आहे. एकत्र कुटुंबातला कर्ता पुरुष जसा स्वतः भाकरी बांधून कामाला जात नाही, त्याप्रमाणे इतर भावांप्रमाणे हा जरी स्वतः राबत नसला, तरी बाकीचे भाऊ याला मान देतात. हे सारे भाऊ आठवड्याच्या शेवटी याच्या जवळ येतात. सगळ्यांची हा प्रेमाने विचारपूस करतो. जेवू-खाऊ घालतो; आणि दुसऱ्या दिवसापासून सारेजण कामाला लागतात.

ह्या शनवारचे देणे मात्र मोठे आहे. लहानपणी हा मारुतीचा वार म्हणून प्रिय! प्रत्येक वर्गावर्गाचा मारुती असायचा. एक-एक पैसा वर्गणीत नारळ, कापूर आणि साखर यायची. दहा वाजता शाळा सुटली की आरती व्हायची, आणि साखर-नारळ खातखात दुपारचे बेत ठरायचे. घाईघाईने जेवण उरकून 'म्याच' खेळायला किंवा चिंचा पाडायला पळायचे. तरुणपणी शनिवारच्या रात्री मैफिली ऐकण्यात किंवा नाटके पाहण्यात गेल्या. नाटक पाहावे, तर शनिवारी रात्री. परिस्थितीने सकाळीदेखील नाटके पाहायला आणि करायला लावली. पण शनिवारी रात्री जसे नाटक जमते, तसे इतर कुठल्याही वारी रंगत नाही. उद्याच्या रविवारच्या उत्साहात माणसे जमतात. इतर वारी वाढत्या रात्रीबरोबर मनाच्या मागल्या दारी दुसऱ्या दिवसाचे 'राबणे' येऊन उभे राहते. स्टेजवर लहानसहान चूकदेखील माणसे सहन करीत नाहीत. नाटक जरा उशिरा सुरू झाले, किंवा संपले की, "अहो, नोकऱ्या आहेत आम्हांला. उद्याला हापिसं आहेत—" असे ओरडायला लागतात. गाण्या-नाटकाला ही असली किरकीर मानवत नाही. शनिवारी रात्री हा प्रकार नाही. "होऊ दे उशीर, अधिक झोप काढू," असा समंजसपणा दाखवतात. ह्या शनवारचे आणि माझे असे हे प्रेम का जमलेय, कोण जाणे! माझा जन्म शनिवारी झाला होता म्हणूनही असेल. काही लोक शनीचा वार म्हणून या दिवसाला उगीचच दबकतात. वास्तविक शनी ह्या ग्रहाला दबकण्याचे काही कारण नाही. आज साऱ्या जगाचे कर्तृत्व ह्या शनीमुळे आहे. नुसते शांतिपाठ सांगणारा हा 'बुध'जनांपैकी नव्हे. मनात आणील ते करणारा. चांगलेही करणारा, आणि वाईटही करणारा! मंगळासारखा नुसतेच तारवटलेले डोळे घेऊन हिंडणारा नव्हे. मंगळवार हा मला नेहमी गांजेकसासारखा वाटतो. फक्त श्रावणातल्या मंगळवाराचे मात्र ध्यान बदलते. एखाद्या गोऱ्यापान, पण गांजेकस गुंडाने एकाएकी हृदयपरिवर्तन होऊन सद्गुणी व्हायचे ठरवावे, तसे ह्या मंगळवाराचे श्रावणझडी सुरू झाल्या की काहीतरी होते. मंगळवाराचे श्रावणी सौंदर्य अफाट आहे. हा पठ्या त्या वेळी एरवीची सारी उग्रता विसरून कुटुंबातल्या सात्त्विक पुरुषासारखा वागायला लागतो! घरोघर जमलेल्या पोरींना एरवी मनात आणील तर हाताला धरून खेचून फरफटत रस्त्यातून ओढीत नेण्याचे सामर्थ्य असलेल्या ह्या मंगळाचे मंगलात रूपांतर होते. ओठावर आणि हनुवटीवर दाढीची कोवळी पालवी फुटलेल्या काळात ह्या श्रावणातल्या मंगळवाराने आमची शनवाराची दृष्टी आपल्याकडे खेचली होती.

त्यातून पाच मंगळवारांचा श्रावण आला, म्हणजे अधिकच रंग येई. लेकी-सुनांच्या मेळाव्यांतून, हिरव्या पत्रीतून लालसर कळ्या शोभाव्या, तशा (इतरांच्या) लेकी मन वेधून घेत. खालच्या माजघरात मंगळागौरींचा हसण्याखिदळण्याचा धिंगाणा सुरू झाला की, वरच्या खोलीतून पुस्तकावरचे लक्ष उडे. आणि मग कुठे पाणी पिण्याचे निमित्त कर, कुठे माजघरातल्या घड्याळाबरोबर आपले रिस्टवॉच जुळवायला जा, (हे बहुधा फर्स्ट इअरच्या परीक्षेत पास झाल्यावर मिळे!) असली निमित्ते काढून त्या खळखळत्या हास्याच्या काठाकाठाने उगीच एक चक्कर टाकून यावीशी वाटे! अशा वेळी वाटे की, ही श्रावणी मंगळवारची रात्र संपूच नये. तेवढ्यात एखादी जाणती आत्या "काय रे, फारशी तहान लागली तुला?" म्हणून टपली मारी, आणि कानामागे झिणझिणी येई. नेमकी ह्याच वेळी नव्या वहिनींची निळ्या डोळ्यांची धाकटी बहीण आपल्याकडे का पाहत होती हे कोडे उलगडत नसे. आजच दुपारी मधल्या जिन्यात तिने आपल्याला "ऑलजिब्राच्या डिफिकल्ट्या सोडवून द्याल का?" म्हणून प्रश्न विचारला होता. डोक्यात एखाद्या गाण्याच्या चरणासारखा तो प्रश्न घोळत असे. मंगळवार आवडला तो फक्त तेव्हा. एरवी, हा वार सगळ्यांत नावडता. सोमवार हा अत्यंत अरसिक वार! त्याला फक्त पोटासाठी लोकांना राबायला लावायचे, इतकेच माहीत. सोमवार हा घोंगडीची टोपी घालून उभे पांढरे गंध लावतो आणि तांबूस धोतर नेसून डगला घालतो. त्याच्या डोळ्याला जस्ती काड्यांचा चष्मा आहे. हा पिशवी घेऊन वावरत असतो. ह्या वाराचे आणि मोहकपणाचे वावडे आहे. एवढेच नाही, तर हा अत्यंत रुक्ष आहे. हा मासे खात नाही. तसा गुरुवारदेखील कांदा खात नाही. उपास करतो. पण दत्ताचा पेढा खातो. शिकरण खातो. सोमवारला तेही सुख पचत नाही. आदल्या दिवशी रविवार झालेला असतो. त्यामुळे ह्या वाराला पक्वान्न नाही—काही नाही. ह्याला गाणे, नाटक, कशाची आवड नाही. खाली मान घालून राबणारा हा कारकून-वार आहे. दिवाळीच्या सुट्टीनंतर पहिल्या दिवशी पहिल्या तासाला दिवाळीच्या सुट्टीत कोणी कोणी काय काय केले, दिवाळी कशी साजरी केली, यांपैकी एकाही गोष्टीची चौकशी न करता एकदम वर्गात आल्याबरोबर जॉमेट्रीचा थिअरम शिकवायला घेणाऱ्या मास्तरासारखा हा वार आहे. मंगळवार निदान गांजा तरी ओढतो, चिडतो, दांडगाई करतो. पण सोमवार नुसता नाकासमोर जाणारा. सोमवार कधी हसत नाही. मंगळवार हसतो, पण सिनेमातले व्हिलन किंवा राक्षस हसतात तसा हॅ हॅ हॅ हॅ—ह्यांतल्या प्रत्येक 'हॅ'चा उच्चार करून आणि तालांत खांदे उडवून! मला हे हसणे चालेल. पण सोमवारला कसलेच हसणे टाऊक नाही. तो दर रविवारी डोक्याचा गुळगुळीत गोटा करून येतो. आणि त्याच्यावर ती घोंगडीची टोपी घालतो. त्याच्या कानशिलावरून निघून टोपीत जाऊन मिळणारी नागमोडी शीर नेहमी टटतटून फुगलेली असते. आणि त्याच्या त्या हजामत केलेल्या डोक्यावर ती उठून दिसते. हा सोमवार रुक्ष आहे, अरसिक आहे, पण कोणाच्या अध्यात ना मध्यात! आपले काम बरे की आपण बरे! आणि म्हणूनच एखादे दिवशी त्याला सुटी मिळाली की त्याची पंचाईत होते.

दिवसभर बिचारा घरी पडून राहतो. त्याच्या मानाने बुधवार हा मात्र ज्यात त्यात असतो. सात वारांतला हा मधला भाऊ. बुधवार हा थोडक्यात म्हणजे व्रिनबुडबंधू भाऊ आहे. ह्या वाराला कोणत्याही प्रकारचे व्यक्तिमत्त्वच नाही. दिवसाच्या व्यवहारात अकरा-साडेअकराच्या सुमाराला कसलेही वैशिष्ट्य नाही, रंग-रूप-आकार नाही, त्याचप्रमाणे ह्या बुधवाराला काहीही आगापिछा नाही. एखाद्या श्रीमंत कुटुंबात एखाद्या भावाला जसे एखाद्या पेढीवर कोणतेही महत्त्वाचे काम न देता नुसते बसवून ठेवतात, तसे ह्या वाराला दोन्ही बाजूंनी दोन वार देऊन रविवाराने बसवून ठेवले आहे. एका शब्दात सांगायचे, म्हणजे 'भोटम' वार. साऱ्या वर्षात एकदादेखील आपली कर्तब-गारी नोंदवायचा ह्याला प्रसंग येत नाही. काही काळ ह्याने मराठी नाटकाचा षोक केला. पण 'बुधवारचे नाटक होणे' ह्याचा अर्थ ते 'पडणे' असा झाला. एखाद्या शेटजीच्या मुलाने पैशाच्या जोरावर सुरूप बाई पळवावी आणि त्या अजागळ पोरा-बरोबर पळाल्यामुळे बदनाम होण्याऐवजी त्या बाईचे हसे व्हावे, अशातला प्रकार झाला! रुक्ष सोमवार कधीतरी व्रतधारी होतो. मंगळवार श्रावणात कात टाकतो. गुरुवार सदा शुचिर्भूत आहे. शुक्रवार देवीच्या देवळाभोवती शिट्या घालीत हिंडतो, आणि वर्षातून एकदा तरी स्वतःला 'संभावित शुक्रवार' म्हणवून घेतो. पण बुधवारच्या नशिबी काही नाही. हिंदूंचा गुरुवार, मुसलमानांचा शुक्रवार, यहुद्यांचा शनिवार आणि खिस्त्यांचा रविवार. पण बुधवार मात्र कुणाचाच नाही. "हर हर न हिन्दुर्न यवनः" असा हा वार आहे. नाव मात्र मोठे! बाकी एका अर्थी ते योग्यही आहे. समाजात तरी ज्यांना 'बुध-जन' म्हणतात ते "रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति" म्हणण्यापली-कडे दुसरे काय करतात! तापट मंगळवार आणि सौम्य गुरुवार यांच्या मधे उभा राहून हा दोन्हीकडे आपली गचाळ दंतपंक्ती विचकत गुंडांचा आणि संतांचा आशीर्वाद घेऊन स्वतःचे स्थान टिकवू पाहणाऱ्या गावठी पुढाऱ्यासारखा आहे. त्याला कणाच नाही. वर्षातून एकदा तरी हा उभा कसा राहायचा? गुरुवार सज्जन आहे, पण गचाळ नाही. हा दोन-दोन बोटे दाढी वाढवून मातकट धोतर आणि कुडते घालणाऱ्या सज्जनांतला नव्हे. हा मुळातलाच सात्त्विक, सौम्य, हसऱ्या चेहऱ्याचा, सडपातळ, गहू वर्णाचा, मिताहारी. हा शाकाहारी खरा, पण त्या आहाराने अंगावर सात्त्विकतेचे तूप चढून तुकतुकणारा नव्हे. तो तुपकटपणा बुधवारात आहे. तो तूप खाईल आणि मटणाचे सूपही खाईल; फक्त फुकट मिळाले पाहिजे. म्हणून तो कधी मंगळवारचे उरलेले मटण खातो आणि गुरुवारकडची शिक्रणासाठी आणलेल्या केळ्यांतली केळीही ओरपतो. मला शनिवारच्या खालोखाल गुरुवार आवडतो. मुख्य म्हणजे हा व्रत पालन करणारा असूनही मऊ आहे. कडकडीत नाही. सोमवार व्रत पाळतो, तेव्हा काय कडकडीत होतो. गुरुवारचे तसे होत नाही. शनिवारदेखील व्रते करतो. पण तिथेदेखील त्याचा खस्याळ-पणा चालू असतो. सकाळी भूक लागली की म्हणतो, संध्याकाळी उपास करीन, आणि सकाळ निभावली तर संध्याकाळी दोन वेळचे जेवतो. पण हा त्याच्या चावट स्वभावाचा भाग आहे. त्यात ढोंग नाही. शुक्रवारदेखील थोडासा चावट आहे. पण स्वभावात

नव्हे, खाण्यापिण्यात. कुठे चणेच खाईल, फुटाणेच खाईल. हा पठ्ठ्या केसांची झुलपे वाढवून, गळ्यात रुमाल बांधून हिंडतो. दिवसभर काम-बिम करतो, पण संध्याकाळी हातांत जाईचे गजरे घालून, अत्तर लावून हिंडेल. ह्याला उपासतापास टाऊक नाहीत. स्वभावाने अतिशय गुल्ल्या! कपड्यांचा षौकीन! शनिवारला कपड्यांचा षौक नाही. संध्याकाळी नाटकाला किंवा मैफिलीला जाताना नवे कपडे घालील. एरवी शुक्रवारची मुरळी झालेली विजार चढवून भटकेल. वास्तविक शुक्रवार शनिवारासारखा थोडासा रंगेल आहे. पण त्याला गुरुवारच्या सौम्य देखरेखीची किंचित बूज असते. गुरुवारच त्याला उठवून कामाला लावतो.

रविवार मात्र कर्त्या पुरुषाची सगळी जबाबदारी उचलतो. पोराबाळांना एरंडेल दे, कडुलिंबाचा पाला उकळून गरम पाण्याने आंघोळ घाल, बागेतला पाचोळा काढून जाळ, दुपारी जरा गोडाधोडाचे जेवण घाल, वगैरे कार्ये आपल्या देखरेखीने करून घेतो. एका गोष्टीसाठी मात्र मला रविवार आवडतो. तो दुपारी जेवून मस्तपैकी झोपतो. आजोबादेखील वामकुक्षी करीत—चांगली बारा वाजल्यापासून तीन वाजेपर्यंत. मग त्यांना चहासाठी उठवावे लागे. हे काम कठीण होते. पण आजीची त्यालाही युक्ती होती. गजबजत्या कुटुंबात एखादे तरी तान्हे मूल असायचेच! त्याला घेऊन आजोबांच्या झोपायच्या खोलीत जायचे, आणि त्यांच्या श्वासाबरोबर वरखाली होणाऱ्या पोटावर ते रांगते मूल सोडून द्यायचे! ते पोर आपली बाळमूठ उघडून आजोबांच्या पोटावर चापटी मारून 'तॅ पॅ कॅ पॅ' असे काही तरी करी. मग आजोबा जागे होत. आणि संतापाची शीर फुगण्याच्या आत आपल्या पोटापर्यंत चढलेल्या नातवाला पाहिल्यावर "हात् गुलामा!" म्हणून उठत. आजोबा उठले, की घरातला सारा रविवार उठे! आणि आजी हळूच म्हणे, "उठा, चहा झालाय केव्हाचा!" आजोबा उठत आणि आजी मोरीत चूळ भरायला तांब्या ठेवीत असे. चतुर होती माझी आजी. सगळ्या आज्या असतात तशी—वारांची कहाणी सांगणारी आजी!

# मी आणि माझा शत्रुपक्ष

## काही ठळक गनीम

" आता फार झालं ! अरे, माणसाच्या सहनशीलतेला काही मर्यादा आहे. आयुष्यात माणसानं काय काय आणि कां कां म्हणून सोसावं ? सगळे सोडून आम्हांलाच कां धरता ? जणू काय मी त्यांचं देणं लागतो, अशा रितीनं ह्या लोकांची तोंडं मी कां म्हणून चुकवावी ? आमच्यासारख्यांनी आपली दुःखं कुठल्या वेशीवर टांगायची ?"

मी ताडताड ताडताड बोलत होतो. आणि सोन्या बागलाणकर जणू काय मी " एखाद्या नाटकातलं भाषण पाठ करतोय तर करू दे बिचाऱ्याला," अशा अपक्ष भूमिकेवरून मामा सान्यांची मिसळ खात होता. उद्या सोन्या स्वर्गात गेला, आणि तिथल्या एखाद्या उर्वशीने " काय घेणार—अमृत की मिसळ ?" असा त्याला सवाल केला, तर सोन्या " मिसळ. कांद्यात चिकूपणा करू नका," असे तिला बजावील. कांद्याच्या पातळ भाजीत भिजलेला शंकरपाळ्याचा तुकडा चमच्यावर घेऊन कोहिनूर हिऱ्याचा पैलू पाहावा, तसा तो पाहत बसला होता. मी ताडताड बोलत होतो. काही वेळाने बशीतली शेवटली भिजलेली शेव चमच्यात गोळा करून सोन्याने जिभेने चमचा साफ केला, आणि तो थंडपणे बोलता जाहला,

" भडकू नकोस ! मिसळ थंड होते आहे."

" तू खा."

सोन्याने शांतपणाने माझ्या पुढली बशी ओढली आणि म्हणाला, " सांग."

" सोन्या, मामाच्या हॉटेलात पोहोचायला मला साधारणतः किती वेळ लागावा ?"

" कुठून निघालास याच्यावर आहे. वसईहून निघालास, तर दोन तास. दादर स्टेशनवरून दोन मिनिटं."

" ओ॰ के॰, आता दादर स्टेशनवरून मला दोन तास लागले !"

" लंगडी घालत आलास वाटतं ?"

" तरीही इतका वेळ लागला नसता."

"मग ?"

"पापासाहेब घोडचौरे भेटले."

"कोण पापासाहेब ?"

"कोण पापासाहेब ! सांगतो. तुला आठवतंय, आपण गेल्या रविवारी सकाळी 'लॉरेल हार्डी' बघायला जाणार होतो. मॉर्निंग शो."

"तू कुठं आलास ? मी वाट बघून कंटाळलो."

"यस. तो सिनेमा ह्या पापासाहेबांनीच चुकवला."

"कां ?"

"महाबळेश्वरच्या जंगलात अस्वलाची शिकार करायला आपण कसे गेलो होतो ते सांगून—"

"आपण ?"

"म्हणजे पापासाहेब—"

"महाबळेश्वरला अस्वलं आहेत ?"

"एकोणिसशे सत्तावीस साली एक होतं. ते ह्या पापासाहेबानं आणि त्या वेळी सातारा जिल्ह्याचा म्याकमुर्डी नावाचा कलेक्टर होता त्यानं मिळून मारलं. ही गोष्ट मला दादर स्टेशनवर गाठून एकोणिसशे पासष्टच्या इसवीत सांगायची काही गरज होती का ? पण तब्बल दोन तास माझ्या कोटाची कॉलर पकडून त्यांनी मला ऐकवली."

"पण मग तू ऐकलीस कां !"—सोन्या.

"कसं बोललास ! पण आम्ही गाढव ! आमचे कान ही सार्वजनिक मालमत्ता आहे. तुम्ही लकी. तुमची आणि शिकाऱ्यांची ओळख नाही. तुम्ही त्यांची पुस्तकं वाचत नाही. मामाच्या हॉटेलातले ताजे पदार्थ यापलीकडे जगात वाचण्यासारखं काही आहे, हे तुम्हांला मंजूर नाही. आम्ही कथा वाचतो. चुकून त्या वाचल्याबद्दल कुठे तरी बोलून जातो. आणि मग लोक आम्हांला हे असे धरतात. एखाद्या शिकाऱ्याची तुझी ओळख असती, म्हणजे तुला कळलं असतं—"

"शिकारी ?"

"शिकारी ! 'माझा पहिला वाघ', 'माझा बत्तिसावा रानडुक्कर', 'हुप्परगीच्या जंगलात' असले लेख लिहिणारे शिकारी ! निमूटपणे खांद्यावर बंदूक टाकून, गोळ्या झाडून, जनावरांची मढी जीपवर टाकून आणतात, ते नव्हेत हे ! आहे ओळख असल्या शिकाऱ्यांची ?"

"नाही बुवा."

"सुखी आहेस !"

"कां ?"

"ऐक. शिकारीत दर वेळी नवीन लिहिण्यासारखं काय असतं ?"

"काय असणार ? जंगलात गेलं—वाघ, कोल्हं, कुत्रं काय ते मारलं, खाल्लं, न परत आलं." सोन्या वदला.

आता शिकारी हा माझ्या शत्रुपक्षातला महत्त्वाचा गनीम असला, तरी शिकारी लोक वाघ किंवा कोल्हीकुत्री ही खाण्यासाठी मारीत नाहीत हे मला ठाऊक होते. पण सोन्या बागलाणकराला त्या विषयात दुरुस्त करण्याच्या भानगडीत मी पडत नाही. सोन्याची आणि माझी मैत्री ही उपयुक्तपणावर आधारलेली आहे. म्हणजे तो उपयुक्त. सिनेमाची तिकिटे काढणे, पुण्याच्या गाडीत पिशवी टाकून जागा अडवणे, मटार आल्याची बातमी आणणे, टॅक्सी धरणे वगैरे मित्रकार्ये तो करीत असतो. माझ्या-विषयी त्याला एक प्रकारची श्रद्धा आहे. सहावीत त्याचा गणिताचा पेपर मी सोडवला होता, हे तो अजूनही स्मरतो. असली कृतज्ञ माणसे विरळा. 'विरळा' ह्या शब्दाइतकी.

"आता तूच सांग सोन्या. तूच म्हणतोस, तशी ह्या लोकांनी निमूटपणानं शिकार केली असती, तर मी माझ्या खर्चानं त्यांना खाकी हाफ्पँटी पुरवल्या असत्या. पण सौंगड्या, हे एवढ्यावर नाहीत रे थांबत. हे शिकारीच्या कथा लिहितात. तेही सोड. ती पानं उलटता येतात. पण भलत्या ठिकाणी गाठून जेव्हा त्या कथा ऐकवतात, तेव्हा त्याला काय करावं? परवा दत्तू कारेकराच्या भावाच्या लग्नात ह्यानं मला गाठलं, प्लेटभर आइस्क्रीम नाही खाऊ दिलं—एकतीस साली कुठल्याशा जंगलात काय कोल्हं की कुत्रं मारलं होतं, ही कथा तो ऐकवीत होता. अळवेकराची लिली दोनदा समोरून गेली. अक्षर नाही तिच्याशी बोलायला मिळालं. घोडचौऱ्याची शिकार आडवी आली. साले आयुष्यातले असले पृथ्वीमोलाचे क्षण—लीला काय पुन्हा भेटणार होती? पण हा घोडचौऱ्या मला इथं पिदवीत होता, रानडुक्कर कसं मारलं ते सांगून! बरं, तो सुरगडे माहिती आहे?"

"कोण सुरगडे?"

"अण्णासाहेब सुरगडे. हे सगळे शिकारी लेकाचे कोणीतरी साहेब असतात. जगू जोशी किंवा गंपू गणारे किंवा हरी गोरे असली साधी नावं असत नाहीत ह्या शिकाऱ्यांची. दादासाहेब, पापासाहेब, सुभानराव, मार्तंडराव—ह्यांच्या आईबापांना पाळण्यातच कळतं, की पोरगं शिकारी होणार म्हणून! तर अण्णासाहेब सुरगडे—मी पुण्याला राहत होतो ना, तेव्हा आमच्या समोर राहायचा. परवा बोरीबंदरला भेटला. बंदुकीच्या गोळ्या विकत घ्यायला आला होता. मला जायचं होतं कल्याणला. बोरी-बंदरवर अडीच तास त्यानं खाल्ले. सुरगड्याचा सव्विसावा वाघ. गेल्या पंचवीस वाघांत आणि सव्विसाव्यात काही फरक नाही. तेच मचाण, तेच जनावर, तेच हाके, तेच बकरं बांधलेलं आणि तसाच तो वाघ रात्री तीन वाजेपर्यंत आला नाही, आणि मग आला, मग पहिली गोळी नुसतीच कशाला तरी चाटून गेली, दुसरी नेमकी बसली, जनावर तिथे आडवं—आता मला सांग सोन्या, ह्याच्याशी माझा काहीतरी संबंध आहे का? खरं सांगतो तुला, समोर बिनबंदुकीचा शिकारी दिसला, तरी वाघाची नसेल इतकी छाती धडधडते माझी. ह्या सुरगड्यांच्यामुळं माझी आणखी दहाबारा शिकाऱ्यांची ओळख झाली. आता आमची चुकी एवढीच, की एका

शिकाऱ्याकडून ऐकून ती पुरचुंडी दुसऱ्याकडे रिकामी करून भाव खाल्ला. खरं म्हणजे मला पँथर आणि बायसन हे नक्की कोण आहेत, ते ह्या घटकेला ठाऊक नाही."

"मलाही!" सोन्या म्हणाला.

"मला एकदा हा सुरगड्या शिकार दाखवायला माथेरानला घेऊन गेला. आता माथेरान ही काय जंगलात वाघ शोधीत हिंडायची जागा आहे? रात्रभर काऱ्याकुट्यां-तून तंगवीत होता. अख्खी रात्र जिवाची काय म्हणतात ती करून आम्ही आपले पँथर शोधतोय. काटे लागून लागून माझं अंग खरचटलं होतं. सिगरेट ओढायची चोरी. त्या वासानं पँथर पळतो म्हणे. सुरगड्याच्या वटवटीमुळं नाही पळत. सुरगड्याचं सारखं चालू...बरं, ते इतिहासकार लोक तारखा सांगून काव आणतात ना? तसेच हे शिकारी. अठ्ठेचाळीस सालची गोष्ट, मे महिन्याचे दिवस, पौर्णिमा होती, त्या वेळी मी—म्हणजे सुरगड्या—चिक्केहळ्ळीला नुकताच बदलून गेलो होतो. चिक्केहळ्ळी-जवळ दोड्डगुड्डीचं जंगल. सकाळी आपला चहा पीत बसलो होतो. आणि गुड्डिगुडगुडीचे की बिड्डीकुळकुळ्ळीचे कुठलेसे शेतकरी आले. मी म्हटलं,—म्हणजे सुरगड्यानं म्हटलं,—येनरीऽ येन्न समाचारा? शिकारीमुळं लँग्वेजेसवर आपली—म्हणजे सुरगड्याची—भलती कमांड. शेतकरी म्हणाले, स्वामी, नमस्कारा. योड्डमुट्टी जंगल कुडमुडकुडे वाघा गुडमुडगुडे. मी माझी—म्हणजे सुरगड्याने सुरगड्याची—डबल बॅरल खांद्यावर टाकली—"

"जाऊ दे रे. तू स्वच्छ त्यांना सांगत का नाहीस—तू, तुझा वाघ आणि बंदूक गेलात खड्डयात. तेव्हा प्लीज शटाप!"

'शट अप'चा सोन्याने 'शटाप' हाच उच्चार बरोबर आहे म्हणून माझ्याशी वाद केल्याची आठवण ताजी होती, म्हणून मी बोलले नाही.

"सोन्या, 'शटाप' म्हणण्याची आपल्यात ताकद असती, तर काय पाहिजे होतं? अरे, पोष्टातल्या खिडकीपलीकडल्या माणसाकडे मनिआर्डरीचा फार्म मागताना टरकणारा वंश आपला—शिकाऱ्याला काय 'शटाप' म्हणणार! म्हणून तर हे सहन करतो. सुरगड्यांच्या सव्वीस वाघांपैकी प्रत्येकाचा इतिहास ऐकायला आयुष्यातले तीन-तीन तास की रे मोजले आहेत मी. सव्वीस त्रिक किती झाले? असे सुमारे पंधरा शिकारी—म्हणजे सव्वीस गुणिले त्रिक...आपलं तीन, अधिक—नव्हे, गुणिले पंधरा. किती तास झाले?"

"जाऊ दे."

सोन्याला सव्वीस त्रिक किती ते पटकन आठवत नव्हते, हे मी क्षणात ताडले.

"हे बघ, सव्वीस त्रिक म्हणजे पंचवीस त्रिक पंचात्तर अधिक साहि त्रिक अठरा, नाही, त्यापेक्षा वीस त्रिक साठ आणि पाच त्रिक पंध्रा...जाऊ दे, डीटेलवारी सोडून दे, पण खाल्ले की नाही माझ्या आयुष्यातले दोनतीनशे तास? कोणाच्या बापाचे? गेलेलं आयुष्य मिळणार आहे का? शिकारी हे माझे फार मोठे शत्रू आहेत. आपण कधी त्यांना विचारलं आहे—की बुवा तुमचे किती वाघ झाले? 'माझा पहिला वाघ'

ह्या विषयावर एक ओळ न लिहिणारा किंवा बोलणारा शिकारी पाहिला आहेस तू ! कायदा आडवा येतो, नाही तर ह्या शिकाऱ्यांची मुंडकी पेंढा भरून भिंतीला लावली असती. उद्या समज वाघ, लांडगा, सिंह, तरस वगैरे मंडळींनी 'माझ्या हिंस्र जीवनातल्या स्मृती' असं लिहायचं ठरवलं, तर काय होईल ह्या शिकाऱ्यांचं? ती बिचारी मुकी जनावरं, रोज एक तरी शिकार करतात, पण आपल्या गिरगावात सांगायला येतात कधी ? आणि हे ! पँथर मारायला जातात, आणि घरची कोंबडी खाऊन परत येतात. पण कथा चालू. एक वेळ मी वाघाला गोळी घालणार नाही, पण शिकाऱ्याला घालीन. मी जर कधी बंदुकीचं लायसन्स काढलंच,...केवढ्याला मिळत असेल रे ?"

"काय, बंदूक की लायसन्स ?" सोन्या कधीकधी स्वतःला बॅरिस्टर समजतो.

"दोन्ही." मी.

"कमीत कमी हजार-बाराशे रुपये बसतील."

"जाऊ द्या मग. वर गोळ्यांचा खर्च. त्यापेक्षा चालत्या लोकलमधून ढकलून दिलं तर सस्त्यात पडेल."

लोकलच्या गर्दीचा फायदा घेऊन एखाद्या तरी शिकाऱ्याचे सावज करीन, अशी भीष्मप्रतिज्ञा करून मी मिसळीची ऑर्डर दिली.

माझ्या शत्रुपक्षात शिकारी हा आघाडीवरच्या फळीतला आहे. शंभर माणसांत मी शिकारी हुडकून काढीन. पण तो प्रसंग माझ्यावर येत नाही. शिकारीच माझा माग काढीत येतात. वाटेल तिथे भेटतात. आणि सुरू. एकतर मला कुणीही घरातून उठून वाघाच्या, नाहीतर लांडग्याच्या मागे जंगलातून हिंडत राहणे हेच जंगलीपणाचे लक्षण वाटते. पुन्हा ती जनावरे पेंढा भरून भिंतीवर टांगायची. नाहीतर दिवाणखान्यात पसरायची. पेंढा भरलेला एकच वाघ दिवाणखान्यात आडवा टाकणारा मी एकच शिकारी पाहिला. माझे परमवैरी बाबासाहेब उंबरकर. कोल्हापूरला आमच्या घरासमोरच राह्यचे. दर शनिवारी शिकारीला जायचे, आणि न चुकता वाघ मारून रविवारी रात्री परत यायचे. मग सोमवार ते शुक्रवार मला वेळीअवेळी गाठून त्या-त्या वाघाच्या कथा सांगायचे. कितीही चुकवा, मी नेमका त्यांच्या तावडीत सापडत होतो. त्यांच्या घरी 'टाइम्स' येत असल्यामुळे त्या घराशी राजनैतिक संबंध बिघडवून भागणारे नव्हते. दर आठपंधरा दिवसांनी, रविवारी रात्री आठाच्या सुमाराला जीपच्या मागल्या बाजूला एक मेलेला वाघ आडवा टाकून आणायचे. इतक्या वाघांचे ते करतात तरी काय, कळेना. एका रविवारी संध्याकाळी हा हिंस्र गृहस्थ घरात नाही, असे पाहून मी 'वीकली' वाचायला गेलो. वाचून बाहेर पडतो तर बाबासाहेब वाघ टिपून परत ! मी बाबासाहेबांना कॉंग्रॅच्युलेशन्स देऊन 'जनावर' बघावे म्हणून जीपच्या पिछाडीला जातो, तर वाघाचा चेहरा ओळखीचा वाटला. दिवाणखान्यातला पेंढा भरलेला वाघ! बाबासाहेब तो वाघ जंगलात नेऊन पुन्हा पुन्हा मारून आणतात, हे ठाऊक नव्हते मला. घरचा वाघ नेऊन जंगलातल्या वाघांना वेडावून दाखवायला बाबासाहेब जात

असावेत. एकच शिकार, पण कथा दर आठवड्याला नवी. बाबासाहेब हे कलेसाठी कला म्हणून जंगल तुडवीत होते. बाकी दाखवून आलेल्या पहिल्याच चि० सौ० कां० च्या गळ्यात माळ घालणाऱ्या अनेक साहित्यिकांनी शेकडो प्रेमकथा नाही लिहिल्या ? कुणी वाघ मारल्याच्या थापा मारतात, कोणी चार फुटांपलीकडून कानी पडणारे कै० चाफेकळी, कै० बिंबाधर इत्यादी अवयवांतून येत असलेले घोरणे ऐकून न ऐकल्यासारखे करीत तीच तीच कथा एकदा कुठल्या तरी शोभनेच्या, तर एकदा रंजनेच्या, किंवा मोहनेच्या खात्यावर घालीत असतात. शेवटी सगळी धुडे सारखीच!

शिकाऱ्यांचा नक्षा उतरवतील, असेही माझे काही जालीम शत्रू आहेत. नवीन घर बांधलेले किंवा बांधकाम चालू असताना साइटवर नेणारे लोक. कुठल्याही शुभकार्याला मी आनंदाने जातो. पण वास्तुशांतीचे आमंत्रण आले की धडधड सुरू होते. ही माणसे अथपासून इतीपर्यंत घर दाखव दाखव दाखवतात. विशेषतः 'साइट'-वर एखाद्या होतकरू मालकाच्या तावडीत आपण सापडलो, की त्याची आणि आपली भेट झालेल्या क्षणापासून ते पुढले तीनचार तास मातीत गेले, असे मानायला काहीच हरकत नाही. शिकारीच्या कथांप्रमाणे घर बांधणाऱ्यांच्या कथाही एकरंगी आणि एकशिंगी! बहुतेकांना अचानकपणाने आणि स्वस्त्यात प्लॉट मिळालेला असतो. सिमेंट कसे मिळवले, आणि वाघ चालत समोर कसा आला, ह्या दोन्ही कथांचा आत्मा एकच. आपण सिमेंट कसे मिळवले, ही हकीगत इतरांना मनोरंजक वाटेल, असे माणसाला कशामुळे वाटत असावे, कोण जाणे! किती फुटांवर पायाचा दगड लागला ही हकिगत आपण नखे कशी कापली,—स्वतःची, अस्वलाची वगैरे नव्हेत—ह्या हकिगतीइतकीच चित्तथरारक असते.

अगदी अलीकडली गोष्ट. शहर पुणे. दिवस मे महिन्याचे. रामराणा जन्मला ती टळटळीत दुपारची वेळ. नुसता घरनंबर हातात घेऊन मी घर शोधून काढण्याचे धाडस करीत होतो. "हिराबागेपाशी कुणालाही विचारा, खुरमांडीकर—कुणीही सांगेल." एवढा तपशील घेऊन मी वणवणत होतो. अर्धवट पत्ता देऊन 'कुणालाही विचारा, सांगतील,' असे सांगणारी हीदेखील एक शत्रुपक्षातलीच मंडळी आहेत. आपण सारी आळी गाजवून आहोत, हा ह्या लोकांचा समज होण्याचे कारण मला अजून कळले नाही. मी खुरमांडीकरांना शोधीत निघालो होतो. अर्धशिशीवर त्याच्याकडे रामबाण औषध आहे, असे त्याने आदल्याच दिवशी मला सांगितले होते. खुरमांडीकर माझा कोणी नव्हे. माझ्या मित्राच्या ऑफिसातला टायपिस्ट. आणि ही अर्धशिशी मला नाही; आमच्या घरमालकाला. पण होत असेल बरी, तर आणू औषध, म्हणून निघालो. आणि मग "खुरमांडीकर? कोण खुरमांडीकर? घरनंबर काय? नवा शुक्रवार की जुना? आपण तर बुवा नाही ऐकलं— कैच्या-कैच आडनाव आहे," असले शेरे ऐकत मी हिंडत होतो. एका अर्धवट बांधलेल्या घरापुढून जात होतो. इतक्यात हाक आली. मी चमकून पाहिले.

"अरे वा वा वा वा! अलभ्य लाभ!" असे ओरडत आणि बत्तिशीची चौसष्टी

करीत आणि चुनामाती, विटा, राबीट (घरबांधणीत हे 'राबीट' काय असते, मला नक्की माहिती नाही, पण असते. जसे 'ब्रास' नावाचे पितळेशी नाते नसलेले काहीतरी असते, तसे.)—तर ते राबीट आणि लोखंडी सळ्या ह्यांच्यावरून सशीच्या मागे धावणाऱ्या सशासारखा तो गृहस्थ धावत आला. (सशाचे सशी याखेरीज अन्य स्त्रीलिंग असल्यास मला ठाऊक नाही; त्याचप्रमाणे पालीचे पुल्लिंग.)

"काय मोठे लोक!" म्हणत त्याने उगीचच माझे खांदे पकडून मला गदगदा हलवले. 'मोठे लोक' हे संबोधन आणि गदगदा हलवणे ह्या दोन्ही गोष्टींचा मला केवळ तिटकारा आहे. प्रथम मी त्या गृहस्थाला ओळखले नाही. कारण घरबांधणीतला निम्मा चुना तो अंगावर बाळगून होता. त्यामुळे निम्म्या रंगवलेल्या गणपतीसारखा (श्रीगजाननाच्या मूर्तींचे कारखानदार फळीवर मूर्ती अर्धवट रंगवून ठेवतात तेव्हाच्या) दिसत होता. मग मी त्याला ओळखले. कुळकर्णी नावाचे माझे शेकडो लोक परिचयाचे आहेत. त्यांतला हा एक होता. आता काहीतरी विचारायचे म्हणून मी विचारले,

"अरे वा! इकडे कुणीकडे?"

"इकडे कुणीकडे म्हणजे? तुला ठाऊक नाही?" त्याने अतिआश्चर्याने विचारले.

"काय?"

"घर बांधतोय!" कुळकर्णी म्हणाला. मला आधी तो घरबांधणीवरचा मुकादम वाटला होता.

"हो का?"

"हो का म्हणजे? तुला कळलं नाही? कमाल आहे!"

आता कुळकर्णी घर बांधतोय हे मला कळायचे काय कारण? पण बहुतेक घर बांधणाऱ्या लोकांना ते घर बांधून राहिले आहेत, हा साऱ्या राष्ट्राच्या चर्चेचा विषय आहे, असा भ्रम असतो.

"कमाल आहे! (पुन्हा तेच!) तुला वश्या नाही बोलला?"

आता 'वश्या' ह्या नावाने इहलोकात मी कुळकर्णीलोकांप्रमाणे अगणित वश्यांना ओळखतो.

"हो हो, आपला हा 'वश्या' म्हणतोस—"

"जोशी, रे."

"हो. वश्या जोशी." (पुन्हा तीन वश्या जोशी डोळ्यांपुढे चमकले.)

"आपल्या ह्यातला, रे—"

"हो हो, ह्यातला. म्हणाला होता खरा—" ह्या बोलण्याला 'खोटे' म्हणत नाहीत. केवळ आयुष्यातले काही क्षण वाचावेत म्हणून वापरण्यात येणारा हा एक सर्वमान्य तोडगा आहे.

"ये ना, दाखवतो." कुळकर्णी म्हणाला.

"त्याचं काय आहे कुळकर्णी, मी एक पत्ता शोधतोय—"

"अरे, ठाऊक आहे रे—"

आणि कुळकर्ण्याने मला त्या गटारावरून आडव्या टाकलेल्या फळीवरून खेचायला सुरवात केली. एखाद्या बोकडाला "लवकरच तुझ्या मानेवरून मी सुरी फिरवणार आहे," असे खाटकाने सांगितल्यावर तो बोकड ज्या उत्साहाने खाटकाबरोबर जाईल, तितक्याच उत्साहाने मी कुळकर्ण्यामागून त्याचे घर पाहायला गेलो. इथे एक गोष्ट मला स्पष्ट केली पाहिजे. कुळकर्णीच काय, पण कुणीही घर बांधीत असला—नव्हे, ताजमहाल बांधीत असला—तरी मला त्याबद्दल हेवा, असूया, मत्सर काहीही वाटत नाही. ते अंतर्बाह्य दाखवायला जोपर्यंत मला कोणी नेत नाही तोपर्यंत माझ्या मनाला ह्या गोष्टी चाटून जात नाहीत. त्या लपलपत्या फळीवरून चालण्याची सर्कस करीत मी निमूटपणे कुळकर्ण्यामागून गेलो. दगड-विटांचे ढिगारे ओलांडीत, लोखंडी सळ्या चुकवीत जात होतो आणि मला "हो का?", "वा!" यापेक्षा अवाक्षर अधिक बोलू न देता कुळकर्णी बोलत होता.

"तुला आधी प्लॅन दाखवतो."—कुळकर्णी.

एका निळ्या कागदावर ओढलेल्या पांढऱ्या रेघा. फूट गुणिले फूटचे आकडे, आणि ती करामत करणाऱ्या इंजनेराचे नाव, ह्यापलीकडे प्लान पाहून मला इतर कसलाही बोध होत नाही. कुळकर्णी मात्र दिवाळी अंकावरच्या बाईचे चित्र पाहावे, अशा कौतुकाने त्या कागदाकडे पाहत बोलत होता.

"आता ही उत्तर, ही दक्षिण, म्हणजे पूर्व इथे आली—"

"ही पूर्व म्हणजे...फेसिंग ईस्ट!" मी उगीच क्यॅय तरी बोललो.

"म्हणजे ही पश्चिम. म्हणजे हे पाहा, हे असं पूर्वाभिमुख घर आहे."

कुळकर्ण्याच्या पश्चिम टोकावर जायला माझा पाय सळसळत होता. खुरमांडीकर आणि अर्धशिशीचे औषध यांची मला तीव्रतेने जाणीव होत होती. कुळकर्ण्याची मधली वीस-पंचवीस वाक्ये मी कानी घेतली नाहीत.

"हा ड्राइंग हॉल वीस-बाय-चोविसचा आहे."

"अरे वा!" कुळकर्ण्याने एक-बाय-अर्धाचा आहे म्हटले असते, तरी मी "अरे वा!"च म्हटले असते. तिथे काम करणाऱ्या एखाद्या गवंड्याला "भिंतीत चिणून मारण्याची पद्धत काय?" ते विचारावे, असा एक अत्यंत आसुरी विचार माझ्या मनात आला.

"चांगला प्रशस्त धरलाय—म्हणजे डायनिंग-कम-ड्राइंग—"

ह्या कुळकर्ण्याच्या घरी मी डायनिंगलाही जाणार नव्हतो, आणि ड्राइंगला तर मुळीच नाही.

"आता इथं मी काय मजा केली आहे—" कुळकर्णी.

घर बांधण्यातसुद्धा मजा करतात, हे मला प्रथमच कळले. मी उगीच माझ्या आधीच्या दहा पिढ्या इंजिनियरांच्या होत्या आणि माझी अकरावी, अशा बारकाईने तो प्लान पाहू लागलो.

"पण ह्या ड्राइंग हॉलला एंट्रन्स कुठून—"

वास्तविक हा कुळकर्णी, त्याच्या कुळकर्णीणबाई आणि उरलेले कूळ या हॉलमध्ये कशीही शिरली, तरी मला त्याचे सोयरसुतक नव्हते. पण वैताग घालवण्याचे माझे एक तंत्र आहे. शेजारचा रेडियो ठणाणा करायला लागला, की मी ती गाणी माझ्याच-साठी लावली आहेत म्हणून ऐकायला लागतो. वैताग कमी होतो.

"हे बघ, आपण स्टेप बाय स्टेप जाऊ." कुळकर्णी. "ह्या ड्रॉइंग हॉलला बाहेर मी एक रिसेप्शन रूम ठेवली आहे. एकदम बाहेरचा माणूस आत नको यायला. काय ?"

"आँ ! हो. नको यायला. फार येतात माणसं—" पुन्हा मी क्यायच्या क्याय बोलून गेलो.

"चपला इथं काढून ठेवायच्या."

"कुठं ?"

त्या निळ्या कागदावर चपला कुठे काढून ठेवायच्या ते मी पाहू लागलो. त्या कागदाची पुन्हा पुन्हा सुरळी होत होती. ती पुन्हा सरळ करायची. हे प्लानचे कागद कुत्र्याच्या शेपटासारखे. कधीही सरळ नसतात. त्यामुळे त्याची दोन टोके माझ्या हातात आणि दोन कुळकर्ण्याच्या. डोक्यावर ऊन. भोवती चुनामाती, दगड.

"हा दरवाजा इथं. म्हणजे सिटिंग-कम-बेडरूमकडे. हा डायनिंग-कम-ड्रॉइंग हॉल, ही एक स्टडी-कम-गेस्टरूम."

काही वेळाने मला कुळकर्णीसुद्धा माणूस-कम-सैतान वाटायला लागला.

"आता हा वर जायचा दरवाजा."

"म्हणजे दोन मजली आहे ?" मी भेदरून म्हणालो. कारण आणखी एक मजला म्हणजे कुळकर्णी आणखी एक तास खाणार.

"ही शिवाय वर गच्ची आहे."

"वाळत टाकायला वगैरे बरी पडते." गच्चीचा हा एवढाच उपयोग मला आठवला.

"पण मी गच्चीवर टेरेस गार्डन करणार आहे."

ह्या कुळकर्ण्याने गच्चीवर बाग केली काय किंवा तिचा खाली उडी मारण्यासाठी उपयोग केला काय, मला खरोखरीच त्यात इंट्रेस्ट नव्हते. पुढला तासभर कुळकर्णी मला त्या कागदावरून हिंडवीत होता.

"आता हे किचन—इथं सगळ्या सोयी केल्या आहेत. चूलबील सगळं उभ्यानं. भिंतीत तिथल्यातिथं कपाटं. आणि इथे काय मजा केली आहे—" कुळकर्ण्याने कुठे तरी बोट ठेवून दाखवले. मी ती 'मजा' बघायला त्याच्या खांद्यावरून मान खुपसली. "खर-कटी भांडी ह्या खिडकीतून सरकवली, की थेट बाहेरच्या मोरीत. सगळं आटोमेटिक."

"वा: ! ही भलतीच मजा आहे !" हे वास्तविक मी उपरोधाने—म्हणजे ज्याला साधी माणसे थोड्याशा खवचटपणाने म्हणतात—तसा बोललो. पण कुळकर्णी उपरोध ऐकण्यापलीकडे गेला होता.

"म्हणजे भांडी घासणारी बाई आत यायला नको. घासून झाली भांडी की पुन्हा आत सरकवली. सगळं बाहेरच्या बाहेर."

मला घराच्या दारातून कुळ्या आत सरकतोय आणि त्याची बायको त्याच्या तोंडात घास सरकवून त्याला थेट बेडरूममध्ये सरकवतेय, आणि आरे मिल्क कॉलनीतल्या दुधाच्या बाटल्या भरतात तशी एका चकतीवर त्याची पोरे गोल उभी आहेत, आणि त्यांची तोंडे आटोमॅटिक भरली जाताहेत, आणि सरकत्या पट्ट्यावरून ती आपापल्या अंथरुणावर आडवी केली जात आहेत, असले भलतेसलते आटोमेटिक दिसायला लागले.

'सोयी' हा तर नवीन घर बांधणारांच्या घराची माहिती ऐकताना केवळ उच्छाद असतो. भिंतीतली कपाटे, घटकेत कॉटचे टेबल कसे होते, टेबलाच्या खुर्च्या, डायनिंग टेबल-कम-बेड, खिडकीची भिंत, भिंतीच्या फोल्डिंग खाटा, फोल्डिंग किचन, दिवा-कम-फ्लावरपॉट, माती-कम-दगड, एक-ना-दोन. फाटक उघडले, की आतली बेल कशी वाजते, जाताना नाही लावले तर पुन्हा कशी वाजते, त्याचे कौतिक! एका उत्साही घरमालकाने तर बाहेरून बेल दाबल्याबरोबर आत बेल न वाजता दिवा लागतो, आणि मग कुठेशा दडवलेल्या आरशात पाव्हणा दिसतो. तो नको असलेला पाव्हणा असला तर आपण आतून दुसरी बेल दाबायची, म्हणजे मग त्या पाव्हण्याच्या पायाला एक आटोमेटिक कुत्रा चावून फक्त त्याचे धोतर किंवा प्यांट फाडतो, ही सोय आपण कशी केली आहे ते सांगितले होते. आटोमेटिक वरवंटासुद्धा त्याच्या डोक्यात पडायची सोय करता येते, पण तेवढ्यात पाव्हणा जरा सरकला तर फरशी फुटायचा संभव होता, म्हणून त्याने पँट अगर धोतर फाडणारा आटोमेटिक कुत्रा बसवला होता. "या एकदा. दाखवीन मजा." असेही त्याने मला आग्रहाचे आमंत्रण दिले होते. मी माझ्या घरी सार्वजनिक सत्यनारायणाची वर्गणी मागायला आलेल्या एका इसमाला तो पत्ता देऊन "ते फार दानशूर आहेत—जा," म्हणून धाडले होते. शिकाऱ्यालाच पाठवणार होतो. पण शिकारी हाप्पँट घालतात. त्यामुळे नुसत्या पायाला चावला, तर तो आटोमेटिक कुत्रा मोडायचा. अजून मला बरेच लोक त्याच्या घरी पाठवायचे आहेत.

चोवीस तास खेळते पाणी, पश्चिमेचे वारे, गडी-नोकरांना आणि भंग्यांना परस्पर किंवा बाहेरच्या बाहेर यायला-जायला वाटा, अधिक सिमेंट मिळवताना कसा ताप झाला, ह्यातले काहीही न बोलता घर दाखवणारा मालक जर कुणाला भेटला असेल तर मला कळवावे. मी टिळक किंवा लकडी पुलाच्या मध्यावर त्याचा जाहीर मुका घ्यायला तयार आहे. मालकीण असली, तर तिथे मी हिच्याकडून तिची ओटी भरून देईन.

"ह्या दोन बेडरूम्स. त्यांना ही ॲटेच्ड बाथरूम—" कुलकर्ण्याचे संपत नव्हते. (एका बाथरूमला दोन ॲटेच्ड बेडरूम्स का म्हणत नाहीत?) "ये दाखवतो—"

सुमारे तासभर तो प्लॅन दाखवल्यावर त्याने मला बांधकामाच्या दिशेला खेचले.

इतका वेळ तो प्लॅन बघत उभे राहिल्यामुळे पाय ही एक शरीराला जोडलेली नवी व्याधी आहे अशा रितीने ठणकत होते. पुन्हा एकदा त्या लपलपत्या फळ्या चढणे आले.

"संभाळून हं. हे फ्लोअरिंगचं काम ओलं आहे."

मी संभाळून जायला लागलो, तेव्हढ्यात एका लोखंडी सळीने माझ्या धोतराच्या काठाचे चुंबन घेऊन धोतराचा निकाल लावला.

"अर्रर्र! धोतर फाटलं का? म्हणून मी इथं येताना नेहमी हाफ्पॅण्ट घालतो."—कुळकर्ण्या.

मी मनात म्हणालो (आम्ही मनातच म्हणायचे!), "घर तुझं आहे—ते कधी तरी पाहायला जावं लागेल, म्हणून आम्ही काय सदैव चड्डया घालून तयारीत हिंडायचं?" धोतर फाटल्याचे दुःख नव्हते, पण कुळकर्णी सोकावत होता. धोतराचा चांगला वीतभर तुकडा लोंबत होता. एखाद्या पताकेसारखा. तो पायांत येऊन कुळ्याच्या ओल्या फ्लोअरिंगवर माझ्या चेहऱ्याचा शिक्का उमटेल ही वर भीती होती. कुळक्या मात्र सराईतपणाने त्या कडेकपाऱ्यांतून चालत होता.

"जपून हं, वर प्लॅस्टरिंग चाललंय."

हे म्हणेपर्यंत वरच्या गवंड्याच्या थापीतला ऐवज माझ्या उजव्या खांद्यावर पडून माझ्या निळ्या कोटावर नवचित्रकलेचे एक प्रात्यक्षिक झाले.

"अँ! काही नाही, धुतल्यावर जाईल. हा पाहिलास का आमच्या नोकरांचा संडास?"

कुळकर्ण्याच्या नोकरांचा संडास पाहायला मला धुवून कोटाच्या धुलाईचा भुर्दंड भरावा लागणार होता. आणि उजव्या खांद्यावर कोटावरची ती चुनाशिमिटाची चित्रकला वागवीत खुरमांडीकराचा पत्ता शोधीत हिंडायचे होते.

"नोकरांचा संडास इंडियन स्टाइलच ठेवलाय, बाकीची कमोड सिस्टिम." कुळकर्णी हे अगदी खुषीत येऊन सांगत होता.

आता हे समस्त कुळकर्णी वराणे आणि त्यांचे दासदासी आपापली पोटे कुठल्या सिस्टिमने साफ करतात, हे ज्ञान मला कशाला? पण त्यालासुद्धा मी "अरे वा! छान केलंस!" वगैरे शिफारशी दिल्या.

"इथून मात्र जरा जपून हां. भिंतीचा गिलावा खराब करशील. हं—हा जिना. हा असा इथून घेणार." असे म्हणून कुळकर्णी त्या लडबडत्या शिडीवरून टुणटूण करीत वर चढून गेला. मी साऱ्या कुलदेवतांचे स्मरण करून ती शिडी चढायला सुरवात केली. वरून चुनामातीच्या लिबलिबीत मिश्रणाने भरलेले घमेले डोक्यावर घेऊन एक मजूरबाई उतरायला लागली. मी चांगल्या चार पायऱ्या चढून वर आलो होतो. त्यापुढले मला नीटसे आठवत नाही. आठवतो फक्त महिनाभर प्लॅस्टरमध्ये घातलेला पाय, डॉक्टरची बिले आणि बेशुद्ध असताना मी स्लॅब, सिमेंट, कमोड सिस्टिम असले काहीतरी बडबडत होतो यावरून झालेली चेष्टा! बरा होऊन आपल्या

पायांनी टेबलापर्यंत चालत गेलो. टेबलावर कुळकर्णींच्या वास्तुशांतीचे निमंत्रण माझ्याकडे पाहून फिदिफिदी हसत पडले होते.

घर बांधणारे, शिकारी वगैरे गनिमांच्या गोटात मी नेमका जाऊन अडकतो. नुसते एखाद्याने सगळ्या सिस्टिमसकट घर दाखवले तरी मी म्हणतो चालेल. पण दाखवीत असताना सारखी परीक्षा घेत असतात. एका घरमालकाची तर मी सुतार, गवंडी आणि प्लंबर ह्या तिन्ही परीक्षा दिल्या आहेत, अशी समजूत झाली असावी.

"आता ह्या विटा—कुठून मागवल्या असतील, सांगा पाहू?"—पहिला प्रश्न.

गोलंदाजी करावी, तशी बांधकाम ह्या विषयावरची तो माझ्यावर घरंदाजी करीत होता. मी गप्प राहिलो. विटा कुठे मिळतात हे मला ठाऊक असायचे काय कारण आहे? मी प्रश्न टाळावा म्हणून म्हटले,

"विटा ना, वीटबाजारातून." मला वाटले, संबंध संपला. पण नाही. घरे बांधणारे लोक सिमेंट-काँक्रिटच्या सहवासात राहून अभेद्य होतात.

"मला वाटलंच! ह्या बाजारच्या विटा नाहीत. घरी पाडून घेतल्या."

मला फक्त बुंदी घरी पाडता येतात इतपत ज्ञान होते. विटांचे नवीन ऐकत होतो.

"घरी?"

"घरी म्हणजे—स्पेशल भट्टीवर जाऊन. हे पाहा ना, ही बाजारची वीट आणि ही आमची."

मी पुढले दोन तास उजव्या हातात घरची आणि डाव्या हातात बाजारची वीट घेऊन त्याचे घर पाहत हिंडत होतो. एखाद्या गोष्टीचा कंटाळा येण्याला 'वीट येणे' का म्हणतात ते त्या दिवशी कळले.

कुठेही नवीन घराचे बांधकाम दिसले, की मी आपला खाली मान घालून जातो. न जाणो, बांधणारा ओळखीचा निघाला की आली कंबक्ती! पण कधी कधी चांगल्या बांधून राहत्या झालेल्या घरातूनसुद्धा हाक येते. वेळ काय सांगून येते? एका गृहस्थाने स्वतःच्या घरात इतक्या करामती केल्या होत्या, की ते घर आहे की कौरवांचा मोरू करायला बांधलेली मयसभा आहे ते कळेना. भिंत म्हणून कुठेसा टेकलो, तर फळीने ढकलून दिले. भिंतीतून टेबल येणाऱ्या गुंडीलाच मी टेकलो होतो. वॉश बेसिनपाशी गेलो आणि हात पुढे केल्यावर आपोआप पाणी आले. नळाला पाणी येते ह्या गोष्टीवरचा माझा विश्वासच उडाला आहे. सैप्या—म्हणजे स्वातंत्र्यप्राप्तीनंतर—आम्ही मुंबईकर नळाची जितकी प्रतीक्षा करतो, तितकी कुणीही केली नसेल. दमयंतीनेसुद्धा. आणि इथे आपोआप पाणी. माझी त्रेधा पाहताना तो घरमालक आणि त्याचे समस्त कुटुंब मनसोक्त हसत होते.

"इथं प्रत्येक गोष्ट आपोआप होते, साहेब."

मला 'मोठे लोक' आणि 'साहेब' ह्या संबोधनांनी हाक मारणारांना कधीही सद्गती लाभणार नाही. 'मोठे लोक' म्हणणारांना रौरव आणि 'साहेब' म्हणणारांना कुंभीपाक! अजून सुप्रिंटेंडेण्ट म्हणून पर्मनन्ट नाही—'मोठे लोक' काय, 'साहेब' काय, छयाः!

"ही पहा, आटोमॅटिक चूल."

मी बरणीतल्या चकल्या पाहत होतो. मला मात्र चहाबरोबर ग्लूको बिस्कीट, आणि इथे बरणीत तुडुंब भरलेल्या चकल्या! मी एक वेळ काड्याची पेटी चहात बुडवून आनंदाने खाईन. पण ग्लूको बिस्कीट माझे डोकेच काय, पण मज्जातंतूपासून अंगठ्याचे जे कोणी तंतू असतील तेथपर्यंतच्या तंतू, अस्थी, यकृत, प्लीहा वगैरे सर्वेंद्रियांना धक्का देऊन जाते.

"साहेब, हा आटोमेटिक ग्रायंडर. काय वाटेल ते टाका. एका मिनिटात पीठ."

त्या ग्रायंडरची साइज लहान होती, नाहीतर मी साक्षात त्या घरमालकाला त्यात टाकून 'पाताळविजयम' नामक मद्राशी सिनेमातल्या राक्षसासारखा हॉ हॉ हॉ हॉ करून हसलो असतो.

"आणि हा संडास—"

"का हो, इथंही आटोमॅटिक होतं, की कुंथावं लागतं?"

मी शेवटी घरात नाही पण परसातही नाही, खोली आहे पण रुंदी नाही, अशा त्या स्थळाच्या उंबऱ्यावर पकडून त्या घरमालकाचा हिरण्यकश्यपूसारखा, शब्दांनी का होईना, कोथळा काढला. तो गृहस्थ माझ्याबद्दल मी एक पाजी माणूस असल्याचे सांगत होता, असे कळले. मी पुन्हा एकदा मद्राशी सिनेमातल्या ('पाताळविजयम') राक्षसासारखा हॉ हॉ हॉ हॉ करून हसलो.

शिकारी, घरवाले यांच्याखेरीज माझ्या शत्रुपक्षात प्रवासाला जाऊन आल्यानंतर तिथे काढून आणलेले फोटो दाखवणारी एक अभेद्य फळी आहे. मी बरा आयते जांभूळ तोंडात टपकावे तसा त्यांच्यापुढे टपकतो.

"अग, परवाचं आपलं काश्मिरचं आल्बम आण."

माझ्या काळजात गलबलले. भिंतीवरच्या घड्याळात तीन वाजले होते, तिथे सहा वाजलेले दिसायला लागले. मग 'अग' ते आल्बम घेऊन आली.

"हा निघताना पुण्याच्या स्टेशनावर काढला." इथून सुरवात. प्रत्येक फोटोला पाच मिनिटांचे संथपणाने चालते समालोचन. धावते नव्हे. त्यात 'अग' आणि 'अहो' यांचे मतभेद.

"हा सोलनमर्ग." 'अहो' सांगत होते.

"इश्श! हा सोलनमर्ग नाही काही, हा गुलमर्ग." 'अग' म्हणाली.

"अग, पण इथंच नाही का तू घोड्यावर बसली होतीस? मग घोडं खाली बसलं एकदम तेऽऽ." 'अहो' म्हणाले.

"मेलं मरतुकडं तर होतं. ते इथं नाही काही, ते टोलनमर्गला. हा गुलमर्गच आहे. तुम्ही पाय घसरून पडलात तो—"

("हा तिथंच का नाही पडून राहिला?" मी नेहमीप्रमाणे मनात म्हटले.)

"हो हो. अहो, काय ब्यूटिफुल आहे. काश्मिरमधली फुलं तर इतकी ब्यूटिफुल असतात—"—'अहो'.

("मग आमच्या पेशवे पार्कमधली फुलं काय कुरूप असतात?" माझा महाराष्ट्रीय नावाचा बाणा. नेहमीप्रमाणेच मनात.)

"हा डाळ लेक."—'अहो'.

"कसला लेक?"—मी.

"डाळ."—'अहो'.

"डाळ नव्हे, डाल."—'अग'ची दुरुस्ती.

"ही बद्रीकेदारची वाट—"—'अहो'नी पान उलटले.

त्या फोटोत मला फक्त धुक्यासारखे काहीतरी दिसत होते. हा फोटो चंद्रावरील खड्डे म्हणून खपला असता.

"हे पाहिलंत का—" 'अहो'नी मला दोन काळे ठिपके दाखवले.

"बघू—" काय करणार? मी पाहिले.

"डाव्या घोड्यावर मी आहे, आणि ही उजव्या घोड्यावर."

त्या फोटोत जिथे मुदलातले घोडेच दिसत नव्हते, तिथे त्या मुदलावर चढलेले व्याज कुठून दिसणार? पण प्रवासी फोटोवाल्यांना दिव्यदृष्टी असते. त्यांना पिंडात ब्रह्मांड दिसते.

"ही चिनारची झाडं."—'अहो'.

"इश्श, अहो ती अक्रोडाची."—'अग'.

"हो, हो. अग, ते अक्रोड फोडायचं आणलंय आपण काश्मिरहून, ते दाखव."

मग 'अग' तो अक्रोड फोडायचा काश्मिरी अडकित्ता घेऊन आली. घरात अक्रोड नसल्यामुळे (नसायचेच!) त्यात जायफळ फोडून दाखवण्याचे प्रात्यक्षिक झाले. माणसे प्रवासाला गेली, की येताना काय वाटेल ते आणतात. ज्या आक्रोडाची आधीच्या बेचाळीस पिढ्यांत आणि पुढल्या एकशे बेचाळीस पिढ्यांत खरेदी होण्याची शक्यता नाही, असल्या वंशातली ही मानवे काश्मिरहून ते आक्रोड फोडायचे काय ते कशाला आणतात? काश्मिरला जाऊन फोटो न काढता निमूटपणे परत येणाऱ्या आणि अक्रोड फोडायचे ते काय ते न आणणाऱ्यांचाही मी भर टिळक अगर लकडी पुलावर अनंतचतुर्दशीच्या गणपतिविसर्जनाच्या गर्दीसमोर मुका घ्यायला तयार आहे. जिथे जायचे, तिथे जावे, पाहावे, काय ते खावे, न् यावे. खरेदी कशाला? लक्ष्मी रोड आणि रानडे रोड मुंबई अठ्ठावीस ह्या प्रांतांत जगातले काय मिळत नाही? तसे पाहिले, तर पुणे आणि मुंबई यांपलीकडे जगात पाहण्यासारखे आहे तरी काय? आमच्या एका मित्राने यात्राकंपनीच्या प्रवासातून येताना स्वस्त मिळाली म्हणून दिल्लीहून गुरख्याकडे असते तसली कुकरी आणली होती. आणि येणाजाणाऱ्याला दाखवून काव आणला होता. हा आमचा मित्र पोस्टमनलासुद्धा पाहून चळचळा कापतो; तो त्या कुकरीचा काय उपयोग करणार आहे, हे एक पशुपतेश्वरच जाणे!

सारांश, प्रवासाहून येणारी मंडळी फोटो आणि वस्तू दाखवून दाखवून जीव

काढतात. त्या आल्बममधे तर एकच फोटो पुन्हा पुन्हा चिकटवल्यासारखा वाटतो. वर्णन निराळे. बाबासाहेब उंबरकर एकच वाघ पुन्हा पुन्हा मारून जंगलाचे नाव बदलून कथा सांगतात, तोच प्रकार.

"हे पाहिलंत का ? आम्ही जोशीमठात एका चट्टानावर उतरलो होतो, तिथला हा फोटो."

त्या फोटोत दहाबारा माणसे उभी होती. कुठल्याही दैनिकात तो फोटो 'चोरट्या अफूची आयात करणारी टोळी' किंवा एखाद्या ग्रामपंचायतीच्या सदस्यांचा जिल्हा काँग्रेस कमिटीच्या अध्यक्षासमवेत काढलेला ग्रूऽप फोटो म्हणून छापून येता, तरी चालला असता.

"त्यांना तुमचा तो पोहोताना काढला होता, तो दाखवा." 'अग'ची फर्माइश झाली.

"खरंच, कुठं ग गेला तो ? ह्या आल्बममध्ये दिसत नाही—"

"मी खणात बघते."

मग खणांची उलथापालथ सुरू. घड्याळाचा काटा सरकतोय आपला पुढे—पुढे—पुढे—पुढे. इकडे खण, कपाटे, ट्रंका यांचे उत्खनन जारी. ह्या प्रापंचिक उत्खननाचे एक वैशिष्ट्य आहे. इथे हवी ती वस्तू सोडून काय वाटेल ते सापडते. हरवणे हा एकमेव गुणधर्म असणाऱ्या शर्टाच्या गुंड्या शोधताना एखाद्याला कोहिनूर हिरा सापडला असे जरी मला कोणी सांगितले, तरी मी विश्वास ठेवायला तयार आहे. इकडे ते उत्खनन चालू होते. आणि सोबत आश्चर्योद्गार.

"अय्या ! हे पाहिलंत का आपलं ते जुनं आल्बम सापडलं !"

क्षणार्धात मला मनुष्यप्राण्याची मरणोत्तर अवस्था काय असते, याचा साक्षात्कार घडला. "अगबाई ! अमृतांजन इथंच होतं की.", "हे बघा, परवा चक्कर घालावं म्हणून आकडे शोधशोध शोधले—इथंच होते !", "हा पाह्यलात का तुमचा पट्टा !" जादूगाराच्या हॅटीतून रंगीत गोट्यांपासून ते ससापर्यंत (तेवढे ह्या शब्दाचे स्त्रीलिंग कुणाला आठवत असेल ते सांगा, ही विनंती.) काय वाटेल ते निघते, तशा अनेक गोष्टी निघत होत्या. पण ह्यांचा पोहतानाचा फोटो काही सापडत नव्हता.

"एक कप चहावर माणसानं काय काय म्हणून सोसावं ?" हे मी अर्थातच मनात म्हणत होतो.

"मी काढते हं तो फोटो शोधून. वरच्या ब्यागेत असेल. स्टूल आणता का जरा ?"

मग 'अहो'नी स्टूल आणले. 'अहो' त्याच्यावर चढले. वरच्या ब्यागा खाली आल्या. त्यासकट ते खाली येते तर काय मजा आली असती !—हे मी अर्थातच मनात.

"ह्यांतल्याच कुठल्याशा ब्यागेत आहे. तवर ते दुसरं आल्बम बघा." 'अग'चा सल्ला. मी ओढवलेले मरण पाहावे तसे ते आल्बम पाहायला लागलो.

"हे आमचे आजोबा."

्गजे तीन पिढ्यांचा इतिहास मला ऐकावा लागणार होता.

'हो का ?"

"हो. हे आमच्या वडलांचे वडील. आईच्या वडलांचा फोटो नाही त्यांनी काढू दिला."

आईच्या वडलांच्या काळीं समाजात असलेला सुज्ञपणा एकाएकी का नाहीसा व्हावा, ह्या विचाराने मला अपार खिन्नता आली.

"फार प्रेमळ होते आमचे नाना—"

त्या प्रेमळ नानांना मी डोळे भरून पाहून घेतले. नानांचा चेहरा फेंदारलेल्या मिशांमुळे उग्र होता की झोपाळू डोळ्यांमुळे करुण होता, ते मला ठरवता येईना. सर्कशीतली नोकरी सुटल्यामुळे उद्याच्या चिंतेत पडलेल्या वाघाचा चेहरा जसा दर्शनी एक आणि अंतर्यामी दुसरा असावा, तसे हे 'नाना' होते.

"आणि हा ओळखा पाहू ?" ह्या उद्गारांनी मी भानावर आलो. 'दाखवण्यासाठी' म्हणून उपवर मुलींचे फोटो काढणारे खास फोटोग्राफर विधात्याने जन्माला घातले आहेत. त्या जातींचा तो फोटो सदरहूंच्या सदरहींचा आहे, हे मी ओळखले. पण 'ओळखा पाहू'ला ओळखायचे नसते. एक शिष्टाचार म्हणून तो आम्ही पाळतो. म्हणून तर ही दैन्यावस्था! म्हणून मी उगीचच चुकून दाखवले.

" चेहरा तर ओळखीचा वाटतो—"

वास्तविक तो चेहरा चांगला तीन हनुवट्यांचा गुणाकार होऊन समोर ब्याग घेऊन 'ह्यां'चा पोहतानाचा फोटो शोधत बसला होता.

"ओळखा—तीन ट्राय." ते म्हणाले.

"काननबालेचा का हो ?" (हे काननदेवी, आमार तोमार क्षमा किंवा खोमा जे काही तुम्ही बंगालीत म्हणत असाल ती कोरो प्लीज!) तो फोटो काननबालेसारखा दिसतो म्हटल्यावर 'अग' आणि 'अहो' माझ्यावर तुडुंब प्रसन्न झाले.

"काननबालेसारखी वाटली की नाही! परवा आमचा गजाननसुद्धा असाच फसला. त्याला कोण वाटलीस ग ?"

"इश्श! वहिदा रहिमान!" चेहऱ्याखालच्या तीन वळकट्यांसकट बाईमाणूस जितके मुरकू शकेल तितके मुरकून 'अग' बोलल्या.

माझ्याआधी त्या घरात गजानन नावाचा महाचतुर पुरुष येऊन गेला होता, हे माझ्या ध्यानात आले.

"म्हणजे ? हा काननबालेचा फोटो नाही ?" मी अतिआश्चर्याचा अभिनय केला.

"अहो, हिचा आहे! लग्नापूर्वी शी लुक्ड सोऽऽ"

"लुकुडी!" मी हे मनात म्हणालो. आम्ही मनातच म्हणत मरायचे!

"शी लुक्ड—बरं का, एक्झॅक्टली लाइक काननबाला ऑर दुर्गा खोटे!"

त्या दोन माउल्यांत दोघीही बायका असण्यापलीकडे काय साम्य 'अहों'ना वाटले, तेच जाणे.

"बरं, आता हा ओळखा—" अंदाजे दोन वर्षांच्या आणि ज्या कारट्याच्या उगीच कानफटीत मारावेसे वाटते असल्या चेहऱ्याच्या मुलाचा फोटो 'अहों'नी डोळ्यांपुढे धरला.

"एवढं कळत नाही काय आम्हांला—हा तुमचा."—मी.

"वा! बरोब्बर ओळखलंत. मी दोन वर्षांचा होतो तेव्हा."

"काही फरक नाही पडला तुमच्यात." मी माफक सूड काढला.

"हा माझ्या मुंजीतला—"

स्वतःच्या मुंजीतल्या फोटोपासून ते मुलाच्या मुंजीतल्या फोटोपर्यंतची ती छापील प्रगती पाहता पाहता त्या गृहस्थाने माझ्या आयुष्यातले दोन तास कुरतडले. तो पोहतानाचा फोटो मात्र माझ्या सुदैवाने सापडला नाही.

"पुन्हा पाहीन केव्हातरी—" म्हणून मी सटकलो. आजवर पुन्हा त्या घराचा उंबरठा चढलो नाही.

ह्या शत्रूंचा निःपात कसा करावा ते अजूनही मला नीट कळलेले नाही. काही काही उपाय करून पाहत असतो. परवाच अशाच एका फ्यामिली आल्बमवाल्या शत्रूला पोत्यातून मांजर सोडून यावे तसा ब्राह्मणसभेत 'अश्लील वाङ्मयातील उद्बोधक उदाहरणे' ह्या विषयावर व्याख्यान आहे असे सांगून, 'भारतीय चलनफुगवटा'वाल्या व्याख्यात्यापुढे बसवून मागल्या मागे पळ काढला. पण अशी संधी क्वचित मिळते. कारण शत्रुपक्षाचे गनिमी हल्ले केव्हा येतील, हे सांगणे अवघड. ज्या घरातल्या सुपुत्र-सुकन्यांना किंवा खुद्द मंडळींना गाणे किंवा नाचबीच शिकवला जातो, ती घरे मी कटाक्षाने टाळतो. बालकलावंतांचे आईबाप ही तर माझ्या शत्रुपक्षातली प्रबळ तुकडी आहे. त्या अर्भकांशी माझे वैर नाही. त्यांच्या आईबापांच्या गैरहजेरीत मी होऊन त्यांची गाणी ऐकीन, नाच पाहीन. पण "बेबीचे मास्तर तर म्हणतात की लता मंगेशकर-पेक्षा हिचा आवाज दसपट गोड आहे," हे सुरू झाले, की आपले कान स्विच ऑफ करायची देवाने सोय करायला हवी होती, असे वाटायला लागते. बेबीचे मास्तर बिचारे घरोघरच्या बेब्यांना लता मंगेशकरच्या दसपट म्हणत असतात. पोटासाठी बोलावे लागते माणसाला. पण आईबापांना कशाला बोलावे लागते?

उंदरांनी कोट कुरतडला, तर रफू करता येतो. पण शांत चित्ताने इडली खाता यावी, अशी सुरेख सकाळ कुरतडली गेल्यावर ती कोण रफू करणार? अशा कुरतडल्या गेलेल्या सकाळी, दुपारी, संध्याकाळी (सशाच्या स्त्रीलिंगाप्रमाणे सकाळ, दुपार, संध्या-काळ यांची बहुवचने कृपया कोणीतरी मला सांगावी.) ह्या आठवल्या, की माझा गळा दाटून येतो. रस्त्यातली गर्दी अंगावर पांघरून मी चालत असतो. सोन्या बागलाणकराने माटुंग्याला नवा मद्रासी शोधून काढलाय. त्याच्याकडे सकाळी आठाच्या आधी मिळणाऱ्या इडलीला त्रिभुवनात तोड नाही. सोन्या बिचारा तिथे माझ्यासाठी टोपी ठेवून खुर्ची धरून बसतो. तेवढ्यात पाठीत थाप बसते.

"वा! किती दिवसांनी भेटलात!"

कोगाला किती दिवसांनी भेटलो, म्हणून वळून पाहण्यापूर्वी त्याने सुरवातही केलेली असते,

" ...ह्या खेपेला महाबळेश्वरच्या जंगलात दोन पँथर्स टिपले राव...द्या टाळी... म्हणजे काय झालं—"

गनिमाने कब्जा घेतलेला असतो, आणि माझ्या आयुष्यातली आणखी एक सकाळ उभी-आडवी कुरतडली जात असते. शत्रुपक्ष विजयी मुद्रेने जातो, त्या वेळी इडलीची वेळ निघून गेलेली असते. आमच्या सगळ्या वेळा अशाच निघून जातात. ह्याला एकच उपाय म्हणजे स्वतः शिकारीला जाणे, घर बांधणे, काश्मिरला किंवा निदान वसईला तरी जाऊन यथेच्छ फोटो काढून आणून सावजे पकडून त्यांना पिडणे. —शक्य नाही. देवाने ह्या जगात दोन प्रकारचे प्राणी जन्माला घातले आहेत. छळणारे आणि छळ सोसणारे! आमचा वर्ग दुसरा. सशाला किंवा सशीला (तेवढा नक्की शब्द कुणीतरी सांगावा.) काय वाटत नसेल, की वाघाला चक्क सांगावे, "हे पाहा वाघ, उगीच रात्री डरकाळ्या कशाला फोडता ? आमची झोपमोड होते. काय आवाज लावायचा तो दिवसा लावा. रात्रौ पडा की गुहेत गपचीप—" नक्की वाटत असेल. पण तो नाही सांगू शकत. कारण देवाने त्याला सशाचे काळीज देऊनच पाठवले. ससा वाघावर टाफरता, तर दुनिया बदलली असती. देवाकडे सशांच्या काळजांचा स्टॉक वाढला की काय, तोच जाणे, नाहीतर आमच्या देहात त्याने ते काळीज फिट कशाला केले असते ? तात्पर्य, सोन्या बागलाणकराच्या भाषेत बोलायचे म्हणजे—

"आपण लेको असेच मरायचे !—मिसळ थंड होतेय बघ."

मी माझ्या यातना मिसळीशी लावून गिळून टाकतो आणि शत्रुपक्षाचा जोर वाढतच राहतो.

## माझे पौष्टिक जीवन

### कडकट्ट....कळकट्ट....

पोष्ट हापीस ही एक अजब गोष्ट आहे. तिथे पब्लिकसाठी म्हणून ठेवलेल्या टाक-दौतीपासून ते आतल्या पोष्टमास्तरापर्यंत प्रत्येक स्थिरचरावर कसला तरी निराळाच शिक्का मारलेला असतो. तो पोष्टाच्या इतर कुठल्याही शिक्क्याप्रमाणे वाचता येत नाही. फक्त त्या शिक्क्याचे अस्तित्व जाणवते. पोष्टात नोकरीला घेताना उमेदवारांना त्यांच्या चेहऱ्यावर काही विशिष्ट भाव, किंवा चेहऱ्यावर कुठल्याही भावांचा अभाव, पाहून निवडले जात असावे. इतर सरकारी खात्यांतले कर्मचारी (काय भयंकर पदनामी शब्द आहे हा!) आणि पोष्टल कर्मचारी ह्यांच्या चेहऱ्यांवरील भावांत मला नेहमी फरक वाटतो. इतर काही काही सरकारी खात्यांतले लोक कसे 'तयार' वाटतात. कारकुनी फराट्याने कधी झाडून टाकतील ते सांगता येत नाही. पोष्टल कर्मचाऱ्यांचे तसले काही नसते. पाच पैशांचा ष्टांप घ्या, किंवा पन्नास रुपयांची कार्डे-पाकिटे घ्या, निष्काम कर्मयोग्याच्या भावनेने ती ते देतात.

पोष्टाच्या इमारतीच्या घडणीतच काही निराळेपण आहे. भरपूर उजेड, वारा वगैरे खेळता कामा नये अशी दक्षता घेऊनच पोष्ट हापिसे बांधली गेली आहेत. फार उजेड असला तर पोष्टमन लोकांची पत्रे वाचत बसतील, म्हणून पत्ता वाचण्याइतपतच उजेड असतो. वारा खेळला तर पत्रे उडून जातील, ही भीती असावी. काउंटरची उंची आणि खिडकीच्या भोकाची रुंदीदेखील पलीकडच्या मास्तरची टाळू आणि कपाळाचा काही भाग ह्यांहून अधिक काही दिसू नये अशा बेताची असते. आज अनेक वर्षे मी आमच्या नाक्यावरच्या पोष्टात जातो आहे, पण अजून मी तिथला अखंड मास्तर पाहूच शकलो नाही. खिडकीपलीकडल्या टाळूवर टक्कल दिसण्याऐवजी भांग दिसला की मास्तर बदलले, एवढे लक्षात येते.

पोष्टातला तो काळोख, तारयंत्राचे ते भुताटकीसारखे आपोआप चाललेले कडकट्ट-कडकट्ट, धपाक ठपाक असे शिक्क्यांचे आवाज यांच्यामुळे पोष्टात कसलेसे गूढ

वातावरण असते. खिडकीपलीकडला प्रत्येक लहान-मोठा मास्तर खाली मान घालून काही ना काही तरी लिहीत असतो. ते लिखाण पावतीबिवतीच्या रूपाने कधी आपल्या हाती लागलेच, तर तो सांकेतिक लिपीतला मजकूर असावा असे वाटते. पोष्टातून मिळणाऱ्या पावतीवरची अक्षरे ज्याला वाचता आली, तो काय उद्या एखाद्या डॉक्टरचे प्रिस्क्रिप्शनसुद्धा वाचील. अक्षरांची ती अगम्य गिचमीड पोष्टाच्या वंशाला गेले तरच कळते.

त्या गूढ अक्षरांप्रमाणेच पोष्टसंप्रदायाचे काही गूढ शब्द आहेत. उदाहरणार्थ, 'बटवडा'! 'बटवडा' हा शब्द वास्तविक आजचे ताजे पदार्थ ह्या यादीतून चुकून पोष्टाच्या पत्त्यावर आल्यासारखा वाटतो. मी एकदा हा प्रकार तरी काय ते पाहू या, म्हणून पोष्टात दोन आण्यांचा 'बटवडा' मागितला होता. सारे पोष्ट—पोष्टमास्तरसुद्धा —हसले होते. त्यानंतर आजच्या डिलिवरीपर्यंत मी पोष्टात कुणाला हसताना पाहिलेले नाही. सदैव 'डिलिवरी'च्या चिंतेतल्या माणसाकडून हसण्याबिसण्याची अपेक्षा करणेही चूकच आहे. तसे पोष्टमास्तराच्या जातीला विनोदाचे वावडे आहे, असे नाही. कुणीतरी नवशिका पोष्टल कर्मचारी (बाप रे!) पी० एम० जी० च्याऐवजी पोष्टमास्तर जनरल असे संपूर्ण नाव म्हणाला, म्हणून पोष्टमास्तर खो खो करून हसले होते, असे ऐकिवात आहे. एम० ओ०, टी० एम० ओ०, जी० पी० ओ०, टी० ओ०, पी० एम० जी०, आर० एम० एस० अशा सांकेतिक भाषेत न बोलता कुणी खुल्या भाषेत बोलले, तर पोष्ट हसते. पण विनोदाची खरी देणगी पोष्टापेक्षा तारखात्याला अधिक. तारखात्याची विनोदबुद्धी भलत्या वेळी जागी होते. विवाहाच्या अभिनंदनाची तार "हा दिवस आपल्या आयुष्यात वारंवार येवो" ह्या नंबरावर धाडणे, "वाईफ रीचिंग टु-नाईट"ऐवजी "वाइफ टीचिंग टु-नाईट" करणे किंवा "रिसीव्ह मदर-इन-लॉ"च्या ऐवजी "डिसीव्ह मदर-इन-लॉ" असल्या गमती होतात. अशा वेळी तारमास्तर कुठल्या तारेत असतात हे ओळखायला विनोदबुद्धी हवी. माझ्या एका मित्राला "बाबूज मॅरेज् फिक्स्ड् विथ लिमयेज डॉटर"च्या ऐवजी "बाबूज् गॅरेज मिक्स्ड् विथ लेमन वॉटर" अशी तार आली होती. तेव्हा तारखात्याला विनोद जमतो. खिडकीमागे नॉटपेड पाकिटाइतका कोरा चेहरा ठेवून बसणारे मास्तर कधी कधी अंतरीची कळा दाखवून जातात. एकदा पब्लिकपैकी एक गृहस्थ महत्त्वाच्या पत्राची डिलिव्हरी उशिरा गेल्याबद्दल पोष्टमास्तरांशी तावातावाने भांडत होते. शेवटी त्यांचे सगळे ऐकून घेऊन पोष्टमास्तर म्हणाले,

"अहो, डिलिव्हरी म्हटली, की चार दिवस अलीकडे, पलीकडे व्हायचंच. नवव्या महिन्याची दहाव्या महिन्याला होते—देव चुकतो; माणसाचं काय?"

पोष्टात जमलेले सगळे पब्लिक हसले. मलाही एकदा एका पोष्टमास्तरांनी असेच तोंडावर ष्टांप चिकटवल्यासारखे गप्प केले होते. मी म्हटले,

"मास्तर—मास्तर, हे पत्र पोष्टात नक्की केव्हा पडलं ते जरा शिक्क्याची तारीख नीट बघून सांगता का?"

मास्तरांनादेखील शिक्का वाचता येईना.

"मास्तर, जरा नीट शिक्का उमटवायला सांगा की—"

"साहेब, गुलाबी पाकीट आहे, म्हणून हलकेच उमटवला असेल."

"मास्तर, हल्ली गुलाबी पाकिटांतून वर्गणी तुंबल्याचीसुद्धा पत्रं पाठवतात. बिलाचा तगादा आहे."

"असं होय? गुलाबी पाकीट पाहून दिलाचा तगादा वाटला असेल. हॅ हॅ हॅ—"

मीही हॅ हॅ हॅ केले. बाकीचेही पोष्टातले लोक हसले. पूर्वी मला वाटायचे, पोष्टाच्या हसण्याच्याही ठराविक वेळा असाव्यात. कारण 'टपाल हशील निराळे' असे कुठे कुठे छापून येई. पण त्याचा हसण्याशी संबंध नाही, हे मागाहून कळले.

बाकी 'हशील' हादेखील पोष्टाचा खास शब्द. बटवड्याच्या जोडीला एक 'बंगी' असते. बटवड्याप्रमाणे 'बंगी' कोण, हेही मला गूढच होते. किंबहुना, पोष्टाला टपाल आणि डाक केव्हा म्हणतात याचाही पत्ता मला नाही. 'टपाल' हा शब्द वरपांगी खेळकर वाटतो, पण 'डाक' हा मामला जरा भेदक आहे. डाक-बंगल्याचा आणि माझा योग आयुष्यात फार उशिरा आला. त्या बंगल्याचा आणि डाकेचा संबंध नाही हे तेव्हा कळले. तरीही त्या बंगल्याला डाक-बंगला का म्हणतात? मालगाडीच्या डब्यांना 'वाघीण' म्हणतात, तर पोष्टाच्या डब्याला 'डाकीण' का नाही? वास्तविक मालगाडीच्या डब्याचा वाघिणीच्या क्रूरतेशी काहीही संबंध नाही. तो डबा अतीच ठोंब्या दिसतो. त्याउलट, पोष्टाचा लालभडक डबा अनार्य दैवता-सारखा असतो. त्याला 'पेटी' म्हणायचे! का म्हणून?

बाकी, वाजवायच्या पेटीसारखे त्या पेटीत पडलेल्या पत्रांचे सूर मोठ्याने उमटव-ण्याची जादू आली असती, तर रोजच्या डिलिव्हरीला काय काय म्हणून ऐकायला मिळाले असते. सुख, दुःख, त्वेष, चीड, संताप, समाधान, राग, लोभ, प्रेम, द्वेष, मत्सर, ममता—अशा असंख्य सुरांचा तो सुप्त कोलाहल. "विजू ग विजू, मी तुझ्यासाठी झुरतो आहे ग रात्रंदिवस!"सारख्या पत्रावर "आणखी महिनाभर माहेरी विश्रांती घ्यावी. माझे इथे उत्तम चालले आहे." यासारखे पत्र पडले असेल. "इकडील सर्वत्रांची क्षेम"च्या बाजूला "काल रात्री देवाज्ञा झाली. असो." हेही अडकले असेल. संपादकाच्या हस्तस्पर्शाची वाट पाहत पडलेल्या एखाद्या नवख्या कवीच्या कवितेशेजारी एखाद्या वकिलाची नोटीस असेल, "तेव्हा आमचे अशिलाचे शीलावर शिंतोडे उडवल्याबद्दल नुकसानभरपाईपोटी" इत्यादी, इत्यादी. कुठे कुणाचे लग्न ठरल्याची मंगल वार्ता, तर कुठे "म्हणून तुम्हांला सांगते की, शेखर, मला विसरून जा." असाही मजकूर पडला असेल. पोष्टाच्या पेटीने 'आ' वासून जर अंतरंग दाखविले, तर एक चिमुकले विश्वरूपदर्शन होईल.

पण हे दर्शन घडवण्यात ज्याचा "लिहिता हात नसला तरी पोचवता हात" आहे ते पोष्ट मात्र अत्यंत अलिप्तपणाने शिक्कामोर्तब करून आपले काम करीत असते. नाटकातले किंवा सिनेमातले डोअरकीपर, शेवटल्या अंकाची किंवा रिळाची उत्सुकता

शिगेला पोहोचलेली असताना जसे अत्यंत अलिप्त भावनेने दरवाजे उघडायची वेळ झाली एवढेच जाणतात, तसे पोष्टमन मजकुरातून अलिप्त राहून माणूस म्हणजे फक्त पत्त्याचा धनी एवढेच ओळखतात. तेही योग्यच आहे. उद्या प्रत्येक दारात जाणारा पोष्टमन जर पत्रांतल्या कर्मभोगांशी मन गुंतवू लागला, तर दिवसातून तीन पत्रे नाही वाटू शकणार. पत्र वाटणाऱ्या हातामागले अंतःकरण फार पुढे सरकवू देऊन त्याला भागण्यासारखे नाही. एखाद्या सुमीचे लग्न ठरल्याची तार दिल्यावर ते कसे ठरले ही हकीकत ऐकत तारवाला उभा राहू लागला, तर अनवस्था प्रसंग येईल. "बरं का तारवाले, ही सुमी म्हणजे आमचे उमरावतीचे दीर आहेत, त्यांची मुलगी. पुतणी माझी. म्हणजे मजा काय झाली..." ही हकीकत किती तास चालेल काय सांगावे! एवढ्यासाठी निवृत्त मनाने तारा किंवा पत्रे वाटायची असतात.

म्हणूनच कुठल्याही जादा उत्साहाला आळा घालण्याकडेच पोष्टाची प्रवृत्ती असते. पुढाऱ्यांच्या किंवा आणखी कोणा-कोणाच्या स्मरणार्थ कितीही सुंदर तिकीट काढले, की पोष्टाचे मुख्य काम त्याच्यावर काळाभोर ठसा उठवून त्या चित्राची शोभा घालविणे हे असते. इतकेच कशाला? पोष्टात पब्लिकसाठी ठेवलेला टाक आणि दऊत ही माणसाला लेखनापासून परावृत्त करण्याच्या हेतूनेच ठेवीत असावेत. फार तर पत्ता लिहिता येतो. पोष्टातल्या टाकाने अगर शाईने अखंड एक कार्ड लिहू शकणारा माणूस या जगात काय वाटेल ते करू शकेल. पोष्टासाठी शाई करणारे जे कोणी शाईवाले असतील त्यांचा पूर्वी आयुर्वेदिक औषधे करण्याचा कारखाना असावा, अशी मला त्या शाईइतकीच दाट शंका येते. त्यांना एकदा शाई हे एक द्रव असून, ते चाटण्या-सारखे थबथबीत लेह्य अगर चोष्य न करता कुमारीआसवासारखे पातळ करावे लागते, हे कुणीतरी धीटपणाने सांगायला हवे. आणि पोष्टखात्याने टाक, निब इत्यादींवर वायफळ खर्च न करता रोज एक केरसुणीच्या हिरांचा लहानसा जुडगा त्या दौतीच्या बाजूला ठेवावा. हिराचे टोक हे पोष्टाच्या निबापेक्षा निश्चित अधिक टोकदार असते. शाईची ती काळा चिखल भरलेली दौत आणि पत्रापेक्षा धोतरालाच अधिक चिकटणारी ती निळसर पांढरी खळ. ही त्या दौतीशेजारीच ठेवली पाहिजे असा जर कायदा असला, तर तो मात्र देशव्यापी चळवळ करून बदलला पाहिजे. माणूस पोष्टात चिकटला ह्याचा भलता अर्थ होऊ शकेल, अशी ती गोंद, डिंक, अधिक खळ अशा तिहेरी ताकदीची वस्तू पोष्टातल्या एकुलत्या एक असणाऱ्या बाकड्यावर सकाळच्या वेळी हळूच पसरून ठेवीत असावेत, अशी एक शंका आहे.

पोष्टाची शाई करणाऱ्या कारखानदारांप्रमाणेच पोष्टातली छपाई करणारे छापखाने-वाले कोण असावेत, हेही मला गूढ आहे. पोष्टखात्याचा एकूणच स्पष्टपणा ह्या गोष्टीला विरोध असावा. पत्ता सुवाच्य लिहावा म्हणणारे पोष्टखाते ज्या वेळी एका पत्त्यावरील पत्र दुसऱ्या पत्त्यावर रीडायरेक्ट करते त्या वेळी मूळ पत्ता खोडून पहिले पोष्टमास्तरमजकूर जेव्हा दुसरा रीडायरेक्ट-पत्ता लाल शाईत लिहितात त्या अक्षराला सुवाच्य म्हणणे म्हणजे गांडुळाला शेष म्हणण्यापैकी आहे. अर्थात असली अक्षरे वाचून

ती योग्य पत्त्यावर आणून देणाऱ्या आणि वाटेल त्या फराट्यातून पत्ता वाचू शकणाऱ्या पोष्टमनला तिसरा डोळा असावा. मनिऑर्डरचे फॉर्म वाचता येणाराला तर ललाटीचा लेखही नक्की वाचता येईल. मनिऑर्डरी, रजिष्ट्रेशनची ए० डी० पावती, त्यांच्यावर जे काही उमटलेले असते ते, त्याला छपाई म्हणण्यापेक्षा 'छुपाई' म्हणणे अधिक योग्य. माझा तर दर वेळी मनिऑर्डर घेताना (हा योग दुर्लभ; व्हीप्याच फार.) मी 'आड्रेसर' आहे की 'आड्रेसी' याचा घोटाळा होतो. 'पानेवाला' हा शब्द मी अनेक वर्षे 'पाववाला' असा वाचीत होतो. ज्याला मनिऑर्डर पावते तो पाववाला अशी माझी समजूत. भारतीय एकात्मतेविषयी पोष्टखात्याची काही विशिष्ट कल्पना असावी. त्यामुळे जिथे जी भाषा बोलली अगर वाचली जाते तिथे त्या भाषेतले फॉर्म पाठवायचे नाहीत, असा एक शिरस्ता आहे. एकदा गडबडीत मी फॉर्म घेऊन आलो. नाशिकच्या पोष्टात त्यांनी मला कानडी फॉर्म का द्यावा ? तो फॉर्म घेऊन मी परत पोष्टात गेलो तेव्हा त्यांनी मला बदलून जो फॉर्म दिला तो मराठी, हिंदी, तामीळ, कुठल्याही भाषेतला म्हणून चालला असता. मास्तरना मी तो फॉर्म दाखवला. त्यांनी मला तो घडाघडा मराठीत वाचून दाखवला. मला लिहितावाचता येत असूनही मी तो फॉर्म आणखी दोन आणे भरून दारातल्या लेखनिकाकडून भरून घ्यावा म्हणून त्याच्यापुढे जाऊन उकिडवा बसलो. त्याने माझ्याकडे पाहून "हल्ली वाटेल ती माणसे मोठा जंटल-मनचा ड्रेस घालून मिरवतात !" असे म्हणून घेतले आणि तो ओरडला, "बसा !" मी बसलो. माझ्याआधी दुसरा एक माणूस कार्ड लिहून घ्यायला बसला होता.

"हं, सांगा !—"

"मनिऑर्डर करायची आहे." मी.

"तुम्ही नव्हे; तुम्ही थांबा. घोड्यावरून आलाय काय ?" जस्ती काड्या.

"नीट बोला की. काही मॅनर्स ? व्हाय आर यू सो रूऽऽड ?" दमदाटीला इंग्रजी बरी. जस्ती काड्या एकदम नाकावरून घसरल्या.

"अरे वा ! अंगठाछाप असून ही मिजास ?"

"कोण अंगठाछाप ?"

"दुसरं कोण ? लिहायला येत नाही, न् वर—"

"लिहायला येतं, वाचायला येत नाही."

"काऽऽय ?"

"हा फार्म वाचून दाखवा." मी त्याच्यापुढे फॉर्म धरला. त्याने ती अगम्य अक्षरे इंग्लिशमध्ये वाचून दाखवली.

"अहो, पण पोस्टमास्तरनी तर हा मराठीत वाचला, तुम्ही इंग्लिशमधे वाचता आणखी कोणीतरी गुजरातीत वाचेल. आहे काय हा चावटपणा ?" उकिडवा बसल्या-मुळे मी आधी वैतागलो होतो.

"चावटपणा कसला ? गुजरातीतच आहे. तुम्हांला कळावा, म्हणून इंग्रजीत वाचला."

" छान ! अहो, पण कशापुढं काय भरायचं, ते आम्हांला कसं कळणार ? "

"मग आम्ही कशाला बसलोय ?—बसा. ह्यांचं पत्र लिहू दे आधी. सांगा, पाव्हनं— "

मी निमूटपणे पाव्हण्याचं पत्र ऐकत बसलो. धोतराचे काय वाटेल ते होऊ दे, म्हणून उकिडव्याचा टेकता होऊन बसलो.

" तऽऽ गंपाला म्हनावं, औंदा भैरूऽ "

" ते लिहिलं; पुढं बोला." छांपव्हेंडरसाहेब गेल्या जन्मी फौजदार होते.

" मंग आपलं ते...ह्येऽऽ असंच, मंजी हितं बरं चाललंय म्हना ना. बोनुस गावंल असा चान्से दिसतुय तवा धुर्पदीच्या नवऱ्याला—मंजे आमचा जावायबापू—किल्लु-स्करवाडीस्नं त्येला म्हनावं, जावायाला दिवाळीच्या टायम्बाला बलावनं आलं, मंजी च्यामारी साटसत्तर रुपयांचा फटका आला खरा...पर चार मानसं कसं काय वागत्यात—मंजी जी काय जन्रीत आसंल तसं...कसं म्हनता? झालंच त गोंद्या आन् हारी गोंदव्लेकराला न् दामू सुताराला दंडवत साहांगावे. म्हातारीच्या दम्याचं वशीद म्येटलं का लालचिमनीतला भिवा—त्यो ज्राबर जहाला—त्येच्या संगटं पाटवितो. काका सवगड्याला दंडवत— "

नळ गळावा, तसा पाव्हन्याच्या तोंडून मजकूर गळत होता, आणि जस्ती काड्या-वाले छांपव्हेंडर आणि लेटररायटर कार्ड भरून काढीत होते.

" हं, संपली जागा. तुमचं नाव बोला. "

" बावज्या धना भोरीकर. "

" कोण 'कर' ? " लेटररायटरसाहेबाच्या गुरूंनी त्यांना फक्त वसकन ओरडायला शिकवले होते.

" कोनकर न्हवं. भो हो री ही क ह र— " पाव्हण्यांनी पष्ट सांगितले.

" पत्ता ? "

" धुरपती बावज्या भोरीकर स्वभाग्गेवती—पाटलाच्या बखळीम्होरं. मारुतीच्या देवळाच्या आड्याल्ल्या आंगाला. मुक्काम हारनगाव, पोष्ट किंकवडी— "

" क्याय ? "

" कि हीं क ह व ह डी " पुन्हा पष्ट. " जिल्हा सातारा. त्येवढा सशेगुर्जीला दंडवत ल्याहा बरं का मास्तर—त्ये बेनं लय हालकट हाय. दंडवत नसला तर यकाचं दोन वाचून दावतंय. लय बारा * * * "

असल्या ब्रह्मघोटाळ्यातून कार्ड काय तयार झाले, ते ऐकायला मी भोहोरीहीकहरा-पेक्षाही अधिक उत्सुक होतो.

" ऐका—सौभाग्यवती द्रौपदीस अनेक आशीर्वाद. मी खुशाल आहे. दिवाळीला जावईबापूंना बोलावले पाहिजे. जनरीत पाळली पाहिजे. बहुधा बोनस मिळेल. काकीच्या दम्याचे औषध भिवाबरोबर धाडतो. वडील मंडळीस नमस्कार. लहानांस आशीर्वाद. सांभाळून राहावे. माझी प्रकृती उत्तम आहे. बाबज्या धना भोरीकर— "

"सशेगुर्जींचा दंडवत राह्यला."

"ऑं, हा काय? सशेगुरुजींना साष्टांग नमस्कार."

मास्तर जिथे अजिबात न लिहिलेला मजकूर वाचू शकत होते, तिथे माझा गुजराती मनिऑर्डरचा फॉर्म त्यांनी इंग्रजीत वाचून दाखवला यात नवल काय? ष्टांपव्हेंडर आणि त्याच्या पुढली लिहून घेणार मंडळींची गर्दी हा पोष्टखात्याचा भरपूर करमणूक करणारा एक सांस्कृतिक कार्यक्रमाचा विभाग मानायला हरकत नाही.

ज्या खिडकीवर जो बोर्ड असतो तेच काम तिथे होईल, याची पोष्टात खात्री नसते. त्यामुळे रजिष्टर पोष्ट-पार्सलचा 'क्यू' आहे असे समजून त्यात उभे राहिले तर अंती आपण मनिऑर्डरीशी पोहोचतो. मी एकदा पंधरा पैशांचे ष्टांप विकत घेण्याची महत्त्वाकांक्षा मनात बाळगून एक रांग धरून उभा होतो. काउंटरच्या खिडक्या आणि भिंत यांच्या मधली जागा माणसांना उभे राहण्यासाठी नसून चेंगरण्यासाठी आहे, अशा समजुतीनेच पोष्टाच्या इमारतीची रचना केलेली असते. त्यामुळे मनिऑर्डरी, रजिष्टरे, सेविंग अकाउंट, पाकिटे यांच्या रांगा एकमेकींत मिसळून उभ्या होत्या, आणि पोष्ट हापिसला पंढरीच्या वारीच्या मोसमात बार्शी लाइटच्या डब्याला येते तसली कळा आली होती. त्यामुळे ज्यांनी आयुष्यात केवळ आट्यापाट्यांचा खेळ खेळलाय असलेच भिडू सूर मारून इष्ट खिडकीपाशी जाऊन पोहोचत होते. त्या रणधुमाळीत पंधरा पैशांचा ष्टांप मिळविण्याची माझी धडपड सामान्यतः चौपाटीच्या वाळवंटात रविवारी संध्याकाळी पँटचे हरवलेले बकल शोधण्याइतकीच सोपी होती. ष्टांप मिळणारी खिडकी कोणती ते कळण्याचा मार्ग नव्हता. कुणीतरी मला "तिथे" म्हणाला म्हणून इथे उभा होतो. ईश्वरेच्छेने सरकत होतो. सरकता सरकता एक खिडकी नजरेच्या होऱ्यात आली. आता पुढे एकच माणूस उभा होता. 'क्यू' ह्या बाबतीतला माझा एक अनुभव असा : आपल्यापुढे उभ्या असलेल्या माणसाचे काम कधीही लवकर आटपत नाही. समोरच्या तराजूत पाकिटांची तुला चालली होती. मी 'ठेविलें अनंतें' होऊन बारीत उभा होतो. तेवढ्या वेळात 'वजनी आणि मापी परिमाणे', 'अधिक धान्य पिकवा', 'राष्ट्रीय विमायोजना', 'देवीनिर्मूलन मोहीम' इत्यादी भिंतींवर डकवलेला मजकूर मुखोद्गत केला. अल्पबचत रोख्यात पाच रुपये गुंतवले, तर वयाच्या पासष्टाव्या वर्षी मला बारा रुपये मिळणार आहेत, ही आनंददायक वार्ता वाचून पुढल्या महिन्यापासून प्रत्येक पाच रुपयांच्या नोटेचा 'रोखा' करायचे ठरवले. माझा विमा लाख रुपयांचा झाला आहे, हे ऐकून माझ्या पश्चात सगळे आनंदात नांदताहेत, हे भविष्य डोळ्यांपुढे आणले. इतके सारे करूनही माझ्या पुढल्या माणसाचे काम संपेना. खिडकीपलीकडून आता गाभाऱ्यातून आरतीचा उजेड येतो तसा आला. मी मान उंचावली. ती आरती नसून लाखेची मोहर उठविण्याची पूर्वतयारी आहे, हे ध्यानात आले. मी तेवढ्यात एकदा "मला पंधरा पैशांचा ष्टांप देता का हो?" अशी एक थोडीशी आर्तपैकी हाक दिली. "थांबा" असा कुठूनसा आवाज आला. माझ्या पुढल्या माणसाने गळपट्टेवाल्या कुत्र्याने बिनपट्टेवाल्या

कुत्र्याकडे पाहावे तशा तिरस्काराने माझ्याकडे पाहिले. शेवटी एकदाचे त्याचे काम संपले. पुन्हा एकदा तो इसम ग० प० वा० कु० बिन ग० प० वा० कु० कडे पाहतो, तसा पाहून गेला, मी अशा वेळी बिनपट्टेवाला कुत्रा पट्टेवाल्याकडे जसे दुर्लक्ष करतो तसे केले, आणि खिडकीत पंधरा पैसे सरकावीत म्हणालो,

"पंधरा पैशांचे ष्टांप द्या..."

"पलीकडल्या खिडकीत जा."

"अहो, पण..."

"पाटी वाचता येते ना?" माझ्या मुखमंडलात असा काय गुण आहे मला कळत नाही, पण बसकंडक्टर (सौजन्यसप्ताहातसुद्धा), पोष्ट-अगर-तारमास्तर, तिकीट-कलेक्टर, हॉटेलातले वेटर, कापड-दुकानातले पंचाविभागातले लोक गुरकल्याशिवाय माझ्याशी बोलतच नाहीत. साऱ्या दिवसाचा उद्धटपणा माझ्यावर काढतात. अशा वेळी आपण गेल्या जन्मी कोण होतो, म्हणून ह्या जन्मी हा भोग माझ्या नशिबी यावा, ह्या विचाराने मी हैराण होतो. आता हा पोष्टातला धाकटा मास्तर; त्याला "पाटी—वाचता—येते—ना?" असे कुत्सित बोलायचे कारण काय?

"पलीकडे जा. पब्लिकचा टाइम फुकट घालवू नका."

"अहो, पण ष्टांप कुठं मिळतात?"

"ते काय, 'चौकशी' असं लिहिलंय तिथं."

"पोष्टात ष्टांपाला 'चौकशी' म्हणायला लागले काय हल्ली?"

"विनोद घरी जाऊन करा."

मी चौकशीच्या खिडकीपाशी गेलो. बाकी पोष्टाचे एक बरे आहे—ह्या खिडकीचा त्या खिडकीला पत्ता नसतो.

"काय?" चौकशी-खिडकीत चौकशी झाली.

"पंधरा पैशांची एक चौकशी द्या." मी थंडपणाने सांगितले.

"कायऽऽ" खिडकीमागून पूर्वीच्या नायिका फोडीत तसली पण पुरुषी आवाजात 'अस्फुट आरोळी' आली.

"पंधरा पैशांची चौकशी."

"चौकशी?"

"चौ—क—शी."

"काय मिस्टर, सकाळीच चढवून आलाय काय?"

"खिडकीबाहेर मुंडकं काढा, तुम्हांलाही चढवतो."

शाळेत मी एकदा गणोजी शिर्क्याचे काम केले होते—तो आवाज पुन्हा लावला. अवघे पोस्ट हादरले. तारमास्तरच्या थरथरत्या बोटांतून 'कडकट्ट'मधले नुसते कड-कडकडकडकड एवढेच वाजलेले ह्या कानांनी मी ऐकले. 'क्यू'मधली दीड तासाची तपश्चर्या आणि चहाची टळलेली वेळ माझ्या संतापातून बोलत होती. शेवटी पब्लिकने "जाने दो, जाने दो यार. साला गवर्मेंटका मामला ऐसाही हो गया—" वगैरे पाणी

ओतले आणि ती पंधरा पैशांची तिकिटे विजयचिन्हांसारखी मिरवीत मी बाहेर पडलो आणि समोरच्या पेटीत पत्र टाकले. निम्मी वाट चालून गेल्यावर ती पंधरा पैशांची विजयचिन्हे त्या पत्राला चिकटवायची विजयोन्मादाच्या भरात विसरल्याचे लक्षात आले.

पण वैतागण्याचे असे नानाविध क्षण पब्लिकच्या आयुष्यात आणून देणे हा आपला एक पोष्टखात्याचा विरंगुळा असावा. तासभर एक रांग धरून उभे राहिल्यावर एकदाचा माणूस रजिष्टरच्या खिडकीपाशी येतो. खिडकीपलीकडून आवाज उमटतो, "एक रुपया पस्तीस पैशांचे स्टँप लावा. थांबा, येडी आहे का सादंऽ ?"

"कोण ?" मी दचकलो. रजिस्टर पत्र देवाब्राह्मणांच्या साक्षीने जिचा हात धरला तिच्या नावे होते. (बायकोला रजिस्टर पत्र कसले, ही शंका काढू नये. नवराबायकोच्या नात्यात जास्ती लक्ष घालणाऱ्याला पुढला जन्म सापसुरळींचा की बेडकाचा कसला तरी मिळतो.)

"कोण काय होऽ ?" मनिऑर्डरीचे कानडी फार्मच मराठी मुलखात पाठवतात असे नाही. मास्तरदेखील थेट गुड्डीहळ्ळी किंवा चिंगंपल्लीहून मागवलेले दिसत होते.

"येडी कोणाला म्हणता ?"

"कोणाला म्हणजे काय की यक्नलिजमेंट ड्यू तर येडी म्हंटात की होऽ."

"हां हां, रजिस्टर्ड ए० डी०."

"मग मी काय कानडी बोललं काय हो थुमच्याकडं ? आणकी घा पैशाचं श्टांप लावा म्हटलं तर—"

"द्या."

"हिकडं नाही. ते यम० वो० लिहलंय तिकडं—"

त्या खिडकीत रामाच्या शेंडीपासून सीतेच्या केसापर्यंत लांब क्यू होता. त्यात जाऊन ठाकलो. सरकत सरकत एकदाचा खिडकीपाशी पोहोचलो. श्टांप घेऊन पुन्हा रजिस्ट्रेशनच्या रांगेतून घसरत ती खिडकी गाठली.

"घ्या. हे पत्र रजिष्टर..."

"टायम संपलं. उद्या या."

वास्तविक तिकिटे चिकटवल्याखेरीज पोष्टाचे पाऊल उठत नाही. तार असो की आणखी काही, तिकीट हवेच. मग प्रत्यक्ष खिडकीवाल्याकडे चार तिकिटे ठेवली, तर ते काय फावल्या वेळेत एकमेकांच्या पाठीला चिकटवण्याचा खेळ खेळतील, अशी पोष्टाला भीती वाटते की काय, नकळे! चार खिडक्या हिंडून आल्याखेरीज पब्लिक सुधारणार नाही, अशी पोष्टाची समजूत असावी.

लायब्ररीत हवे ते पुस्तक, स्टॉपवर हवी ती बस आणि पोष्टात जेवढ्याचा हवा तेवढ्याचा श्टांप—ओळीने तीनदा ह्या इच्छा सफल झालेला माणूस कुणालाही भेटला, तर तो सत्पुरुष आहे असे समजून त्याच्याकडून बंद मुठीतून हिऱ्याची आंगठी मागावी. मिळण्याचा संभव आहे. पंधरा पैशांचा एक श्टांप मागा, पाच पैशांचे तीन मिळतील. पाच पैशांचा मागा—पैशेवाले पाच ! एकदा मी एका पत्रावर आठ आण्यांचे पैसेवाले

पन्नास ष्टांप लावले होते. ते डकवता डकवता जीभ कोरडी पडली. पुढे पुढे जिभेवर इतका डिंक चढला, की बोलताना जीभ टाळूला चिकटून राहायची. ष्टांप चिकटवण्यासाठी पोष्टात एक पत्र्याची कापड गुंडाळलेली फिरती सुरळी असते. तिला कधीही ओलावा नसतो. त्यामुळे जीभ हा एकमेव उपाय. पोष्टात अनेक वेळेला लोक ह्या पत्रे चिकटवण्याच्या नादात एकमेकांना जिभा काढून वेडावीत असल्याचा भास होतो. त्यातून पाकिटे, अंतर्देशीय पत्रे इत्यादिकांनी चिकटू नये त्या वेळी चिकटावे आणि चिकटावे तेव्हा 'आ' वासावा, हे एक उघडे गुपित आहे.

मला मात्र मोठ्या शहरातल्या पोष्टापेक्षा आडगावची पोष्टे फार आवडतात. मोठ्या शहरी पोष्टात आपला पत्ताच लागत नाही. लहान गावी मास्तर आस्थेने विचारपूस करतात. एक प्रेमळ पोष्टमास्तर तर हात धुणारांना यजमानांनी टावेल पुढे करावा, तसे ष्टांप घेणाऱ्यापुढे स्वतःची जीभ लांबवीत, असे मी आमच्या शेजारी एक गृहस्थ राहायचे, त्यांच्या घरी पाहुणे आले होते, त्यांना कोणीसे सांगितले होते, त्यांच्याकडून ऐकले आहे. तळहातावर शिर घेऊन सैनिक जातात, तसा तोंडाबाहेर जीभ घेऊन ष्टांप विकणारा एखादा पोष्टमास्तर ह्या भारतात निघणे अशक्य नाही. पण लहान गावचे पोष्टमास्तर हौशी असतात, हे मी स्वानुभवावरून—म्हणजे मी पोष्टमास्तर नव्हतो; मी पाहिले आहेत त्यावरून—सांगतो. माझ्या पाहण्यातले एक पोष्टमास्तर हौशी गवई होते. एक कीर्तनकार होते. एक नटसुद्धा होते. माझ्या ओळखीच्या डभोईकर पो० मा० ना आमच्या गावात 'टपाल-गंधर्व' म्हणत असत. मात्र तारखात्यात हौशी गवई, तबलजी वगैरेंना नेमू नये अशी माझी संबंधित अधिकाऱ्यांना विनंती आहे. उद्या कडकट्ट कडकट्टचा ठेका धरून भजनबिजन म्हणत बसले, तर गावोगावी भलत्या तारा जायच्या.

पण साऱ्या पोष्टखात्यात मला पोस्टमन ह्या माणसाबद्दल मात्र अतीव आदर आहे. आपल्या दारी पोष्टमन येऊ नये, असे वाटणारा माणूस म्हणजे ज्याच्यावर समन्सखेरीज दुसरे घेण्यासारखे काही नाही तेवढाच असावा. एक मात्र खरे, पोष्टमन आणि पाऊस हे हवे तेव्हा येत नाहीत. पाऊस पुष्कळदा नको तेव्हा येतो. पोष्टमन नकोसा नसतोच; उलट फार हवासा असतो, त्या वेळी आपल्या घराशी येऊन चटकन पुढल्या घराकडे जातो. पूर्वीच्या काळी दरवाजाला घंट्या नव्हत्या. घंटा वाजवून आपण आल्याची वर्दी फक्त देवळातल्या देवाला असे. त्या काळात पोष्टमनच्या पायांप्रमाणे तोंडाला व्यायाम असे. 'सोमऽण', 'कुळकर्णीऽ' असा पुकारा करावा लागे. तेव्हा पोष्टमन आळी गाजवून जायचे. आता दारातली बेल दोनदा वाजवून पोष्टमन वर्दी देतात. ह्या पोष्टमन लोकांना घरनंबर कसे दिसतात, कोण जाणे! नसलेले घरनंबर दिसतात, पण डिलिवरीवर निघालेल्या पोष्टमनला रस्त्यातली मारामारी, अपघात वगैरे काही दिसत नाही. भोवताली काहीही होवो, पोष्टमन अलिप्तपणाने चाललेले असतात. आपण बरे, आपली पत्रे बरी, या नादात त्याचे 'एकला चलो रे' चालू असते. मारामारी, अपघात वगैरेची गंमत पाहत पोलीससुद्धा उभे असतात, पण

पोष्टमन लोक उभे असलेले मी तरी पाहिले नाहीत. अशाच एका निष्काम कर्मयोगी पोष्टमनने पाचव्या मजल्यावरची आग विझवायला निघालेल्या आगबंबाच्या शिडीवरून शांतपणाने वर जाऊन पत्रे टाकून आल्याची कथा मी ऐकली आहे. बंबवाले आग विझवीत होते आणि पोष्टमन पत्रे टाकीत होता. आग-पाणी, ऊन-पाऊस, वादळ-वारा यांपलीकडे पोहोचलेला हा पत्रदाता. सदैव यावा-यावासा वाटणारा. फक्त दिवाळीच्या वेळी न आला तर चालेल. त्या वेळीं मात्र तो पोष्ट टाकायला न येता पोस्त मागायला येतो. चक्रपाणी भगवंताची जशी अनेक रूपे आहेत, तशी पत्रपाणी पोष्टमनचीही आहेत, हे त्या वेळी कळते. मुरलीवाला, कालीकमलीवाला, धेनुचरावत-वाला, मोरमुकुटवाला अशी विविध रूपे धारण करणाऱ्या कृष्णपरमात्म्याप्रमाणे एकच पोष्टमन तारवाला, एक्स्प्रेस डिलिवरीवाला, रजिष्टर पत्रवाला, मनिआर्डरवाला अशा निरनिराळ्या भूमिकांतून येतो. दिवाळीची बक्षिशी मागण्याची ही थोर परंपरा बहुधा पोष्टखात्यातून सुरू झाली असावी. त्याशिवाय त्या बक्षिशीला 'पोस्त' म्हणायचे कारण नव्हते. (व्याकरणाच्या नियमाप्रमाणे 'ष्ट'चा 'स्त' होतो. पाहा : तुष्टचा तुस्त.)

पोष्टात सुधारणा करण्यात येणार असल्याचे मी कुठेतरी वाचले आणि सुधारलेले पोष्ट डोळ्यांपुढे उभे राहिले. ष्टांप विकत घेण्यासाठी मी खिडकीपुढे उभा आहे. खिडकीही चांगली रुंद आहे. पलीकडले हसतमुख, दाढी वगैरे केलेले पोष्टमास्तर मला चक्क नमस्कार वगैरे करताहेत. नव्या सुधारलेल्या पोष्टात त्यांची नवी पदनामी झाली आहे. मुख्य पोष्टमास्तरांना 'प्राचार्य' म्हणताहेत. तारमास्तरना 'तंतुगुरुजी' केले आहे. पोष्टमनचा 'संदेशकुमार' झाला आहे. मनिऑर्डरच्या वातायनात बसलेल्या मास्तरला 'मनि-वर्य' किंवा 'धनाचार्य' म्हणताहेत. मी पंधरा पैशांचा ष्टांप घ्यायला गेलो आहे. पोष्टात झगझगीत उजेड आहे. कडकट्ट कडकट्ट ऐकू न येता 'मेरा प्रेमपत्र पढकर' किंवा 'सखये प्रेमपत्र पहिलें', 'हाय मेरे दिल् जलदी जवाब भेजो' असली गीते हलक्या सुरात ऐकू येताहेत. मुख्य म्हणजे पोष्टातल्या टाकाने लिहिता येऊ लागले आहे...असली चित्रे दिसू लागली. पण लगेच वाटले, "छेः, हे पोष्ट नव्हे!" न बदलणे हा मुळी पोष्टाचा स्थायिभाव आहे. शिवाय, रोज झपाट्याने बदलणाऱ्या ह्या जगात एखादी तरी न बदलणारी गोष्ट रुचिपालट म्हणून ठेवली पाहिजे. मायने बदलले, मजकुराची ढब बदलली, उद्या पोष्ट बदलले, तर कसे व्हायचे! पण 'बदलणे' हा हल्लीच्या जगाचा नवा छंद दिसतो. परदेशात बायकोच्या पोशाखाला मॅचिंग रंगाचा सूट नाही घातला तर नवरा बदलण्याची आतून धमकी मिळते, अशीही वार्ता ऐकली आहे. अशा वेळी पोष्टाचा खांब हा माझा एकमेव आधार आहे. नावासकट पोष्ट आहे असेच राहिले पाहिजे. मराठी किंवा हिंदीकरणाच्या भानगडीत डाक-घर केलेय, इथपर्यंत ठीक आहे. उत्साहाच्या आणि देशीकरणाच्या भरात डाकघरातल्या मास्तरांना 'डाकू' म्हणायचे कारण नाही.

केअर ऑफचे 'द्वारा' झाले. नुकताच मी एक पत्ता पाहिला. त्याच्यावर 'ला— श्री अमूक' असे होते. हे 'ला' कळेना. शेवटी ते 'टू'चे मराठीकरण आहे, असे कळले. पूर्वी '—स' नावाच्या कविता असत, तसला हा पत्ता होता. अशाने उद्या 'ला—श्री अमूक अमूक, ची—गंगारामा चाळ, ची पिछाडी सचिवा' असले पत्ते येतील. पूर्वीची माणसे मजकुरापेक्षा मायना मोठा लिहीत आणि 'पत्ता' म्हणजे पोष्टमनला लिहिलेले एक पत्रच असे. नुसते "ग० मो० सातपुते, दोनशे-तीन गुरुवार" असला तुटक पत्ता नसे. "हे पत्र श्रीयुत राजमान्य राजश्री गजानन मोरेश्वर सातपुते, सातपुते यांचा वाडा, गोळ्यांच्या वाड्यासमोर, बारा मारुतीशेजारी, घर नंबर दोनशे-तीन, गुरुवार पेठ, मुक्काम व पोष्ट ढापेवाडी, तालुका गुंजारा, जिल्हा वाढे, इलाखा मुंबई," असला मनमोकळेपणा होता. गोळ्यांच्या वाड्यात राहणाऱ्या माणसांच्या पत्त्यावर सातपुत्यांच्या वाड्यासमोर असे असल्यामुळे सातपुत्यांनाही आपल्यापेक्षा गोळे अधिक महशूर (देशी काढे असतात तसे) आहेत, असे वाटून दुःख होत नसे. शिवाय, तपशीलवार पत्त्यामुळे पोष्टमन खूष! परवाच मी एक पत्ता शोधीत होतो. समोरून पोष्टमन येताना पाहून मी त्यालाच पत्ता विचारला. पोष्टमन हताशपणाने म्हणाला,

"साहेब, मीसुद्धा तोच पत्ता गेले दोन दिवस शोधतोय."

"अहो, पण तुम्हांला इथले घरनंबर पाठ नाहीत?"

"होते, पण ते आता बदलले."

घरनंबर बदलणे हा पोष्टमनच्या जातीवर भयंकर अन्याय आहे. कालपर्यंत 'तीनशे-बत्तीस सदाशिव' असलेले घर आज 'चारशे-वीस शुक्रवार' झाले, तर कसे व्हायचे? म्हणून कसल्याही बदलाची झळ पोष्टाला लागता कामा नये. अंती पोष्टमनची पायपीट वाढते. माणूस हौस म्हणून पोष्टमन होईल, असे मला वाटत नाही. जगात ठरवून काहीच होत नाही, आणि जे होते ते त्याला कधीच व्हायचे नसते. माझ्या ओळखीच्या एका प्रख्यात डॉक्टरांना गवयी व्हायचे होते, आणि गवयाला 'हिंद-केसरी' होऊन गदा मिळवायची होती. मुलाखती घेणाऱ्याने जर पोष्टात एखाद्याला विचारले, "पोष्टात काम करण्याची महत्त्वाकांक्षा आपल्या मनात केव्हा उत्पन्न झाली?" तर उत्तरादाखल 'कडकट्ट' असा जोरदार आवाज उठेल. तारयंत्राचा नव्हे; विचारणाऱ्याची मुंडी मुरगळल्याचा. त्या मुलाखतवाल्याला बंगीत भरून डेड लेटर हापिसात टाकतील. तिथल्या बंग्यांचा बटवडा होत नाही. तेव्हा होतकरू मुलाखतवाल्यांनी सावध राहावे.

पोष्टाचे थोडेसे देवासारखे आहे. तो देईल, ते निमूटपणाने घ्यावे. जे पत्र, तार, एम० ओ०, व्ही० पी०, रजिष्टर, बुकपोष्ट आपल्या नशिबी असेल, ते पोष्टमन आणून देणार. देणारा तो, आणि घेणारे आपण. चार दिवस मनिऑर्डरीचे, चार दिवस व्ही० प्यांचे. हे सूत्र ज्याने जाणले, तो तरला. शेवटी आपण सगळे पत्त्यातल्या नावापुरते धनी. मजकुराचा मालक निराळा.

पोष्टल गूढतेतून घेण्यासारखे तत्त्व एवढेच! आमच्या ओळखीचे बागूल पोष्टमास्तर कीर्तने करायचे. गावकरी त्यांना 'पोष्टपरायण' म्हणत. ते एकदा म्हणाले होते,

"मातेच्या उदरी आणि महाराज बंगी भरताना तो जो काही वर सगळ्यांचा पोष्टमास्तर जनरल बसलाय, त्याने आपल्याला विचारले नव्हते. भरली बंगी—मारला माणूस हा शिक्का—आलो इथे. आता इथून पुढे बटवडा करायचं, ते त्याच्या हाती. तेव्हा इथून शेवटली डिलिव्हरी होण्यापूर्वी हरिनामाचा गजर चालू ठेवा महाराज, म्हणा—पुंडलीक वरदाऽहाऽऽरि विठ्ठऽल!"

आणि आम्ही अध्यात्माची ती पौष्टिक गुटी गिळून ओरडत होतो, पुंडलीक वरदाऽ हाऽऽरि विठ्ठऽऽल.

# चाळशी

काही दिवसांपूर्वी माझा चष्मा फुटला. इ० स० एकोणिसशे चाळीसच्या जून महिन्यात माझ्या डोळ्यांवर पहिला चष्मा आला. त्यापूर्वीचा काळ मला स्वच्छ दिसतोय! एकाएकी लोकलगाडी बोरिवली आहे की वांद्रा ते नीट दिसेनासे झाले, प्लॅटफॉर्मवरच्या इंडिकेटरचे काटे कुठे आहेत ते जवळ जाऊन पाहावे लागले. पलीकडच्या फुटपाथ-वरच्या तरुणी रंगीत चित्राचा ब्लॉक सरकल्यावर दिसतात तशा दिसू लागल्या. आणि आपल्या डोळ्यांनी आपल्याला फार लौकर दगा दिला ही खात्री पटली. नाकाखालची मिशी आणि नाकावरची आरशी जवळजवळ जोडीजोडीनेच आली. आणि शेवटी...

...एकोणिसशे चाळिसच्या पंधरा जूनला संध्याकाळी पाचाच्या सुमाराला एक सडपातळ बांध्याचा (हाय!), सावळ्या वर्णाचा युवक गिरगावातील फुटपाथवरील दुसऱ्या तीरावरून जाणारी रहदारी पाणी पडलेल्या काचेतून दिसावी तशी दिसायला लागल्यामुळे भ्रमिष्टासारखा एका दुकानात शिरला, आणि उतरताना चष्मिष्ट होऊन उतरला. ते दुकान चष्म्यांचे होते हे चाणाक्षांच्या लक्षात यावे.

आता पलीकडला फुटपाथ स्वच्छ दिसू लागला. समोरच्या चाळीतल्या दुसऱ्या मजल्यावर कुणी तरी टी० टी० गोरक्षकर 'घरी नाहीत' ही पाटीदेखील त्याला वाचता आली. गेला महिना-दीड महिना याला डोंगरे बालामृताची अक्षरेदेखील क्षीण दिसत होती. आता सृष्टी बदलली. तो तरुणही निराळा दिसायला लागला. तो म्हणजे मी, हे चतुर वाचकांना इ० इ०.

त्यानंतर आयुष्यात अनेक चष्मे आणि चष्मेवाले, स्वयंवरातल्या 'बहुत नृपति ते'-सारखे आले-गेले! काही हरवले, काही फुटले. काहींनी काडीमोड केली. काहींचे पूल मोडले. पण शेवटला चष्मा फुटला, त्याचे फुटणे मात्र जरा निराळे.

मी दोन चष्मे वापरतो. दोन्ही नंबराचेच, पण एक उन्हाचा आणि दुसरा साव-लीचा. रस्त्यात काळा चष्मा आणि घरात गोरा! काळा चष्मा लावून चालतो होतो

आणि समोरून एक साहित्यिक मित्र आला. त्याने काही कारण नसताना कडकडून मिठी मारली आणि ती मिठी कोटाच्या वरच्या खिशात कडकडली. पापड मोडावा, तसा चष्मा काचाकाड्यांसकट मोडला. ह्या माझ्या साहित्यिक मित्राला उगीचच मिठ्या मारायची सवय आहे. त्याची एरवीची मिठी मला दोन चहा, खारी बिस्किटे आणि एक सिगरेटचे पाकीट—माचिससह—एवढ्याला पडते. पण आजची मिठी सेल्स टॅक्स वगळून जवळजवळ चौतीस रुपयांना पडणार होती.

कोटाच्या वरच्या खिशात काचांचा आणि काड्यांचा चुरा झाला होता. आठवत असलेल्या यच्चयावत शिव्या कशाबशा दात दाबून आत अडवून धरल्या होत्या.

"काय वाजलं रे?" मिठीवाला साहित्यिक म्हणाला.

"खिशातला चष्मा फुटला!" मी शिव्यांची गर्दी मागे हटवून हे वाक्य बाहेर काढले.

"हात्याच्या! एवढंच ना? दॅट्स ऑलराइट! चल, चहा घेऊ या!"

आता ह्या माणसाला काय म्हणावे, मला कळत नव्हते असे नाही, पण तोंडून येईना. शिवाय, वर "चहा घेऊ या" होतेच. चहा पिताना ती फुर्र करण्याची सवय मला अधिकच जाचू लागली. बाकी माणसाला, दोन ठेवून द्याव्या असे वाटले आणि तो जर त्या ठेवून देऊ शकला नाही, तर त्याची काय विलक्षण गुदमरल्यासारखी अवस्था होते! ज्याच्या तोंडात ठेवायच्या त्याची प्रत्येक गोष्ट संताप आणते. एरवी, माझे-त्याचे संबंध त्याची पुस्तके वाचूनही ठीक होते. पण आता त्याचा आवाज, त्याचे ते गुडघा हलवणे, त्याची ती चापूनचोपून भांग काढण्याची पद्धत, त्याच्या मिशीचा आकार, नाकाजवळची चामखीळ—सगळ्यांचाच राग येऊ लागला होता. चष्मेवाल्याचा चष्मा फुटला की त्याला जे काही होते ते फक्त उपनेत्रवंतच जाणतात. आपण खुळे आहोत असे वाटायला लागते. आपल्या हातून यापुढे एकही कर्तृत्वपूर्ण कृत्य घडणार नाही याची खात्री होते. चष्म्याशिवाय हिंडताना सारे जग हे पायांच्या अंगठ्यांचा सूड घेण्यासाठी घडले आहे, असे ठेचेठेचेला पटते. दुर्दैवाची गोष्ट अशी की, चष्म्याशिवाय आपल्याला दिसत नाही हे बिगरचष्मेवाल्यांना पटत नाही. समोर येऊनही तो औट ऑफ फोकस चित्रासारखा दिसतो. चेहऱ्यावर (आपल्या) एक विलक्षण वेंधळेपणा येतो. पण तो उपनेत्र गेल्यामुळे आला आहे हे पाहणाराच्या ध्यानात येत नाही, आणि "एकूण पहिल्यापासूनच हा जरासा हाच!" अशा स्वरूपाची टीका अप्रत्यक्ष किंवा प्रत्यक्ष रीतीने ऐकू येते. आणि तशात मोडलेला चष्मा चष्मेवाल्याकडून वेळच्या वेळी मिळू नये, म्हणजे एकदोन दिवसांतच "जग हें असार सारें जें दिसतें तें अखेर जायाचें" हीच एक ओळ नेमकी आठवते. आणि जे सगळे अखेर जायाचे ते दिसले काय किंवा भुरकट दिसले काय, एकूण एकच, असे आध्यात्मिक समाधान वाटू लागते.

तसा काळ्या काचांचा चष्मा शिल्लक होता. परंतु दिवसभर काळा चष्मा लावून घरातदेखील वावरायला मी काही सिनेमातला हीरो, डिटेक्टिव्ह किंवा खुनी नव्हतो.

ही मंडळी सदैव डोळ्यांना काळा चष्मा लावतात. त्यामुळे चोराला आपण डिटेक्टिव्ह आहोत, असे भासविता येते; डिटेक्टिव्हला काळा चष्मा लावलेला दुसरा इसम डिटे-क्टिव्ह आहे असे वाटून एकाच गुन्ह्याचा दोघां-दोघांनी तपास करण्यात काय हशील, असा पोक्त विचार सुचून तो दुसऱ्या एखाद्या चांगल्याशा खुनामागे लागतो; आणि काळा चष्मेवाला हीरो हिरॉइनपुढे चोर आणि तिच्या बापापुढे डिटेक्टिव्ह अशा दुहेरी भूमिकेतून वावरू शकतो. त्यांचे ठीक आहे. पण आमच्या आळीत हे जमण्यासारखे नव्हते. तिथे काळा चष्मा लावून मी वेळीअवेळी हिंडू लागलो की, मला खुपऱ्या झाल्या असाव्या ह्या समजुतीने पंचवीस जणांनी आपले हौशी वैद्यकीय ज्ञान मोकळे केले असते, किंवा डोळे आल्याची अफवा पसरून माणसे पांगली असती.

तात्पर्य, शक्य तितक्या लवकर नवा चष्मा घेणे प्राप्त होते. मी अन्नाशिवाय दिवस काढले आहेत, पण चष्म्याशिवाय एक तास काढणे अवघड. (फार भूक लागली की हे विधान मी उलटे करतो—खोटे कां बोला !) सकाळी जाग आल्यानंतर डोळ्यांवर चष्मा चढला नाही, तर दिवस फुटल्याचे कळत नाही. थोडक्यात चष्मा फुटला की नशीब फुटल्यावर काय होत असावे याची अंधुक कल्पना येते.

माझ्या चष्म्याचा निकाल लावणाऱ्या साहित्यिक मित्राला मनातून लाखोली वाहिली, आणि पहिले चष्म्याचे दुकान दिसले त्यात शिरलो. हल्ली मी कुठल्याही दुकानात दहा-दहा वेळा पाटी वाचून शिरतो. एकदा सलून समजून दंतवैद्याच्या खुर्चीवर जाऊन बसलो, आणि दाढीऐवजी त्याने दाढ असे ऐकल्यानंतर घडलेली (दंत)कथा कुणाच्याही हृदयाचे पाणी करील. मला चष्मेवाल्यांच्या एका चतुराईचे कौतुक करावेसे वाटते. त्यांच्या दुकानाची पायरी—बहुधा अडखळत—चढणारा इसम हा डोळ्यांनी अधू आहे हे त्यांना ठाऊक असल्यामुळे त्यांच्या दुकानाच्या दारात जन्मांधाला दिसावा एवढा भीमसेनी लाटण्यासारखा भीमसेनी चष्मा असतो. तरीदेखील मी आपला पाटी वाचून शिरलो. मी आणि दुकाने व दुकानदार ह्यांच्यात हल्ली एकूणच सांस्कृतिक तफावत पडत चालली आहे. पूर्वी सलूनमध्ये शिरल्याबरोबर पहिली रिकामी खुर्ची पटकावून "दाढी" असे पुटपुटल्यावर कारागीर एका झटक्यात गळ्याभोवती टुवाल टाकून तोंडाला फेस आणीत असे. आता नाही. आता दाढी म्हणून हनुवटीवरून तळवा घासून दाख-विला तरी प्रो० मकरंद मगर वगैरेसारखे नाव धारण करणारा कारागीरदेखील "शेव ?" असे विचारतो. "दाढी" म्हटल्यावर जणू काय सलूनमध्ये आपण टागोरांसारखी दाढी चिकटवून घ्यायला आलो आहो अशी त्याची समजूत होते की काय, देव जाणे ! एकदा तर एकाने सगळी दाढी टुवाल बांधून केल्यानंतरसुद्धा "टॉवेल ?" असे विचारले. मी म्हटले, "संपली असेल, तर काढा !" कारण दाढी झाल्यावरही पोरांना लाळे बांधून फिरायला काढतात तशी टॉवेल बांधून गिऱ्हाइकालाही हिंडवायची फ्याशन आली आहे की काय, मला कळेना. पण काही वेळाने एक गरम पाण्यात भिजविलेला टॉवेल माझ्या चेहऱ्यावर शीख लोक दाढीभोवती जाळी बांधतात तसा बांधून सोडवला गेला. ही सुधारणा माझ्या परिचयाची नव्हती. न्हाव्यांनी धोपटीमार्ग

सोडल्यानंतर त्यांच्यात विलक्षण फरक पडला आहे. कारागीर, शिंपी, रंगारी ह्यांच्यात आणि माझ्यात दिवसेंदिवस विलक्षण अंतर पडत चालले आहे. हे अलीकडे मला फारच जाणवू लागले आहे. नुकताच मी एक शर्ट शिवून घेतला. मापे घेताना शिंप्याने असे काही चेहरे केले की, त्याचे ते चेहरे आणि पोटाबिटाचे माप घेताना "डिस-प्रपोर्शनेट" वगैरे उद्गार त्या शर्टाआधी माझ्या अंतःकरणाला काजे करून गेले. शेवटी "शर्टाच्या डाव्या बाजूला खिसा करा," ह्या माझ्या सूचनेला तो एकदम "फ्यूऽऽ" करून हसला.

"खिसा!" तो हसला. त्याचा असिस्टंट मिशनीवर पाय मारायचा थांबून हसला. आणि दोन गिऱ्हाइके हसली.

परवा बिऱ्हाडात रंग लावायला रंगारी आला. पूर्वी रंगारी चटकन ओळखू येई. टोपीपासून चपलेपर्यंत स्वतः रंगलेला हा माणूस केव्हा आला आणि केव्हा गेला हेच काय, पण जुना रंग जाऊन भिंतीवर नवा रंग आला हेदेखील कळत नसे. नवा रंगारी पांढरीशुभ्र पँट, रेशमी शर्ट, टाय वगैरे लावून आला. त्याने मला कार्ड दिले. त्यावरून तो रंगारी आहे हे कळण्याऐवजी त्याच्याकडे टेलिफोन आहे हे कळले. शेवटी चार भिंतींना चार रंग काढून गेला. हल्ली मला मी घरात न राहता रंगीबेरंगी आकाशकंदिलात राहतो, असे वाटू लागले आहे. त्यातून घरात मला सारखा विरोध चालू आहेच. मला 'हाऊस' कशी ती नाही हे वाक्य मी कितीदा ऐकतो, याची मोजदाद करणे अशक्य आहे. अमकीचा नवरा हौशी आहे, तमकीचा हौशी आहे, हे ऐकून हौशी आणि धंदेवाईक नटांसारखे देशात हौशी नवरे आणि धंदेवाईक एजमान असा काही प्रकार रूढ होऊ लागला आहे की काय, अशी धास्ती वाटू लागली आहे.

चष्मेवाला तरी अपवाद कां ठरावा? पूर्वी कुठल्याही चष्मेवाल्याकडे जावे, अबकडईफ वाचावे, अन् डोळ्यांवर आरशी चढवावी, असा सीधा खाक्या होता. प्रस्तुत चष्मेवाल्याने मला एका अंधारकोठडीत नेले. डोळ्यांत कसलेसे औषध घातले. चमत्कारिक प्रश्न विचारले. वडील चष्मा लावीत होते का? आपण काय करता? रस्त्यात पाट्या वाचायची सवय आहे का? मी डोळे मिटून (औषधामुळे) वाटेल ती उत्तरे दिल्यावर "आपण काल येऊन ज्यावा!" असे तो म्हणाला. आज आलेला माणूस काल कसा येणार ते कळेना, पण भारतीय भावनात्मक ऐक्य बिघडायला नको म्हणून त्याची मराठी भाषा मी सुधारली नाही. बाहेर पडलो, तर सगळे जग पिवळे दिसू लागले. मी घाबरून परत त्याला गाठले. कारण तपासणीचे पाच रुपये देऊन कावीळ विकत घ्यायची नव्हती.

"अरे, ते काय नाय! ते तुमच्या आयमधी मॅडिसन घालून टाकले आहे, तेचा इफॅक्ट हाय. ते दोन-चार कल्लाकमंदी समदा साफ होऊन ज्यायल. पण काल बराबर टॅन वाजता या बपोरमंदी."

मग दुसऱ्या दिवशी बपोरमंदी गेलो. त्याने जवळच्या होत्या नव्हत्या तितक्या

काचा डोळ्यांवर चढवल्या. फूटपट्टीने नाकापासून कान, डोळ्यापासून डोळा मोजला. अबकडईफ सोडाच, पण अनेक मासिके, क्याटलॉग, काय नाही नाही ते वाचून घेतले. आणि शेवटी मला पाहायचा एक आणि वाचायचा एक असे दोन चष्मे घ्यावे लागतील, असे जाहीर केले.

"म्हणजे मला चाळशी लागेल?"

"यस! उमर काय झाली, साहेब?"

"किती वाटते?" मी विचारू नये तो प्रश्न विचारला.

"लगभग फिफ्टिवन."

मी त्याचे बिल टिकवून तीन चष्मे घेऊन निघालो. एक पांढरा पाहण्याचा, एक काळा पाहण्याचा, एक जवळचे पाहण्याचा-वाचण्याचा! नेमक्या चाळिसाव्या वर्षी मला चाळशी लागली. अजून दाखवायचे आणि खायचे दात एकच असले, तरी पाहायची अन् वाचायची आरशी बदलली. एवढ्यात विशी ते चाळिशी हा प्रवास झाला अं! मी एकदम अंतर्मुख झालो.

चाळशी आली, काही वर्षांनी कवळी येणार. जवळचे दिसले तर दूरचे नाही, दूरचे दिसले तर जवळचे दुरावते, अशी अवस्था झाली. माझ्या डोक्यावर 'कृतांत-कटकामलध्वजा'चे तिशीतच झेंडावंदन झाले होते. पण चाळशीने मला जरा अधिक धक्का दिला. एक वेळ दोन बायका संभाळता येतील. काही वीरपुरुषांनी त्या संभाळल्या आहेत याला इतिहास आणि वर्तमान साक्ष आहे, पण दोन चष्मे संभाळणे अत्यंत बिकट! आपल्या डोळ्यांवर कुठला चष्मा चढला आहे ते वेळच्या वेळी माणसाच्या लक्षात येते, तर जगातले अनेक अनर्थ टळले असते. सकाळचे वर्तमानपत्र सारवून आणल्यासारखे दिसू लागल्यावर त्या संपादकाच्या नावाने एखादा शब्द ओठांतून बाहेर पडायच्या आत आपण वाचायचा चष्मा लावला नाही हे कळते. सुरवातीला आत जाऊन तो चष्मा आणायचा उत्साह राहतो, पण पुढेपुढे चष्मा कपाळी ठेवून जरा वर्तमानपत्र डोळ्यांशी आणले की लख्ख दिसते हे उमगते. चष्मेवाले दुकानदार हे गुपित आपल्यापासून लपवून ठेवतात. मात्र तसे वाचताना आपला अवतार अधिकच खुळ्यासारखा दिसत असावा. कारण मी वाचायची ती पोज घेतली रे घेतली, की चि० शंकऱ्या किंवा 'ही' धावत धावत जाऊन तो चष्मा मला आणून देतात. तो एकदा घातला की काढायचे राहून जाते. आणि मग बसस्टॉपवर बस 'ओ' रूट असली तरी 'बी' रूट वाटते. खिशात दोन आणि नाकावर एक अशा तीन चष्म्यांचे ओझे बाळगीत हिंडावे लागते. बसमचे शेजारी बसणाऱ्या माणसांनाच नेहमी चांगली चांगली मासिके कशी मिळतात, कळत नाही. एकचष्मी मंडळींना शेजाऱ्याचे व आपले वाचन जोडीने जमते. आता दूर पाहण्याच्या चष्म्यातून त्याच्या पानावरची जरा देखणी चित्रे भुरकट दिसतात. बरे, चष्मा बदलून ते पाहावे, तर आपले मासिक हा फुकटात वाचीत आहे, हे शेजाऱ्याच्या लक्षात येते. त्यामुळे त्या भुरकटपणात समाधान मानावे लागते. आजूबाजूचे लख्ख दिसते, पण बसमध्ये

नेहमीच काही आजूबाजू प्रेक्षणीय असते असे नाही. शिवाय, एक अनुभव असा की, प्रेक्षणीय प्रवासी आणि मी ह्यांचा एक सनातन लपंडाव आहे! मी तळमजल्यावर असलो की, वरच्या मजल्यावर जागा रिकामी असते. आणि वरच्या मजल्यावरून मला स्टँडवरच्या क्यूमधे दिसणारी नयनाल्हादकारक सुकांतचंद्रानना आत आली की, तळमजल्यावर शिटा मोकळ्या असतात. मात्र चाळिशीतून मागे पाहिले की जग निराळे दिसते हे खरे. नव्या चष्म्याने जवळचे जग दिसते नीट, पण जरा अपरिचित वाटू लागते.

आणि माझ्यातला 'मी' शोधावा, असे वाटायला लागते. विशीत सृष्टी नवीन होती. आता चाळिशीत ती दुप्पट नवीन दिसायला लागेल, अशी कल्पना नव्हती. चाळिशी आली की, पुणे-मुंबई-प्रवासाच्या भाषेत बोलायचे म्हणजे कर्जत आल्यासारखे वाटते. घाटातली थंडी व वनश्री संपून उकाडा सुरू होतो. पण काही महाभाग मुंबई ते पुणेही प्रवास करतात. त्यांचा जीवनातल्या धडपडीचा उकाडा संपून गारवा येतो. लोक "पैशाची ऊब" का म्हणतात, देव जाणे! हा इंग्रजी वाक्प्रचार असावा. आपल्या देशी भाषेत बोलायचे, तर "पैशाचा गारवा" म्हटला पाहिजे! प्रवास कुठल्या का दिशेला असेना, इकडून कल्याण, दादर, बोरीबंदर आणि तिकडून लोणावळा, शिवाजीनगर, पुणे झाले, की खेळ खलास! मग मागे फक्त चष्मे उरतात!

इंग्रजीत ह्या चाळिशीला "चावटचाळिशी" म्हणतात. गद्धेपंचविशी, चावटचाळिशी, नाठीसाठी ह्या शब्दांना अर्थ मात्र खोल आहे, हे खरे! चाळिशीच्या सुमाराला विशीतून सुरू झालेला जीवनातल्या धडपडीचा वेग आवरलेला असतो. नानाविध अनुभवांचे धरण साठलेले असते. स्थिरचराला अनुभूतींचे साहचर्य लाभलेले असते. उगवता चंद्र सोबत काही कडूगोड आठवणी घेऊन उगवलेला दिसतो. माझ्या विशीतल्या उगवत्या चंद्राने एका नाजूक वियोगाचा चटका दिला होता. आंबराईतल्या मोहोराच्या गंधाने एका सुरेल कोकिळकंठातली स्वरवेल फुलविली होती. समुद्राच्या एका लाटेने जिवापाड जपलेल्या काही आठवणी वाहून नेल्या होत्या. तिशीपर्यंत ह्या साऱ्या स्मृतींचा सुगंध दरवळला होता. काही अत्तरांचा कडवट वासदेखील घ्यावाघ्यावासा वाटतो. पण चाळिशी गाठता गाठता त्या जखमा बुजलेल्या असतात—नव्हे, वणदेखील नाहीतसे झालेले असतात, आणि म्हणूनच पाटी पुन्हा एकदा कोरी होते.

खानदानी गाण्याच्या नुसत्या आठवणींनी फुलून उठणारे तिशीतले मन विशीतला रंग फिका न पडल्यामुळे सिनेमातल्या गाण्यांचा तिरस्कार करून उठते. आता मुलाबाळांच्या, किंवा अगदीच खरे सांगायचे म्हणजे मुलीबाळींच्या, परिवारात फर्मायशी कार्यक्रम ऐकताना "अरे, कसली रे टामटाम टुमटुम गाणी ऐकता?" म्हणणारा मी नकळत ती गाणी कान देऊन ऐकू लागतो, आणि त्यांच्यात रमतो. काळी विजार आणि पिवळा शर्ट घालून हिंडणारी षोडशवर्षदेशीया तिशीत आढळली असती, तर "संस्कृती बुडाली!" म्हणून मी पहिली हैराण आरोळी ठोकली असती. कारण पंचविशीत पाहिलेल्या मंगळागौरींचा मेळावा मनातून पूर्णपणे उठलेला नसतो. आता

हे नवे ध्यानदेखील दुसऱ्यांदा पाहण्याच्या योग्यतेचे असावे बरे का, असे आपले आपल्याला वाटू लागते. तात्पर्य, विशीतले तारुण्य चाळिशीत दुप्पट उत्साहाने उसळी घेते आणि तिशीतली मतांची तीव्रता साठीत दुप्पट हट्टी होऊन येते.

आणि म्हणूनच की काय कोण जाणे, तो जुना 'मी' पुन्हा एकदा पाहावा, असे वाटायला लागते. तिशीतून मागे पाहत होतो, तेव्हा बाळपणीच्या आठवणींचे चटके विसरलो नव्हतो. चाळिशीतून बालपण, त्यातल्या पाढे, मोडी पुस्ती, भूगोलातले कूट प्रश्न आणि इतिहासाच्या सनावळ्या ह्या वेदना जमेला धरूनसुद्धा मजेशीर वाटायला लागते. तारुण्यात निराळ्या अर्थाने चटका लावून गेलेल्या व्यक्ती पुन्हा भेटल्या, की शेक्सपिअरच्या चालीवर "हाच का तो चेहरा—की ज्याने बुडवली होती असंख्य गलबते आणि जन्माला घातले होते ट्रॉयचे युद्ध?" असे स्वतःलाच मिस्किलपणे विचारावेसे वाटते. सारी युद्धे शांत झालेली असतात. मन देवटाक्यासारखे निर्मळ होते, आणि म्हणूनच कदाचित नवा रंग स्वीकारायला नाही म्हणत नाही. मनाच्या खऱ्या औदार्याचा साक्षात्कार चाळिशीतच होतो, आणि म्हणूनच कदाचित प्रथमच चाळिशी चढवलेल्या त्या कुण्या इंग्रजाने म्हटले असेल की, आयुष्याची सुरवात चाळिशीत होते. न्याय-अन्याय, मान-अपमान, प्रेमभंग आणि प्रेमपूर्ती, निर्धनता आणि सधनता हे सारे भोग भोगून चाळिशीतला माणूस म्हणतो, अस्सं! ह्या खेळाचे नियम हे आहेत होय? आलं लक्षात. आता मांडा सारीपाट!

# काही अप—
# काही डाउन

आदर्श टुमदार सुंदर खेड्याबद्दल माझ्या काही अपेक्षा असतात. त्या खेड्याच्या उशाशी टेकडी असावी. त्या गावाच्या गळ्यात जाता जाता लडिवाळपणे हात टाकून गेलेली नदी असावी. घाटदार कळसाचे देऊळ असावे. गावाच्या पाठीशी पहाऱ्याला उभे असलेले उंच आकाश-निंब असावेत. पिंपळाचा पार असावा. त्या पारावर वडलेली कहाणी असावी. गावाकडून वाट मुरडत मुरडत यावी आणि एखाद्या अगदी चिमुकल्या स्टेशनाला मिळावी. स्टेशन इतके चिमुकले हवे की, तिथल्या फलाटाला "प्लॅटफॉर्म" म्हटलेले ऐकल्यावर त्याने लाजावे! एखाद्या शेतकऱ्याच्या धाकल्या सुनेला तिच्या माहेरच्या माणसाने "काय पाटलीणबाई—" म्हटल्यावर ती लाजेल, तसे लाजावे!

असल्या ह्या चिमुकल्या फलाटाचे मला विलक्षण आकर्षण आहे. तिथे एखाद-दोन येणाऱ्या आणि एखाद-दोन जाणाऱ्या एवढ्याच पासिंजर गाड्या थांबाव्या. भुकेची वेळ झाल्यावर पाळण्यातले तान्हे जसे चुळबुळते, तसे गाडी येण्या-जाण्याच्या सुमाराला थोडेसे जागून झोपणारे स्टेशन हवे! सकाळच्या पासिंजरला कोण आले न् सांजच्याला कोण गेले, हे साऱ्या गावाला कळावे. असली जवळीक असलेला फलाट, आणि "काय पाटीलऽ, आक्काताई चालल्या का सासरी?" म्हणणारा स्टेशनमास्तर आणि "अगऽ आन्सूये, पोराला कुंची बांधावी का न्हाइ नीट? वारं कसं झणाणतंय—सर्दी भरली म्हंजी मऽग?" म्हणणारा निळ्या कपड्यांतला, कपाळाला बुक्का न् गळ्यात तुळशीमाळ घातलेला पोर्टर हवा. मग मास्तरसाहेबांसी पाटलाच्या पोरीचा भर फलाटावर वाकून नमस्कार घडावा, आणि "अष्टपुत्रा सौभाग्यवती भव" म्हणताना जमशेटपूर किंवा असल्याच दूरच्या ठिकाणी दिलेल्या आपल्या मुलीच्या आठवणीने मास्तर आपले गहिवरणे दडवायला "सेवण्टीन अप लेट आहे आज..." म्हणत खिडकीशी आलेल्या माणसाला तिकीट द्यायला निघून जावेत. असल्या आपुलकीचा फलाट!

गावंढी माणसे शब्दांचे टोचणारे कोपरे काय सुरेख घासतात. प्लॅटफॉर्मचा 'फलाट' करतील. स्टेशनाचं 'ठेसन' झाल्याबरोबर त्याला प्राण आला. ठेसनाला जीव आहे. 'स्टेशन' हे टाइमटेबलातल्या नामावळीत ठीक आहे. पण 'ठेसन' म्हटल्यावर तिथे तऱ्हेतऱ्हेचे भाव दाटतात. "पोचल्याबराब्बर कार्ड टाकायचं बरं अंतुल्या, इसरायचं न्हाई..." इथपासून "बराय...बघू पुन्हा केव्हा जमतं ते. सध्या लीव्ह-बीव मिळवायची म्हणजे देअर आर हंड्रेड अँड वन् डिफिकल्टीज..." इथपर्यंत असंख्य भाव दाटतात. काही बोलके, काही मुके—म्हणून अधिक बोलके. लोकांच्या अनवाणी आणि पायताणी तळव्यांची भृगुचिन्हे मिरविणाऱ्या ह्या फलाटांनी काय काय म्हणून पाहिले असेल! कान लावून फलाटाचे बोलणे ऐकता आले पाहिजे.

आगगाडीचा गार्ड व्हावे, आणि इंजिनाची शिट्टी वाजवावी, ही माझी जुनी महत्त्वाकांक्षा होती.

*शिट्टी वाजवावी, वाफ दवडावी*
*वाट हे चालावी रूळ-लेली*

हे कारकुनी घरात वाढलेल्या कुणाही पोराचे स्वप्न असावे, ह्यात नवल नाही. जिथे जीवनविषयक महान तत्त्वज्ञानाचे बाळकडू पाजणारे पहिले बाळगीत "कशासाठी, पोटासाठी" हे, तिथे आगगाडी आणि आगगाडीच्या भोवतालचे ते वातावरण ह्यांचा पगडा मनावर आजन्म बसावा, हे साहजिकच आहे. म्याट्रिक, बी० ए०, सरकारी अगर निमसरकारी खात्यात कारकुनी, टेबलखुर्ची, लग्न, संसार, पेन्शन, इत्यादी ठराविक स्टेशने घेणारे टाइमटेबल. जन्मकुंडलीलाच जोडलेले रूळ बदलायचे कसे? आणि का? ("आम्ही काय संसार केले नाहीत?" वरच्या पिढीचे पेटंट वाक्य!) शेवटी कशासाठी पोटासाठी...कशासाठी पोटासाठी...आणि खंडाळ्याच्या घाटासाठी! तो घाट ओलांडून पुणे नामक निवृत्तिक्षेत्री लहानसा बंगला बांधण्यासाठी! झुळूझुळू झुळूझुळू करीत तिथे पोहोचायचे! बाकी आमची बालगीतेही आपल्या पुढल्या आयुष्यक्रमाला साजेशी. "अडगुळंऽ मडगुळंऽ" हे बालगीत नव्हे. कारण ते आईनेच म्हणायचे असते. पहिले बालमुखातून निघणारे गीत "कशासाठी पोटासाठी" आणि त्यानंतर "ए रे, ए रे पावसा, तुला देतो पयसा, पयसा झाला खोओटा, पाऊस आला मोऽठा!" पैशाच्या लालचीने पावसाला बोलावून त्याच्या हाती खोटा पैसा देऊन आपली विहीर भरून घेण्याचे कसब कलमदान्यांच्या कुळीलाच शोभणारे! कारकुनी गादीच्या कोपऱ्याखाली घातलेली खरी नाणी ही अशी पाण्यावारी उधळायला जमविलेली नसतात.

आगगाडी आणि आगगाडीवाले (आता बिचारे 'रेलकर्मचारी' झाले!) ह्यांची एक निराळीच दुनिया आहे. त्यांची भाषा निराळी, दिसणे निराळे, हौशी निराळ्या. इंग्रजी मुळाक्षरांच्या परिभाषेत बोलणे ही एक कारकुनी ऐट आहे. "डी० सी० च्या ए० डी० ला मी टी० टी० एन० कडे जायला सांगितले," ही साऱ्याच सरकारी

कारकुनांची भाषा, हे खरे. पण रेल्वेवाल्यांपुढे ह्या सगळ्यांना हार खावी लागेल. इथे टी० सी० पासून जी० एम० पर्यंत सगळ्या एबीसीडीने असंख्य कोलांट्या खाल्ल्या आहेत. इतरेजनांना मारे मेल-एक्सप्रेसचे कौतुक असेल, रेल्वेवाल्यांच्या खाती त्या केवळ काही अप आहेत, काही डाउन! इंग्रजी भाषा येत असल्याचा ताठा उतरवायचा असेल, तर स्टेशनमास्तर आपल्या त्या मरहूम महाराणी व्हिक्तुरिया देवी (साता समुद्रांपलीकडील इ०)च्या काळातल्या टेलिफोनमधून दुसऱ्या मास्तरांशी बोलताना ऐकावे. 'हॅलो' पलीकडे एक अक्षर कळत नाही. शिवाय, त्या फोनमध्ये एवढे ओरडून का बोलावे लागते तेही अगम्य आहे. त्यातून स्टेशनमास्तरांना शिकविण्यात येणारे इंग्रजी आणि इतरेजनांचे ह्यांच्यातही फारच फरक आहे. इंग्रजीचा हा बाजच निराळा. तारमास्तरांचा आणि पोष्टमास्तरांचाही एक निराळा बाज असतो. लहानग्या स्टेशनातले स्टेशनमास्तर गाडी येईपर्यंत बनियन-धोतरांतच असतात. आधीच्या स्टेशनातली लाइन क्लिअर खणखणली की, शर्ट-कोट चढवून आपली ती बिल्लावाली टोपी घालतात. हातात शेवेचा लाडू घेऊन चघळणाऱ्या, केरवा मण्यांची माळ, पायांत वाळा, अंगात पोटापर्यंत लाळेने भिजलेले झबले घातलेल्या आपल्या धाकट्याला मांडीवर घेऊन खेळवीत कडकट्ट करणारे, किंवा "हां हलो, डी० टी०— यस कमिंग एँ—अलोन व्हाट? अँ?...वो० के०, वोऽऽके" करणारा सामान्य सुब्बरामय्या किंवा कुरकळणी कोट चढवल्यावर एकदम ए० एस० एम० दिसायला लागतो. मग तो आपल्या राज्यात वाइफलादेखील अलाव करत नाही. सदर्न मराठा लाइनीवरच्या एका स्टेशनमास्तराने मला स्वच्छ सुनवले होते, "यकदा ट्रेनचं अरायवल टायम आलं, की माझं ओऽन वाइफ असलं, तरी नॉट अलाउड रे, बाबा. म्हणून स्ट्रिक्ट वॉर्निंग काढून ठेवलं की हो मी! यकदा ड्यूटि म्हटलं की वाइफ इल्ला येऽऽन इल्ला—बरावर की नाही हो?" भलत्या प्रांतातले लोक भलत्या प्रांतातल्या स्टेशनात स्टेशनमास्तर म्हणून उचलून टाकणे हा रेल्वेखात्याचा आवडता छंद आहे; पण भाषा हा स्टेशनमास्तर ह्या जमातीच्या हिशेबी गौण मुद्दा असतो. 'ठेसन' ह्या चिमुकल्या राज्याचा राजा हां हां म्हणता वाटेल त्या गावी जम बसवितो. त्यातून भजनाविजनाची 'हाउस' असलेला मास्तर असला तर प्रश्नच मिटला.

माझ्या डोळ्यांपुढे एखाद्या निवांत क्षणी रेंगाळणारा हा फलाट आता बदलत चालला आहे. जुन्या संस्कृतीची वाढ नदीच्या किनारी व्हायची. नवी रेल्वेच्या रुळांच्या आजूबाजूला फोफावते. पुणे फाट्यावरच्या शेलारवाडी-चिंचवडचे फलाट असेच बदलले. धोतर-मुंडाशातला हा फलाट आता टेरिलीनचे बुशकोट घालून, चोरट्या आयातीतले सोनेरी घड्याळ मनगटावर मिरवू लागला. तिथल्या निंबाखालच्या "सगुने रुऽहूपे साहावळेऽऽ" म्हणणारा आंधळा गेला, आणि ट्रॅन्झिस्टरमधून सिनेमातले गाणं गळायला लागले. पण अजूनही पुरानी यादें दिलानेवाला फलाट भेटतो. असल्या फलाटावर माणसे गाडी यायच्या तास-तास आधीसुद्धा येऊन, मांड्या घालून, गठुळ्यांच्या उशा करून, पान-तंबाखू जमवीत गप्पा मारीत बसतात. हातांतले पुस्तक

बाजूला किंवा नुसतेच डोळ्यांपुढे धरून मी त्या गप्पा ऐकल्या आहेत. असल्या कोंडाळ्यात मज्जेच्या काहन्या सांगून हाशीवनारा बम्या किंवा वाळुश्या असतोच असतो. मग कोंडाळ्याच्या जरा पलीकडे बसलेल्या बाया त्याच्या चावटपनाच्या कथांना पदर दातांवर घेऊन हसतात, आणि बम्या अधिकच खुलतो. तेवढ्यात फलाटावरून एखादी मेल उद्धटपणाने धडधडत जाते. धूळ उडते. तिला "च्या बायलीन म्येलीच्या" वगैरे श्या हानल्या जातात. कुणीतरी "आपली कवा येयाची?" म्हणून पोर्टरला विचारतो. मग पोर्टरसाहेब "आजून नायन डाउन जायाची हाय. मागून तुमची—" वगैरे बोलून भाव खातो. तेवढ्यात फलाटावर कायम वस्तीला असलेले एखादे कुत्रे हुंगीत जाते. नळाजवळच्या मोरीपुढे कावळे जमतात. पोर्टर कंदिलाच्या काचा पुसायला लागतो. मास्तराच्या खोलीत घंटा किणकिणतात. काही वेळाने मास्तर कोट चढवतात.

"चला उठा. मास्तरसाह्यबांनी डिरेस घातला. गाडी यायला झाली आसल."

तो चिमुकला फलाट आता गजबजतो. दूरच्या वळणावर धूर दिसतो. पोरांना आईबाप दरडावण्या देऊन आटोक्यात आणतात. गठुळी डोईवर, खांद्यावर जातात. गाडी फलाटाला लागते. धावपळ होते. गार्ड आणि मास्तर क्राशिन असले, तर गप्पा मारायला लागतात, तेवढ्यात मास्तर एखाद्या सुटकन निसटू पाहणाऱ्या पाशिंजराचे तिकीट विचारतात. इमानी उतारू स्वतः येऊन मास्तरांच्या हाती तिकीट देतात. मग मास्तरांनी "का—काय झालं? कुठली तारीख पडली?" वगैरे विचार-पूस केली की त्या बिचाऱ्याला तेवढेच उदंड वाटते! ह्या चिमुकल्या फलाटावर आल्यागेल्याची विचारपूस असते. मास्तरांच्या बदलीचा हुकूम आला, की माणसे "लय लवकर चालला मास्तर. तुम्ही होता तेव्हा बरं वाटायचं," वगैरे म्हणतात. मास्तरांनाही खुशी वाटते.

मोठ्या फलाटांची गोष्टच निराळी. तिथे कुणी कुणाचा नसतो. पण तरीदेखील त्याचीही एक स्वतंत्र शान आहे. एकूण आगगाडीवाले यांचे एक निराळेच जग आहे. ज्या म्हणून पोराला गार्डाची शिट्टी, त्याचा तो लालहिरवा बावटा, इंजिनाची कूक, इंजिनड्रायव्हरची ती झुकून इंजिनाबाहेर बघायची ऐट, दुरून येणाऱ्या किंवा दूर जाणाऱ्या गाडीचा धूर या गोष्टींची भुरळ पडली नाही, ते पोर वायाच जाणाऱ्यां-पैकी आहे म्हणून ओळखावे. तरुणपणी ज्यांनी फलाटाला लागलेल्या गाड्यांच्या खिडक्या न्याहळीत स्वतःचे चेहरे उजळले नाहीत, त्यांची आगगाडी तारुण्याच्या स्टेशनावर न थांबता फक्त संसार आणि पेन्शनीची वाट ह्याच बाजूला धावायची. आणि वार्धक्यात क्षितिजात घुसून नाहीशा होणाऱ्या रुळांकडे पाहताना जे अंतर्मुख झाले नाहीत, त्यांचे नुसते वय वाढले. त्यांनी पावसाळे नुसतेच पाहिले. त्यांत ते भिजले नाहीत. चालत्या गाडीच्या तालावर ज्याला एकही कविता स्फुरली नाही तो कवी कवी कसला? आगगाडीच्या त्या चाकांच्या, दरवाज्यांच्या, रुळांच्या, सांध्यांच्या, किंवा एखाद्या सैल कडी-कोयंड्याच्या ठेक्यांवर तालवाद्यांचा मेळ चाललेला असतो.

मनात योजावा त्या ठेक्याचा आधार मिळतो. धडाड-धडाड-खडाड-खडाड असे दादऱ्यात जावे, किंवा ‘कशासाठी पोटासाठी’च्या ‘धागिनतिनकधिन’च्या केरव्यात शिरावे, पंख्यातून गुंजणाऱ्या षड्ज-पंचमांचा आधार घेऊन खिडकीबाहेर तोंड काढून गात बसावे. मित्रांचे स्वागत करावे आगगाडीच्या फलाटावरच! हवा असलेला पाहुणा फलाटात शिरत्या गाडीच्या दारात उभा दिसला की घ्यायला आलेल्या माणसांचे चेहरे किती रुंदावतात. हे चेहरे काळेगोरे कसलेही असले, तरी अशा वेळी सुंदर दिसतात. बाकी माणसाला माणसाने “याऽऽ” म्हणणे यासारखे दुसरे काय अधिक मोहक आहे? स्वागत करावे तर रेल्वेच्या फलाटावर आणि निरोपही द्यावा तो तिथेच. मोठ्या आगबोटी किंवा विमान ह्यांत असा वाहन हलेपर्यंत हात दाबून निरोप देता येत नाही. पाणावलेल्या डोळ्यांपेक्षाही फडफडत्या हातरुमालांच्या हालचालींतल्या उतरत्या लयीतून अधिकाधिक जडावत जाणारे अंतःकरण ओळखता येते. लहान काय नि मोठा काय फलाट हा अजबखाना आहे. किती येतात, किती जातात. एकच आगगाडी, नेणारांना कशाकशासाठी म्हणून नेते. डब्यातली चाळीसपन्नास माणसे खेटून बसलेली. पण प्रत्येकाची यात्रा स्वतंत्र कारणासाठी. एखाद्या वारीची खास गर्दी सोडा, किंवा दसरा-दिवाळीचा फुगलेला ट्राफिक वजा करा, पण इतर वेळी जर डब्यातली चाळीस माणसे मोजली तर चाळिसांची चाळीस कारणे असतील प्रवासाला जायची! विविध हेतूंचे, विविध माणसांचे, विविध वास्तूंचे, वस्तूंचे, नाना गणवेषांचे, हिरव्या-तांबड्या सिग्नलांचे, पाण्याच्या सोंडांचे, गार्ड, इंजिनवाले, कोळसेवाले, तिकिटचेकर, तिकिट-कलेक्टर, ग्यांगमेन, पाइंट्समेन, क्याबिनींतून वाकून पाहणारे ते क्याबिनमन, हमाल आणि खोमचेवाले यांचे, अवेळी येणाऱ्या “भिलवडीऽऽऽ,” “ताकारीऽऽऽ” अशा पुकाऱ्यांचे, अंधारात भुरभुरत्या पावसात भिजणाऱ्या त्या खांबावरच्या स्टेशनाचे नाव ज्यात कुणालाही वाचता येत नाही त्या चौकोनी कंदिलाच्या मिणमिणत्या प्रकाशाचे, लिंबोणीच्या झाडांचे, बेवारशी कुत्र्यांचे, भिकाऱ्यांचे, वाहत्या नळाचे, इंजिनाच्या धुराचे, कसल्याही लोखंडी वासाचे—असे हे एक स्वतंत्र विश्व आहे. फलाटात शिरलेला माणूस बाहेर कुणीही असो, तिथे शिरल्यावर एकदम पाशिंजर होऊन जातो. विशेषतः, मधल्या स्टेशनात गाडी धरायचा प्रसंग अवघडच. असला पाशिंजर आणि अनोळखी खानावळीत शिरणारा इसम ह्यांच्या चेहऱ्यावरची कळा सारखीच असते.

ह्या जगातल्या सनदशीर रहिवाशांची परिभाषा आणि चालीरिती मात्र इतरेजनांच्या आकलनापलीकडल्या असतात. “थर्टी डाउनला सायडिंगला टाकून नायंटिन अप आधी काढली,” म्हणजे नक्की काय झाले, ते फक्त लोहमार्गी लोकच जाणू शकतात. गाड्या कशा चालतात हे एक वेळ एखाद्या पुस्तकातून वाचून समजू शकेल, पण आनंदात चाललेली गाडी उगीचच एखाद्या आडवळणी स्टेशनापासून दोन-चार मैल अलीकडे रुसल्यासारखी कां थांबते हे कळणे अशक्य आहे. बरे, आपली गाडी बाजूला टाकून नेहमी दुसऱ्या गाड्याच का धडधडत पुढे नेतात? लेट झालेल्या

गाडीतच आपण, आणि पुढे काढलेल्या गाडीत आपण कधीही नाही, हे कां? राइट टाइम पोहोचणाऱ्या गाड्या लोकांनाच कशा मिळतात? पारसिकच्या बोगद्यासाटी लावलेले दिवे पुण्याच्या फलाटाला गाडी लागली तरी कां काढत नाहीत? कुठल्याच बोगद्यात दिवे न लावायचे दिवस कुठले, हे इंजिनड्रायव्हर लोकांनी स्वतःच्या बायकांपासूनही लपवून ठेवलेले रहस्य आहे. फर्स्ट क्लासमधल्या डब्यातला एखादा तरी पंखा केवळ बटण ओढून फिरणारा नसून बोट घालून फिरवल्यावरच घुमणाऱ्यांतला कां असावा? शिवाय, त्याने खडखडतच कां फिरले पाहिजे? त्याची बटणे गुप्त जागी कां लावली पाहिजेत? सहज दिसतील अशा ठिकाणी ती लावली तर नक्की काय बिघडेल? 'फॅन' अशी अक्षरे लिहिलेल्या जागेचे काप जाऊन नुसती भोकेच कां उरतात? ही सगळी कोडी रेल्कर्मचाऱ्यांनाच उलगडता येतील. डब्यातल्या एखाद्या तरी दिव्याचे काचेरी टोपण जागेवरून सुटून लडलडत ठेवल्याखेरीज मुसाफिरांना प्रवासाची आठवण राहणार नाही, अशी या दुनियेतल्या लोकांची धारणा असावी. छातीवर ठोके मारून तपासणारा डॉक्टर आणि चाकावर लांब दांडीच्या हातोड्याचे ठोके घालणारा पोर्टर ह्यांच्यात विलक्षण साम्य आहे. माणसाप्रमाणे डबा 'शिक' झाल्याचे त्याला कसे कळते? डॉक्टर लोकही जिवंतपणीच रोग्याची छाती कां पिटतात ते तरी मला कुठे ठाऊक आहे? छे! ह्या जगात अज्ञान किती अपार आहे! एका माणसाने एकुलत्या एका आयुष्यात किती वेळा रोज नव्याने संपादन केलेल्या त्या अज्ञानात डोके घालायचे? साध्या गोष्टी. पण किती खोल अज्ञानाने वेढलेल्या आहेत! मौज वाटते. खडखडता पंखा, बल्ब किंवा टोपणाची रिंग अडकवलेला तो क्षीण दिवा, पाखाना नामक जागेतली सनातन पाणीटंचाई ह्या संबंधांतल्या तक्रारी मिटवणारे अधिकारी हे नेहमीच 'पुढल्या' स्टेशनावर कां असावेत? ह्यातला 'पुढल्या' हा शब्द 'आज रोख, उद्या उधार'मधल्या 'उद्या'सारखा कधीही न उजाडणारा आहे. ते 'पुढले' स्टेशन येतच नसते. कारण तिथे संबंधित अधिकारी गाटला, तरी 'पुढल्या' स्टेशनावर सर्व काही व्यवस्थित होईल, हेच तो सांगतो. रेल्वेअधिकारी, म्हणजे पोर्टरसाहेबांपासून थेट स्टेशनमास्तरपर्यंत कुणीही, कुठल्याही गोष्टीबद्दल उतारूंना निराश करीत नाही.

"पाणी संपलंय हो, मास्तर."

"पुढल्या स्टेशनात भरतील."

"गाडी दोन तास लेट झाली, नाही?"

"पुढल्या स्टेशनात मेकप करील!"

"मास्तर, खिडकी वर नाही जात—"

"पुढल्या स्टेशनवर सांगा, होऊन जाईल दुरुस्त!"

मग ते पुढले स्टेशन येते. 'हाल्ट' फारच थोडा असतो. त्यातून फलाटावरच्या त्या पाच-दहा गणवेषधाऱ्यांतून पाण्याची व्यवस्था करणारा, खिडक्या दुरुस्तवाला नेमका शोधून कसा काढायचा? फलाटावरच्या गणवेषधारी मंडळीतून आपल्याला

हवा असलेला साहेब हुडकून काढायला सराईत नजर लागते. कारण फलाटावर हिंडणारा प्रत्येक रेल्वेकर्मचारी पॅसेंजरांशी आस्यापाट्या खेळायला नेमल्याच्या थाटात हुलकावण्या देत असतो. आपण गयावया करून सांगावे—

"साहेब, टाकीला पाणी नाही."

"फैण्डौट द कंडक्टर, प्लीज."

शेवटला 'प्लीज' संतापून म्हटलेला असतो. एकूण मिनिट दीड मिनिट गाडी उभी राहणार, त्यात कंडक्टर कुठे शोधून काढायचा? त्यातून गाडी आणि फलाट यांचे नाते नुकतेच प्रेमात पडलेल्या जिवांसारखे. बिलगले तर किती बिलगतील ते सांगता येत नाही. नाहीतर क्षणात रुसून एकमेकाला सोडून जातील. नुसता पाण्याचा गड्डू भरून घ्यावा म्हटले, तर जमत नाही. आत्ता सुटेल म्हटलेली गाडी अर्धा अर्धा तास थांबते. आणि "चांगला फिफ्टीन मिंटाचा हाल्ट आहे," हे आश्वासन घेऊन उतरावे, तर गार्ड शिटी फुंकून बावटा हलवायला लागतो. शिवाय, हव्या असलेल्या वस्तू खिडकीपाशी न आणण्यात स्टेशनातल्या खोमचेवाल्यांचा हातखंडा. उन्हाळ्यांत तहानेने जीव चाललेला असताना पन्नास वेळा 'गर्मच्या'वाला खिडकीशी कावळ्यासारखा काव काव करीत असतो आणि सोडालेमनवाला नेमका गायब. गाडी हलल्यानंतर आपल्या खिडकीजवळ येऊन फक्त "सोडाल्येऽमन" एवढे ओरडून जातो.

योग्य खिडकीपाशी जायचे नाही, अशी जशी ह्या लोकांना शिकवण आहे, तशीच आपल्या ओरडण्याचा अर्थ इतरांना कळू नये, असाही त्यांचा शिरस्ता आहे. 'लेमन'-चा उच्चार "ल्येऽन्" एवढाच करायचा. गाडीतली बुटपॉलिशवाली पोरेदेखील फक्त "स्ऽऽस्ऽयेऽस् एवढेच म्हणतात. "ब्डीय" म्हणजे 'रबडी' हे कळायला मथुरेच्या प्लॅटफॉर्मशी परिचय हवा. "टयॅय् सांड्या" म्हणजे 'टाइम्स ऑफ इंडिया' आणि "च्यॅग्रॅ" म्हणजे 'चाय गरम' हे ज्याला कळले, त्याला रेल्वे खूपच घडलेली असली पाहिजे. असल्या सूक्ष्म कर्णधारांना हल्ली फलाटावर "मुंबई-पुणे डेक्कनक्वी नपाच नंबरच्या प्लॅटफॉर्मवर रून" हा पुकारदेखील कळत असेल. ह्या सूचना ओरडणाऱ्या लोकांची मातृभाषा हुडकून काढणे नाना फडणिसालादेखील जमले नसते. वेदांतल्या ऋचांची चाल लावून "सहस्रशीर्षा पुरुषस्सहस्राक्ष" म्हटल्यासारखे आघात देत हे लोक बोलतात ते लोकांना कळते हे त्यांना कशामुळे वाटते ते शोधून काढले पाहिजे. "चार नंबरच्या प्लॅटफॉर्मवरची गाडी ही अंधेरी लोकलसून ती मुंबई सेंट्रल महालक्ष्मीला अर्परेलोलिंफ न्स्टनरो येथे दबाब्र दबाव खटरखुंट...ललाटरा परारा..." असले काही ऐकू आले, की त्या स्टेशनात ती थांबणार की थांबणार नाही एवढेच फक्त कळत नाही. पूर्वीच्या पंक्तीत यजमानांना संकल्प सोडायला सांगताना भटजींचे पहिले एक-दोन शब्द कळायचे; पुढे यजमानांच्या तळव्यावरून पाणी सांडले की भाताची मूद मोडायला हरकत नाही हा त्या दृश्यावरून बोध घेता येत असे. त्याप्रमाणे त्या भोंग्यातून आवाज यायला लागला, की कुठली तरी गाडी यायला किंवा जायला

झाली आहे, एवढे एक स्थूलमानाने कळते. पाशिंजराची सोय केली हे एक रेल्वेखात्याला नैतिक समाधान.

पॅसेंजरांची " सोय " ह्याविषयी रेल्वेखात्याच्या स्वतंत्र कल्पना आहेत. फलाटावरील शौचकूपाची किल्ली जामदारखान्याची असल्यासारखी स्टेशनमास्तरांकडे मिळेल, हे कां ? नशीब की त्या किल्लीसाठी पाच रुपये अनामत भरून डी० टी० एस० कडे लेखी अर्ज करावा हे नसते. फलाट ही आधीच घाईगर्दीची जागा. त्यातून एखाद्याला निराळीच घाई लागली, की त्याने प्रथम स्टेशनमास्तरांना शोधायला धावायचे. शिवाय ते आडगावचे 'ठेसन' असावे. तिथल्या मास्तराला बावटा हलवण्यापासून तिकिटे देण्याघेण्यापर्यंत अनेक कामे. पूर्वी हे मास्तर पार्टटाइम भिक्षुकीही करीत म्हणतात. म्हणजे दोन गाड्या येण्या-जाण्याच्या मधल्या टायमात एखादी एकादष्णी टाकून यायचे. "सावकारांना आंघोळ करून घ्या म्हणावं. एवढी सेवनअप गेली की आलोच." असा निरोप सांगून तिकडे तिकीट द्यायला धावणाऱ्या ह्या माणसाकडे किल्ली शोधायला जाईपर्यंत गाडी येते. पण रेल्वेच्या दफ्तरी 'सोय' ह्या सदरात शौचकूप आहे आणि किल्लीही आहे. ती किल्ली सर करणे किती बिकट आहे ते फक्त अवघडलेल्या अवस्थेतला पाशिंजरच जाणे ! पिण्याचे थंड पाणी ही दुसरी सोय. त्या गोद्रेजच्या कपाटवजा विजेरी थंडकातून ज्या कोणाला खरोखरीचे थंड पाणी मिळाले, त्याने गंगोदक लाभले म्हणून गडू शीलबंद करून ठेवावा. उतारूंच्या सोयी ह्या खात्यात, बसणाराचा तळ शेकणारे आणि पाठीत उसण भरणारे शिमिटाचे, भर उन्हात तळपणारे एक बाक असते. ही बाके छपराखाली ठेवली तर माणसे तिथे तळ देऊन बसतील, अशी शंका रेल्वेच्या बड्या साहेबांना येत असावी. उत्तमांगावर सूर्य आणि अधमांगाखाली हे बाक घेऊन बसायची हिंमत करणाराचे अंगावरचे कातडेदेखील कमावलेले असावे लागते. प्रवासात वाचायलाही काही लागते हे ऐकल्यामुळे फलाटावर बुक ष्टाल ठेवतात. पण ताजा म्हणून गेल्या आठवड्याचा साप्ताहिकाचा किंवा दोन दिवसांपूर्वीच्या शिळ्या दैनिकाचा अंक विकायची चलाखी साधलेल्यांनाच हे पुस्तकविक्रेत्याचे काम देण्यात येत असावे. योगसाधन, भविष्य आणि जासूसी कहाण्या एवढ्यातच प्रवासी वाचनाची भूक भागते हा शोध ह्या खात्यातल्या ज्या कुण्या महाभागाने लावला तो हयात नसल्यास त्याच्या नावाचा एक ष्टाल काढला पाहिजे. रेल्वे ष्टालसाठीच म्हणून लिहिणाऱ्या लेखकांचा एक खास वर्ग असावा. मद्रास फाट्यावरच्या एका स्टेशनात मी महर्षी अरविंदांची पुस्तके पाहिल्यावर पांडीचरीला बसल्या बसल्या त्यांनी जासूसी कथाही लिहिल्या होत्या, हे कळले. मिस्टरी स्टोरीजच्या कपाटात स्टॅन्ले गार्डनर, आगाथा खिस्ती ह्यांच्या (पुस्तकांच्या) पाठीला पाठ लावून अरविंदबाबूही बसले होते. मिस्टिसिझम आणि मिस्टरी ह्यांची गफलत झाली होती. इकडच्या रुळावरची गाडी तिकडे गेली, एवढेच! आडगावातले पानवाले जसे 'फाय फाय फाय'चे रिकामे टिन कपाटात मांडून दुकानाचे ष्टयांडर वाढवतात, किंवा काही सलूनवाले उंची तेले, स्नो वगैरेंच्या रिकाम्या बाटल्या मांडून 'शो' करतात, त्याचप्रमाणे हे रेल्वे बुकष्टालवाले

राधाकृष्णन, जवाहरलाल नेहरू, आल्डस हक्सले किंवा शेक्सपियरची नाटके वगैरे कपाटातल्या काचेमागे मांडतात. एकदा मी थोड्याशा आगाऊपणाने नेहरूंचे आत्म-चरित्र कपाटातून मागितले.

"सॉरी! खाली शो के लिये है सब."

"शो के लिये?"

"हां! खाली कव्हर है. अंदर पुराना टाइमटेबल लगाया है! ये देखो, साब—" म्हणून त्याने एक रमणमहर्षींचा फोटो असलेल्या कव्हराचे पुस्तक दिले. आत 'अमरीकी युवती की प्रेमलीला' की असेच काहीसे होते. मी माझा शुद्ध हेतू सिद्ध करायला त्याच्याकडून चक्क कागदी बांधणीतली इंग्रजी भगवद्गीता घेतली.

फलाटावरची वेटिंग रूम हा तर एक स्वतंत्र विषय आहे. धुंडिराज बोलूनच गेलाय, "घटकेच्या वस्तीसाठी आलेल्या मनुष्यप्राण्यानं ह्या जगात काय घाण करून ठेवली आहे, याचं ते एक आटोपशीर उदाहरण आहे. शिवाय, जो-तो आपल्या ह्यात." ह्यातली घाण करायची जबाबदारी पाशिंजरांच्यावर सोपवून 'आपापल्या ह्यात' राहायचा वाटा मात्र रेल्वेखात्यातल्या लोकांनी उचलला आहे. वेटिंग रूम ही 'फस' आणि 'शेकीन'वाल्यांची मिरास! वरून साहेब वाटणारे हे लोकदेखील अंतर्यामी खास देशी असतात. इतरांना ताटकळत ठेवून, स्वतः आरामखुर्चीवर पडून, पायाखाली म्हणून एक खुर्ची घेतात. मधल्या गोल टेबलावर ब्यागा, होल्डाल ठेवतात. पुरीभाजीचे कागद टाकतात. एकुलत्या एक बाथरूमचा तास-तासभर ताबा घेतात. तक्रार करावी तर स्टेशनमास्तर सदैव घाईत, नाहीतर वैतागलेले! ही मंडळी 'आपापल्या ह्यात' असतात. हा दोष त्यांचा नाही. त्यांच्या अंगावरच्या गणवेषाचा. गणवेष ही गोष्टच तशी आहे. कमरेला बिल्ल्याचा पट्टा आला, किंवा पितळी किंवा चांदीच्या बटनांचा कोट चढला, की माणूस बदललाच! त्याची भाषा, त्याचा चेहरा, हातवारे—सारे काही बदलून जाते. अत्यंत श्रद्धाळू आणि लंबोदर मार्तंड अष्टपुत्रे इतके देशी नाव असलेल्या स्टेशनमास्तरला त्याचा तो सगळा ड्रेस घालून 'युगे अठ्ठावीसऽऽ' म्हणायला सांगा. येणार नाही. एरवी, साध्या धोतरात तोच गृहस्थ वेंकोबाच्या गिरीला लोळपाटणी घेत जाईल. स्थानमाहात्म्यासारखे वस्त्रमाहात्म्यही आहे. एरवी, घरात खांद्यावरच्या सोग्याने बनियनची भोके दडवणारा हवालदार, विणिफार्म चढवला की गोगलगायीचा विंचू होतो. साधा हुटगी, चिकोडी असल्या स्टेशनवरचा ये० यस० येम० कमरेखाली लुंगी असेस्तोवर तुम्हांला आपल्या हातांनी इडली खाऊ घालील. पण एकदा का त्याने तो निळा कोट आणि मास्तरची टोपी चढवली, की साध्या "गाडी किती वाजता येते, हो?" ह्या सवालास उत्तर देणार नाही. तिथून पुढे तो 'भयंकर बिझी'! कारण गाडी आली, की त्या सगळ्या गणवेषधाऱ्यांना शतपावली करण्याची हुक्की येते. गार्ड स्टेशनमास्तरपर्यंत येतो. मास्तर इंजिनापाशी जातात. कंडक्टर हातातला कसला तरी चार्ट पाहत सैरावैरा धावतात. पोर्टरदेखील आपल्या दोन फेऱ्या टाकून घेतो. फक्त तिकीटकलेक्टर फाटक धरून असतो. त्यात पुन्हा हमालामागून धावणारे पाशिंजर!

गाडीच्या आगमनाबरोबर फलाटावर अक्षरशः मांडवात उडाल्यासारखी धांदल उडते. त्यात फक्त गर्दीपासून संपूर्ण अलिप्त म्हणजे रेल्वे पोलीस! हा पोलीस दिवाळीतल्या मातीच्या किल्ल्याच्या दारात शोभेचे पोलीस उभे करतात तसा दिसतो. रेल्वे पोलिसाला मी आजवर उंदीरदेखील पकडताना पाहिले नाही. नाही म्हणायला ह्याचे काही भाऊबंद मुंबईच्या लोकल लायनीवर रूळ ओलांडताना सकाळच्या वेळी चार कारकुनाबिरकुनांना कधीतरी पकडताना आढळतात. एरवी फलाटावरचा पोलीस सदैव उद्या पेन्शनीत काढल्याचा हुकूम हाती आल्यासारखा निवृत्त मनाने ही सारी धावपळ पाहतो. खिसेकापू खिसे कापतात, बिनतिकीटवाले उजळ माथ्याने सटकतात, डब्यात मारामारी ऐन भरात आलेली असते, पण ह्या स्थितप्रज्ञावर काही परिणाम नसतो. "आपल्याला मदत हवी आहे का?" ह्या सवालाच्या पाटीखाली पोलीस मदतीसाठी उभे राहणार असल्याचे ऐकिवात होते. अजूनपर्यंत ह्यां पाटीखाली मी एकही सजीव माणूस उभा असलेला पाहिला नाही. एखाद्या अडल्यानडल्या उतारूला पोलीस मदत करतो आहे, म्हातारीच्या गठुळ्याला हात देऊन तिचा भार हलका करतो आहे, हे दृश्य माझ्या ह्या माय इ० भूमीत पाहायला मी उत्सुक आहे.

माणसांच्या किती तऱ्हा इथे जमतात. वास्तविक स्थूल मानाने सगळ्यांचा हेतू एकच असतो. प्रवासाला जाणे किंवा प्रवासाहून येणे; निरोप द्यायला येणे किंवा उतरून घ्यायला येणे. पण ह्या चारांपैकी कुठल्या तरी एका सदरात पडणारी प्रत्येक व्यक्ती आपापल्या चेहऱ्यावर काही सूक्ष्म छटा घेऊन येते. माणूस श्रीमंत असो वा गरीब असो, फसक्लास असो वा थर्ड. त्याचा तिकीट घेऊन पासिंजर झाला की चेहराच बदलतो. फलाटाशी सलगी असणारांना जाणारे कोण, घालवायला आलेले कोण, हे नेमके ओळखता येते. कारण जाणारांच्या चेहऱ्यावर निराळीच आगळी कळा असते. त्यांतले काही खिशातले तिकीट चाचपीत असतात, हमाल गायब झाल्यामुळे संत्रस्त असतात, घड्याळात पाहतात, गाडी येणाऱ्या दिशेला हळूच पाहून घेतात, तरुण मंडळी थोडेफार विनोद करतात, पोहोचवणाऱ्या घोळक्यात एखादी उमर वर्षे अठरा ते वीसवाली असलीच तर जाणारा तरुण हळूच तिच्याकडे पाहून घेतो.

भोवतालच्या मंडळीत केवळ आगगाडीतून 'क्ष' स्टेशनापासून 'ज्ञ' स्टेशनापर्यंत जाणार एवढ्याच गुणामुळे महत्त्व प्राप्त झालेला हा हीरो स्वतःचा चेहरा नक्की कसा ठेवावा, ह्या फिकिरीत असतो. उसनी बेफिकिरी दाखवायला, नेहमी सिगरेट ओढीत नसला तरी "ट्रॅव्हलमध्ये सिगरेट पाह्यजे बुवा!" वगैरे सांगून धूरही सोडायचा प्रयत्न करतो. प्रवासाची चिंता दडवणे हा पांढरपेशा सुशिक्षितांचा अट्टाहास, तर अज्ञान मिरवीत जाणे हा जानपदाचा बोजा! गठुळी डोक्यावर न्यायला जानपदाला जसा संकोच वाटत नाही, तसा ठाऊक नसलेले विचारायलाही वाटत नाही. "दादा, नाशिक गाडी कंच्या फलाटाला, होऽ!" असे स्वच्छ विचारतात. स्टेशनमास्तराला विचारायच्या प्रश्नाचे इंग्रजी भाषांतर मनाशी जुळले नाही, म्हणून सोडून देत नाहीत. स्टेशनावर अनेक प्रकारची मंडळी पोहोचवायला येतात. पण मुंबईच्या दूधवाल्या

भय्याची सर नाही. एका जाणारास शंभर घालवणारे ह्या दराने गर्दी लोटते. ह्या गर्दीत मुलुखाला जाणारा कोण हे लक्षात राहावे, म्हणून त्याच्या गळयात झेंडूच्या फुलांची माळ घालतात. मग गाडी सुटेपर्यंत प्रत्येकाशी दृढालिंगने होतात. पुष्कळदा गाडी सुटली तरी चालू राहतात. सगळयात वैतागलेली मंडळी आपला वैताग दडवण्याची शिकस्त करताना पाह्यची असतील, तर ती वरिष्ठ साहेबांना निरोप द्यायला आलेली कनिष्ठ मंडळी! दुपारच्या उन्हाच्या रखरखाटात फलाटापर्यंत येण्याचा नस्ता ताप, त्याआधी दोनतीन दिवसांच्या इन्स्पेक्शनमध्ये त्याने केलेला छळ, त्या अवधीत त्याच्या तैनातीची यातायात, हस्ते-परहस्ते त्याच्या टाळक्यावर पोहोचवलेल्या जिनसा, ह्या साऱ्या कटकटी गाडी हलेपर्यंत शिंकेसारख्या आवरलेल्या असतात. एकदा साहेबाची 'बोगी' डोळयांपुढून हलली, की फलाटावर इतका वेळ "पण दोन दिवस राहिला असता, साहेब, तर रोकडोबाचा उत्सवही करून गेला असतात," वगैरे म्हणणारे भाऊसाहेब आणि मंडळी जे काही बोलतात, त्यातले अर्धे वाक्य त्या जाणाऱ्या साहेबाच्या कानी गेले तर तो जीव देईल! छे! पण नाही देणार. कारण ही बढती मिळण्यापूर्वी आपल्या वरिष्ठाविषयी तोदेखील हे असलेच बोलत असे. पण फलाटावरच्या साहेबाला घालवताना बोलायची वाक्ये ऐकण्यासारखी असतात. तेवढ्यात एखादा चतुर कलमबहाद्दूर साहेबाच्या कानी जाईल अशा बेताने त्याच्या पट्टेवाल्याला सांगत असतो, "ती गुळाची ढेप बाकाखालीच ठेवलीय. उतरताना ध्यानात ठेव." साहेबाने हे ऐकून न ऐकल्यासारखे केलेले असते. तेही एका डोळयाने हा छऱ्या कारकून पाहून घेतो. आणि फारच तयार कारकून असला तर गुळाची ढेप न देतासुद्धा गाडी सुटता सुटता "तेवढया गुळाच्या ढेपेकडे लक्ष ठेवा बरं का," म्हणून टाकतो. पुढे तो पट्टेवाला जाणे न् साहेब जाणे! ढेप विसरून आल्याबद्दल निष्कारण तो पट्टेवाला दम खातो. बरे, हा सगळा मामला लेखीत जाब विचारता न येण्यासारखा! पण 'साहेब' ह्या विषयावर त्यानंतर जो परिसंवाद होतो, त्याला तोड नसते. "तसा स्ट्रेटफार्वर्ड आहे..." इथपासून सुरवात होऊन "त्याच्या वाइफविषयी...म्हणजे...असं ऐकलं होतं..." इथपर्यंत तो संवाद येऊन पोहोचतो. ग्रामीण मंडळी घालवायला येतात ती न लाजता रडतात. आणि गाडी हलली, की डोळे पुसून चालायला लागतात. ललित वाङ्मय वाचणारी एखादी तरुणी...त्या निर्मनुष्य प्लॅटफॉर्मवर दूरवर जाणाऱ्या आगगाडीकडे निश्चल नजरेने पाहत खिळून उभी असलेली तिची पाठमोरी आकृती उदासरम्य दिसत होती...हे वाचलेले आठवून तसे दिसण्याचा प्रयत्न करीत असते.

माणसांच्या वागण्याच्या ह्या तऱ्हा प्रत्येकी स्वतंत्र असल्या, तरी गटाचे म्हणून काही स्वभावधर्म कळत-नकळत तयार होतात. साहेबाच्या जमान्यात पहिला, दुसरा, इंटर आणि थर्ड असे चातुर्वर्ण्य होते. जमाना बदलला, आणि इंटर जाऊन त्रैवर्णिक आले. पहिल्या वर्गातदेखील एअरकंडिशनची खाशांची पंगत आली. एक नुसती जन्ताही आली. दक्खनच्या राणीने आपल्या परिवारात तिसऱ्या वर्गाचाही स्वीकार

केला. थर्ड क्लासात दुसऱ्या प्रवाशांचे बाडबिस्तरे पसरायची सोय झाली. हा झाला तपशिलाचा भाग. पण तत्त्व बदलले नाही. तिसरा वर्ग म्हणजे आम जनता. आत शिरू पाहणाऱ्या नवख्याला मोकळ्या मनाने बाहेर ढकलणे हा त्याचा स्थायिभाव. आणि आत शिरणाराने आपल्या तोंडची वाफ भरपूर प्रमाणात सोडून आत घुसणे हा त्याचा धर्म. इथे भांडणे स्वच्छ आणि मोकळी होतात.

"दुसरा डबा नाही मिळाला शिरायला?"

"दुसऱ्या डब्यात जागा मिळाली असती, तर कशाला आलो असतो इथं? सरका... बापाचा माल आहे साल्यांचा!"

"बाप काढायचं काम नाही."

"तुमचा नाही काढला."

असल्या ध्रुवपदांनी धुमश्चक्री सुरू होते, आणि गाडी हलली की भांडण थांबते. क्षणापूर्वी "जावा की फस्किलासात!" म्हणून तणतणणारे उतारू चंची सोडायला लागतात. हवापाण्यापासून ब्लॅक मार्किटापर्यंत चर्चा सुरू होतात. जोडणारे धागे सापडतात. पहिल्या वर्गातली माणसे 'रिझर्व्ड' असल्यामुळे भांडतही नाहीत, आणि बोलतही नाहीत. फारच लांबचा प्रवास असला, तर मग बुटाचे बंद सैल करताना ओठांची कुलुपे काढतात. त्यात "पूर्वीच्या फर्स्ट क्लासची शान उरली नाही," म्हणणारा एक तरी असतोच. मग हे सूत्र आंतरराष्ट्रीय राजकारणापर्यंत जाऊन पोहोचते. फर्स्टक्लासच्या चार प्रवाशांत किमानपक्षी दोन सरकारी भत्त्यात किंवा रेल्वेच्या फुकट पासातले निघतात. त्यांचा चपराशी होल्डाल सोडायला येतो, आणि पाण्याची पिशवी किंवा खुजा भरून आणतो. हे साहेब सूट अंगावर असेपर्यंत तोऱ्यात बोलतात. पण रात्री एकदा धोतरात आले, किंवा त्यांनी लुंगी गुंडाळली की भलतेच मोकळे होतात. कारकुनी कुरकुरीची रेशमी बांधणीतली आणि जरा गुळगुळीत कागदावरची ही आवृत्ती असते. "केल्या कामाचं आजच्या जगात चीज नाही," हे गाणे मी कितीतरी चालींवर आणि अनेक रागांत ऐकले आहे. आपली पोस्ट वशिल्याने दुसऱ्याला कशी मिळाली, ही कहाणी ऐकायला माझ्याइतका भाविक श्रोता ह्या लोकांना मिळत नसावा. झोपण्यापूर्वी 'इसपगुल' बरे की 'पॅरॅफिन', ह्यावरही एक माफक वैद्यकीय चर्चा होते, आणि दिवे काढले जातात. नव्यानेच फर्स्टक्लासमधून जाणारे तर पटकन ओळखता येतात. त्यांचा टूथब्रश आणि पेस्ट नवी असते. ते बुकस्टॉलमधून वीकली घेतात. तो नेहमी आठवड्यापूर्वीचा असूनही त्यांना नवाच वाटतो. वहिवाटीचे फर्स्टवाले शर्ट फेकून बनियनवर येतात. ब्रश मारून धूळ झाडणाऱ्याला टिप देत नाहीत, आणि दुसऱ्याचा पेपर खुशाल त्याला न विचारता घेऊन वाचतात.

थर्डचा डबा गर्दीने भरलेला असला, तरी स्वभावाने मोकळा असतो. डुलकी देताना लाळ गळली म्हणून कुणी इथे लाजत नाही. चहावाल्याला "ए चायवालाऽऽ" अशी खणखणीत साद घालतात. आणि शेजारच्या खांद्याला बिनदिक्कत उशी समजतात. खाण्याचे डबे उघडून अनोळखी सहप्रवाशालासुद्धा "घ्या" म्हणतात. पण मनुष्य-

प्राण्याच्या डरपोकपणाचे नमुने पाहायचे असतील, तर ते सेकंडमध्ये. इथली बरीच माणसे फर्स्टची रिझर्वेशन्स मिळाली नाहीत, म्हणून सेकंडमधून जावे लागले, हे उगीचच सांगतात. इंग्लिश रहस्यकथा विकत घेतात, आणि कर्तव्य म्हणून ती वाचल्याचा बहाणा करतात. आगगाडीतले जेवण महाग म्हणून घरून पुरीभाजी आणतात. आणि बाजारचे काहीतरी खाण्यापेक्षा घरूनच जेवण आणणे कसे चांगले, हे न विचारता सांगतात. बुशकोटाच्या आतल्या बनियनला भोक आहे याची जाणीव त्यांना त्रास देत असते. ह्या डब्यात शिरणाऱ्या बऱ्याचशा तरुणांना प्रवासात एखाद्या सुंदर तरुणीची ओळख होणार आहे, असे वाटत असते. पंखा चालत नसला, तर कंप्लेंट करण्याच्या गोष्टी करतात. पण स्टेशनमास्तरकडे इंग्लिश कसे बोलायचे, ह्या फिकिरीत असतात. मग आपापसांतच "रेल्वे हॅज बिकम म्हणजे सगळा केअरलेस कारभार, यू सी. टू केअर्स—आफ्टर ऑल..." अशी जागच्या जागी कुरकूर करतात. त्यांतला एखादा पूर्वी कधीतरी एकदा आपण साखळी ओढून गाडी कशी थांबवली याची कथा सांगतो. मग त्याची बायको त्याच्याकडे अती कौतुकाने पाहते. तांब्या घेऊन नळावर पाणी आणायला जायला तो लाजत असतो. एकूण विलक्षण अवघडलेल्या अवस्थेत प्रवास करणारा हा वर्ग आहे. रेल्वेचा स्टाफ जर अजिबात पर्वा करत नसेल, तर ह्या सेकंडवाल्यांची. थर्डमधल्या मारामारीच्या शक्यतेला टरकून तो आवश्यक सुधारणा करण्याची ॲक्टिंग तरी करतो. कारण तिथे एखादा "टकुरं फोडा त्या तिकटीच्याचं!" म्हणणारा भिडू निघायची शक्यता असते. फर्स्टशी तो नम्र असतो. पण सेकंडवाल्यांच्यात दम नाही हे त्याने जाणलेले असते. तोंडाळ दारिद्र्य आणि घुमी श्रीमंती ह्यांच्या मध्ये जोडलेला सेकंड क्लास हा आगगाडीतला सर्वांत केविलवाणा डबा.

चालत्या आणि थांबत्या गाड्यांतल्या तऱ्हेतऱ्हेच्या चमत्कारांकडे कमालीच्या अलिप्ततेने पाहणाऱ्या रेल्वेवाल्यांचा मला विलक्षण हेवा वाटतो. फलाटावर असंख्य गोष्टी घडत असतात. निरोप दिले-घेतले जातात. सासरी निघालेल्या पोरीला पोटाशी धरून आई ओक्साबोक्शी रडत असते. चालत्या गाडीत चढताना कुणी धडपडतो. कुणाला स्ट्रेचरवरून नेत असतात. कुणाचे पाकीट मारलेले असते. ह्या कशा-कशात म्हणून हे रेल्वेचे निष्काम कर्मचारी गुंतत नाहीत. ही एवढी अलिप्तता त्यांना कशी साधते, देव जाणे. गाडी लागलेला फलाट म्हणजे केवढा गोंधळ! ह्या गोंधळात भर टाकणारा रेल्वेखात्यातला नसला तरी तिथला महत्त्वाचा रहिवाशी म्हणजे हमाल. हां हां म्हणता गायब होऊन, पाण्याखाली बराच वेळ राहून, "बुडाला वाटतं!" म्हणेपर्यंत डोके वर काढणाऱ्या पटाईत पोहोणारासारखे हे हमाल एकदम उगवतात. "कुठे लेकाचे हरवतात, कोण जाणे! नंबर तरी पाहिला होता का?" हा प्रश्न संपेपर्यंत "तुमची रिझवड शीट बगून घ्या, साहेब" हे ऐकू येते. फलाटात गाडी कायम मुक्कामच करणार आहे, अशा थाटात त्यांचे काम थंडपणाने चालते. हमाल आणि टांगेवाला ह्या ब्रह्मदेवाने विशेष मेहनत घेऊन बनविलेल्या वस्तू आहेत. हे हमाल फावल्या वेळात फलाटावर एकमेकांशी कुस्तीचे डाव कां टाकतात, ते मला

कळलेले नाही. नाहीतर कोंडाळे करून गप्पा मारीत बसतात. वर्षानुवर्षे एकाच ठेसनावर हमाली करणाऱ्या हमालांच्या गोष्टी संपत नाहीत. शिवाय, प्रत्येक हमाल समोरचा पाशिंजर सोडून दुसऱ्यांचे डाग उचलायला कां धावतो, याला उत्तर नाही. आणि कितीही हमाली दिली, तरी "काय साहेब, गरिबाच्या पोटाला..." हा मंत्र म्हटल्याशिवाय राहत नाही. "रामराम साहेब. भरपूर पैसे दिलेत. अशीच मेहेरबानी ठेवा." म्हणणारा हमाल ज्या कोणाला भेटला असेल, त्याचे गतजन्मीचे पुण्यच थोर असले पाहिजे.

फलाटावर पाट्या वाचणे हा एक श्रेष्ठ आनंदाचा भाग आहे. त्यातून हल्ली शासकीय हिंदी आल्यापासून ह्या आनंदाला भरती आली आहे. पूर्वी रेल्वेतिकिटावर देवनागरीत जी स्टेशनांची नावे छापीत, तीच काय ती अगम्य असत. 'गराणटरऊड' म्हणजे 'ग्रांट रोड' हे फक्त लोकलवाल्यांनाच कळे. पण आता 'सामिष' आणि 'निरामिष' म्हणजे काही आगम-निगमासारखे आध्यात्मिक असावेसे वाटले, ते स्वच्छ 'मांसाहारी' आणि 'शाकाहारी' हॉटेल निघाले. विलायती शौचकूपाचे 'चैत्य शौचकूप' हे नामकरण वाचून मी तर "शरणं गच्छामि" म्हटले. ट्राफिकला 'यातायात' म्हणून रेल्वेखात्याने स्वतःच स्वतःची मोकळीक करून घेतली. पूर्वीचा 'मरद' आणि 'ओरत' जाऊन 'पुरुष' आणि 'देवी' आल्या. नशीब 'पुरुष' आणि 'प्रकृती' असे नाही लिहिले. एका बाजूला हे शुद्धीकरण तर दुसरीकडे टिकटबाबू, स्टेशनबाबू, पार्सलबाबू असला प्रकार! त्यांतल्या पार्सलबाबूच्या एका पाटीवर कुण्या चतुर माणसाने 'पार्सल-खाबू' असे लिहून ते सत्याच्या अधिक जवळ आणले होते. पूर्वी मला आगगाडीच्या डब्यातल्यासुद्धा पाट्या पाठ होत्या. 'मुसाफरी' हा शब्द मी त्यांवरून शिकलो. आगगाडीत शिरल्याबरोबर आपण एकदम 'मुसाफिर' होतो याचा मला अभिमान वाटायचा. पण ह्या सगळ्या पाट्यांमध्ये "चहा पिणेपासून फायदे"ची सर कशालाच येणार नाही. 'चहा सोडा'च्या स्वातंत्र्ययुद्धातील जमान्यात हे 'चहा पिणे'पासूनचे फायदे मोठे आकर्षक वाटत. आठ-दहा फायदे होते. बायबलचे 'वैबल' करणाराकडून हे मराठी भाषांतर त्या चहावाल्या कंपनीने करून घेतले असावे. कारण एका फायद्यात "तो उन्हाळ्यात थंडकारक व थंडीत उष्णकारक" असतो असे होते. उत्साहाच्या भरात क्षय सोडून चहाने इतर रोग बरे होत असल्याचेही लिहिलेले असे. आता स्टेशनात सरकारी जाहिरातीच इतक्या वाढल्या आहेत, की गाफिलपणाने वाचताना दोन-पाच उपदेशांचे, राष्ट्रीय कर्तव्याचे वगैरे डोस मिळून जातात. एरवी, शाईचा पसरलेला जोरदार ठिपका, बॉव्हरिल, व्हिरॉल आणि इलस्ट्रेटेड वीकली एवढ्याच ठळक जाहिराती एनॅमेलच्या पत्र्यावर असायच्या!

चहादेखील चोरून पिण्याच्या काळात इतरही काही पिण्यासाठी गावातील प्रगतिशील मंडळी रेल्वे रेस्टारंटातच यायची. ब्रँडन, स्पेन्सर वगैरे मंडळींनी पिणेकऱ्यांची सोय केली होती. आमलेटचा पहिला तुकडा अनेकांनी ह्या फलाटातच मोडला आहे.

जुन्या काळचा एखादा खानसामा रंगात आला, तर त्या काळातल्या आठवणी काढून उसासे टाकतो. दोन-चार पेग पोटात गेल्यानंतर माणूस साहजिकच उदार हस्ताने बक्षिशी द्यायचा. ते खानदानी खानसामे आता थाळी उचलताना जिथे फुले वेचली तिथे गोवऱ्या वेचायचे दिवस आल्यासारखा चेहरा करतात. पूर्वी लालबुंद साहेब अर्धा जानी वाकर उदरी जाताच आणखी लालबुंद होऊन "ए बुव्वर, ज्यल्दी लाव!" म्हणायचा. मग दात विचकून हे खानसामे लगबगीने धावत. आता "अहो, गाडी सुटेल, लवकर आणा," म्हटल्यावर "श्रमिक वर्गाची पिळवणूऽऽक" असे ओरडत संपावर जातात. साहेब गेल्याची प्रामाणिक हळहळ वाटणाऱ्या ह्या दोनच जमाती— एक ह्या खानसाम्यांची आणि दुसरी खानबहादुर-रावबहादुरांची.

रेल्वेच्या दुनियेत एके काळी गोरे आणि निमगोरे यांचीच भरती फार असे. विशेषतः, निमगोरे. स्वातंत्र्यानंतर फड्या निवडुंग नाहीसा झाला, तसे हे अर्धांग्ल लोक नाहीतसे झाले. रेल्वे जंक्शनांच्या आसपास ह्यांच्या कॉलन्या असायच्या. तिथे बॉल डान्स आणि व्हिस्ट ड्राइव्ह चाले. नाताळ आल्याचे तिथे प्रथम दिसायचे. गार्ड, मोठाल्या स्टेशनांचे स्टेशनमास्तर, इंजिन-ड्रायव्हर ही त्यांची राखीव वतने. फलाटा-वरच्या इंडियन गर्दीकडे तुच्छतेने किंवा अलिप्ततेने पाहण्याची सवय ही तिथून लागली आहे. गार्डसाहेब, ड्रायव्हरसाहेब, स्टेशनमास्तरसाहेब यांची कृपा म्हणून आपल्याला गाडीत बसू देतात, अशी भावना असायची. रेल्वेतल्या त्या साम्राज्यातले हे महान सामंत होते. हेमंतात पाने गळावी तसे हे रेल्वेतले अर्धांग्ल लोक गळून पडले आता चारी दिशांच्या रेल्वे मिळून अर्धामुर्धा कुठे तरी आढळतो.

फलाटांसारख्या आगगाड्यांच्याही नाना तऱ्हा! पण विजेची आगगाडी ही मात्र खरी नव्हे. खरी आगगाडी म्हणजे धुराची इंजनवाली. निघण्यापूर्वी जोरजोरात धुसफुसणारी. रात्रीच्या वेळी धुरातून ठिणग्या उडवीत जाणारी. आडगावच्या बाया-बापड्यांना बाल्डीबाल्डी गरम पाणी देणाऱ्या इंजिनाची गाडी. पिण्याच्या सोंडेतून भरपूर पाणी पिणारी. तिची आपुलकी विजेच्या इंजिनाला कुठली? ते म्हणजे जगड्व्याळ काम. नकटी लोकल तर नुसती सकाळी माणसांना कामावर नेणारी, दुपारी त्यांचे डबे धाडणारी आणि संध्याकाळी त्या थकल्या-भागल्या जिवांना घरी आणून सोडणारी. नऊ-बावीस...आठ-बत्तीस...सात-बेचाळीस! एखाद्याच्या आयु-ष्याचे तीन-तेरा करावे, तसे नऊ-बावीस...आठ-बत्तीस करणाऱ्या ह्या लोकल गाड्या! इथे माणसांच्या हातांत घड्याळे नसून घड्याळांच्या हातांना माणसे बांधलेली असतात. लोकलच्या फलाटाला कसला स्वभावच नाही. हे लोक म्हणजे माणसे भरभरून नेणाऱ्या मालगाड्या आहेत. कशासाठी पोटासाठी—फक्त पोटासाठी ही ने-आण असते. खरी आगगाडी म्हणजे इंजनवाली— थू!

फलाटाचे व्यक्तिमत्त्व हे नुसत्या गर्दीने सिद्ध होत नाही. त्याला दोनचार लिंबोणीची झाडे लागतात. थेटरात जसे एक मांजर असावे लागते, तसे फलाटावर कुत्रे असावे लागते. एखादा भिकारी हवा. रस्त्यापलीकडल्या हाटेलातून भरमसाट

स्पीडने चाललेल्या फोनूच्या गाण्याची पार्श्वभूमी हवी. एकुलता एक टांगा हवा. आणि मधूनच स्टेशनमास्तरच्या तोंडून "नाइण्टीन अप, फिफ्टीन डाउन" वगैरे ऐकायला मिळावे! हलकासा पाऊस पडलेला असावा. गाडीचा टायम झालेला असावा. वळणावरचा सिंगल डाउन झालेला असावा. आणि दूरवरून धुराची पताका दिसू लागावी. कानी रुळाच्या तुकड्याची घंटा ठणठणावी.

पुष्कळ वेळा विचार येतो, त्या जेम्स वॅट साहेबाच्या चहाच्या किटलीवरचे झाकणच उडाले नसते तर? एक माणूस कपभर चहासाठी पाणी काय उकळतो, वाफेने झाकण काय उडते, आणि त्या उडत्या झाकणाखालून हे निराळेच विश्व काय उभे राहते! चहा पिण्यापासून होणाऱ्या फायद्यांत हा पहिला फायदा घालायला तो रेल्वेचा जाहिरातदार विसरला! वॅटसाहेब चहाबाज नसता, तर क्व च भवान् क्व पयः क्व च चातकः?— कुठली गाडी, कुठला स्टेशनमास्तर, कुठला फलाट, कुठली अप आणि कुठली डाउन?

# काही नवीन ग्रहयोग

## पण बरेचसे अनिष्ट

पाश्चात्त्य संशोधकांनी अलीकडेच फर्ट्रिज न्याय, गंपरसन न्याय, पार्किन्सन न्याय असे नवीन न्याय शोधून काढले आहेत. पार्किन्सनचा कारकून-वाढीचा न्याय आहे. गंपरसन म्हणतो की, दाढदुखीने जीव जात असताना दंतवैद्याच्या खुर्चीवर बसले, की दाढदुखी बंद होते, आणि त्याला काय सांगावे याची पंचाईत पडते. मला त्याहूनही पंचाईत पडते, ती दंतवैद्याच्या खुर्चीवर मागे मान टाकून बसल्यावर चुकून आपण "सरळच घ्या, उलटी नका करू," हा दुसऱ्या तत्सम खुर्चीवरचा हुकूम देऊ ही! त्यातून हल्ली दोघेही सारखाच पोशाख करतात, आणि दोन्ही दुकानांत डेटॉलचा वास तसाच येत असतो. पाश्चात्यांनी ज्याला न्याय म्हटले, त्याला आम्ही ग्रहयोग म्हणतो. कारण आम्हांला भौतिकतेची अगर बुद्धिवादाची घमेंड नाही.

जगात जे जे घडते ते ते विधिघटनेनुसारच घडते, याची आम्हांला खात्री आहे. पाश्चात्यांनी आता कुठे चंद्रलोकाची दिशा धरली आहे. पूर्वी भारतीयांचे तिथे सर्रास येणे-जाणे होते. शिवाय, आम्ही चंद्राच्या घरी गेलो काय, किंवा आमच्या कुंडलीत त्याला घर करून दिले काय, अर्थ किंवा अनर्थ सारखाच. पण ज्योतिष्यावर विश्वास न ठेवण्याची हल्ली फॅशन आहे. आणि इतर सर्व फॅशनींप्रमाणे हीही चोरून करण्यात येते. आम्हांला तशी गरज नाही. माझी तर ज्योतिष आणि ज्योतिषी ह्यावर नितान्त श्रद्धा आहे. एक वेळ मी देवापुढे हात जोडणार नाही, पण ज्योतिष्याला हात दाखविल्याखेरीज राहणार नाही. शनी, रवी, राहू, केतू, मंगळ, वगैरे बलाढ्य ग्रहगण जगातल्या महान विभूतींप्रमाणे माझ्याही कुंडलीत घर करून आहेत, याचा मला अभिमान वाटतो. क्वचित्प्रसंगी ते आपले घर सोडून दुसऱ्याच्या घरात शिरतात, स्वतःचे घर दुसऱ्याला 'लीव्ह अँड लायसन्स'वर देतात, पुन्हा स्वगृही येतात. कधीकधी साहित्यातल्या टीकाकारांप्रमाणे वक्री जातात. आपल्याचप्रमाणे त्यांचीही दशा असते. राजकीय पक्षांतल्या प्रतिस्पर्धी पुढाऱ्यांप्रमाणे एकमेकांवर बरी-वाईट दृष्टी ठेवून

असतात. एकमेकांची तोंडे न पाहणारे शनी आणि गुरू क्वचित्प्रसंगी संयुक्त आघाडी उघडतात. एखादा लोकप्रिय पुढारी पाचदहा मतांनी पडावा तसे अंशांत मार खातात. ह्या त्यांच्या लीला पाहण्यात मी गुंग होऊन जातो. वराहमिहिरापासून ते खेतवाडीतल्या ज्योतिर्भूषण विपक्षिशास्त्री घोट्टाळगेकरांपर्यंत साऱ्यांनी ह्या शास्त्राचा सखोल अभ्यास केला, कुंडल्या मांडल्या, आणि भविष्ये वर्तवली. पण माझे समाधान एवढ्याने होण्यासारखे नव्हते. पहिल्यापासून माझा कशातही नवीन भर घालण्याकडे ओढा अधिक. माझ्या कुंडलीतच तो योग आहे. जुन्या काळी नवपंचमयोग, गुरुपुष्य-योग, अमृतसिद्धियोग असे योग असत. मी काही नवीन योग शोधून काढले आहेत. आता त्या योगांवर ग्रहांची नेमणूक करणे हे काम पुढल्या पिढीचे आहे. प्रस्तुत लेखात अशाच काही योगांवर प्रकाश टाकला आहे. ज्योतिषशास्त्रावर श्रद्धा नसलेल्यांनी ह्याकडे पाहू नये. ज्योतिष्याची पूर्वग्रहदूषित लोकांवर सत्ता चालत नाही. एखादा शनीचा किंवा मंगळाचा सणसणीत तडाखा मिळाला, की हे लोक बासनातल्या कुंडल्या शोधायला लागतात. तान् प्रति नैष यत्नः!

पूर्वी राजयोग, संततियोग वगैरे असत. नव्या जमान्यात मंत्रियोग, संततिनियमन-योग, झेड० पी० अध्यक्ष-योग, मंत्रिश्यालकयोग, उपमंत्रियोग, विश्वविद्यालयीन-परीक्षकयोग, सरकारी बक्षीसयोग असे नवनवे योग आले आहेत. अष्टग्रहांनी त्यांचाही विचार केलाच आहे. नव्या ज्योतिष्याला केवळ परदेशगमनयोग आहे एवढे सांगून भागणार नाही. मंगळाचे भ्रमण पाहून तो परदेश म्हणजे रशिया की अमेरिका हे सांगता आले पाहिजे.

ज्योतिष्यांचे दोन प्रकार आहेत. एक कुंडल्यांवरून माणसे ओळखतात. दुसरे माणसांवरून कुंडली मांडतात. आमचा अभ्यास दुसऱ्या प्रकारचा आहे. आम्ही नुसत्या अंगाच्या ठेवणीवरून रास ओळखतो. प्रस्तुत लेखात हे नवे ग्रहयोग दिले आहेत. ज्यांनी त्यांनी आपापली कुंडली उघडून पाहावी. असे अनेक योग आहेत. तूर्त बुधजनांच्या विचारासाठी काही विशिष्ट योगांचीच चर्चा केली आहे. आणि त्यांची ठळक फलिते सांगितली आहेत. योग आणि त्यांची फलिते सांगितल्यावर कुंडलीत ग्रह बसविणे अवघड नाही.

### जलशृंखलायोग

ह्या योगावर जन्मलेल्या माणसाला सदैव काही एका चमत्कारिक परिस्थितीशीच झुंजावे लागते. उदाहरणार्थ, साखळीला पाणी नसणे. ओढल्यावर आवाजाखेरीज काहीच बाहेर येत नाही. अशा वेळी तक्रारी करकरून मालक दाद देत नाही. आणि अनपेक्षितपणे एके दिवशी आपण दिवे काढून झोपणार इतक्यात तो 'माणूस' येतो. घरमालकाचा हा माणूस 'माणूस' ह्याच सामान्यनामाने ओळखला जातो. मालकापाशी आपण काही तक्रार केली, की "आमचा माणूस पाहील," असे मालक सांगून आपल्याला वाटेला लावतात. 'माणूस' सहासहा महिने फिरकत नाही. मालक तक्रारी

ऐकण्याच्या मनःस्थितीत केव्हाच नसतो. मग एके दिवशी आपोआप तो 'माणूस' येतो. 'माणूस'-मंडळींचा चेहरा हा सदैव रात्रीची जास्त झाल्यासारखा असलाच पाहिजे, असा नियम आहे. कारण ती तशी जास्त झालेलीच असते. 'माणूस'-लोक स्वच्छता आणि संभावितपणा ह्यांपासून कटाक्षाने अलिप्त राहतात. मग त्याचा आणि जलशृंखलायोगावरच्या भाडेकरूचा संवाद होतो:

"काय कंप्लेन हाय?"

"अहो, कंप्लेंट कसली? सावळी ओढली, तरी पाणी येत नाही. आज सहा महिने झाले. भाडं मात्र ठिच्चून—"

"ते शेटना सांगा. मला खालिपिली खिटखीट ऐकायची सवय नाय. बगू सावळी—"

असे म्हणून तो पापग्रह त्या 'गृहात' जातो. साखळी ओढतो आणि सहा महिने ठणठणाट करीत पडलेल्या टाकीतून धाऽसकन पाणी येते.

"साली टेणन् लोकान्ला सवयच झाली हाय साली!"

हे त्याचे वाक्य मनावर घ्यायचे नसते. एकदाचे पाणी यायला लागले ह्या आनंदात आपण झोपतो. दुसऱ्या दिवशी सकाळी साखळी ओढल्यावर पुन्हा खडखडाट. हा जलशृंखलायोग. ज्यांच्या कुंडलीत हा योग आहे, त्यांना सदैव असल्या कलाटणीला तयार राहिलेच पाहिजे. वाचमेकरपुढे इमानाने सरकणारा आपल्या घड्याळाचा काटा त्याला पाच रुपये टिकवून ते घरी आणले की हृदयविकाराने बंद पडतो. "काय घड्याळ दुरुस्त करता की चेष्टा?" म्हणून त्याच्यापुढे ते घड्याळ पुन्हा ठेवावे. ते दोन्ही हातांनी चालत असते. जलशृंखलायोग! दुसरे काय? ह्या योगावर जन्मलेल्यांना अशा तऱ्हेच्या प्रसंगांना वारंवार तोंड द्यावे लागते. शिंप्याकडून शिवून आणलेला शर्ट गळ्याला आवळ होतो म्हणून परत नेला, की शिंपी वरचे बटण चटकन लावून गळा आणि शर्ट यांच्या मधल्या फटीत अंगुस्तानासकट बोट घालून दाखवतो.

### बुट्टी-अधिकारी-योग

प्रकृती ठीक नसल्याचे कारण देऊन बुट्टी मारावी. कचेरीत बेडरिडन अशी चिठ्ठी पाठवावी. घराहून नित्याप्रमाणे कचेरीला जातो असे सांगून निघावे, आणि तास दोन तास फोर्टमधल्या अपोलो बंदर वगैरे 'सेफ एरिया'त काढून दुपारच्या शोला सिनेमाला जाऊन बसावे. नेमका आपल्यासमोर साहेब बसलेला असतो. त्याला चुकवून नुसती डॉक्युमेंटरी पाहून बाहेर सटकावे, तर काळोखात कुणाच्या तरी पायावर पाय पडतो, आणि "मेल्यांचे डोळे फुटले!" असा अतिपरिचित स्त्रीस्वर येतो. तो आपल्याला नकळत मंडळातल्या मैत्रिणींना घेऊन आलेल्या स्वपत्नीचा असतो. काळोखात तिला दिसले नसले, तरी साहेबाने पाहिलेले असते. पण तोही बोलत नाही. कारण इन्स्पेक्शनला म्हणून बाहेर पडून तोही हळूच सेक्रेटरी पोरीला घेऊन आलेला असतो. पण बुट्टी-अधिकारी-योगामुळे मधल्या मधे आपला सिनेमा बुडतो. पण दारी नोकरी

आणि घरी जीव वाचतो. घरी गेल्यावर पत्नी "मंडळात व्याख्यान छान झालं," म्हणून सांगते. दुसऱ्या दिवशी साहेब हपिसात ट्रेमधला चहा 'शेअर' करू या म्हणून पुढे करतो, आणि सेक्रेटरी पोरगी आपल्या डब्यातील सँडविच देते. हा योग माणसाला दरीपर्यंत नेतो, पण खाली ढकलीत नाही. ह्या योगावर जन्मलेला हवालदार हातभट्टी-वाल्याकडे सब-इनिसपेटरसायबाला चुकून नियमित हप्त्यावरचे चायपानी मागायला गेला, तर त्याला तिथे हटकून तो 'साहेब' पहिल्या धारेची घेताना दिसलाच पाहिजे. साहेबाला वाटते, हवालदाराने पाहिले; हवालदाराला वाटते, त्याने. मग भट्टीवाला दादा दोघांनाही पाजतो, आणि चौकीत आणून सोडतो. तिथे त्या दिवशी नेमका अँटीकरप्शनवाला आलेला असतो. पण तोही बोलत नाही. कारण आपल्या तोंडाचा वास मारतो की काय याची त्याला भीती वाटत असते. मग दादाच्या अध्यक्षतेखाली चौकीत "साली सगळी पब्लिक हल्ली हरामी कशी होत चाललीय," ह्यावर चर्चा होते.

बुद्धी-अधिकारीयोगामुळे संकट असे हुतुतू करीत येते, आणि भिडूला न शिवता परत जाते.

**अंतःक्रमांकयोग**

मोठ्या शहरात राहण्याचा योग असणाऱ्या बहुतेकांच्या कुंडलीत हा योग असतोच असतो. ह्या योगाचे प्रमुख फलित एवंगुणविशिष्ट आहे : क्यूमध्ये अर्धा तास उभे राहिल्यावर बस येते. आपण सरकत सरकत वर जातो. आणि एक पाय फळीवर पडला की कंडक्टर घंटी वाजवून "नीचे उतरो. जगा नऽय" म्हणतो. त्यानंतरच्या पाचसहा बसेस न थांबता जातात. म्हणून आपण क्यू सोडून टॅक्सी शोधायला जातो, आणि तेवढ्यात चांगली अर्ध्याहून अधिक रिकामी बस येऊन आपल्या डोळ्यांदेखत उरलेला क्यू घेऊन जाते—आणि टॅक्सीवाल्यांचा संप असतो!

सिनेमाच्या तिकिटांची खिडकी नेमकी आपल्या तोंडावर बसते ती ह्याच योगामुळे. किंवा नाटकाच्या प्लॅनवर इतरांना मिळालेल्या जागांच्या फुल्या बिब्ब्याच्या फुल्या उठल्यासारख्या वाटतात त्याचेही कारण हेच. बत्तीस ते बेचाळीस कुठल्याही साइझची बनियन दुकानातच नव्हे तर साऱ्या होजेरीवाल्यांच्या पेठेत खल्लास असते. आपल्याला आवडलेल्या डिज्जायणची चप्पल असते, पण आपले पाय त्या नंबरचे नसतात. सेलमध्ये आपल्या मापाच्या पँटी संपलेल्या असतात. आपल्याला आवडलेले शर्टाचे कापड पाव वार कमी पडते. लग्नातले आइस्क्रीम आपण मांडवात गेल्यावर संपते. दुसरीकडचे संपेल म्हणून साऱ्या लेंढारासकट टॅक्सी करून त्या मांडवात जावे, तर 'आणीबाणी' म्हणून तिथे आइस्क्रीम नसते. तांबड्या कागदात लिमलेटची मोठी गोळी पेढा म्हणून देतात आणि शुद्ध नळाचे पाणी गुलाबपाणी म्हणून शिंपडून मनगटावर कोरडी चांदीची चपटी दांडी वासतात. आणीबाणी असली, तरी आहेर मात्र घेतात. लेंढाराला स्वखर्चाने आइस्क्रीम द्यावे लागते. त्या वेळी नेमके हापिसातले

दुसरे एखादे रामभाऊ आपली वंशावळ घेऊन हजर होतात, आणि "ते बघ, काका तुम्हांला आइस्क्रीम देतील," म्हणतात. लग्न महागात लागते. अंतःक्रमांकयोगाचे परिणाम घोर होतात. लोकलचा प्रवास नशिबी असला तर हमखास गाडी चुकते. घड्याळ मागे असते ते पुढे केले की लोकल उशिरा येते आणि हापिसची वेळ चुकते, आणि त्याच दिवशी साहेब सेक्शनमधून फेरी मारून जातो.

आपल्याला खरोखरीच फ्ल्यू झालेला असतो. तापदेखील चांगला एकशे-तिनापर्यंत गेलेला असतो. आठवड्याची रजा काढावी लागते. शनिवारी रात्री ताप उतरतो. आणि रविवारी संध्याकाळी कधी नाही ते घरात सहकुटुंब रमीचा डाव मांडून आपण बसतो. पाच तास हरल्यानंतर हँडरमी होते. आपण आनंदाने "बसला की नाही दणका, लेको!" म्हणून ओरडतो, त्याच वेळी दारात प्रकृतीच्या चौकशीसाठी हेडक्लार्क आणि अकौंटंट आलेले असतात! म्हणजे कधी नाही तो शेवटी डाव हाती लागावा आणि त्या क्षणीच तो उधळावा, तसाच हा अंतःक्रमांकयोग आहे. ह्या योगामुळेच कधी सणासुदीला घरच्या मंडळींना सिनेमाला न्यायचे ठरवून कपडेबिपडे झाले, आणि चपला चढवणार, इतक्यात गेली आठदहा वर्षे अंथरुणाला खिळलेली समोरच्या वाडीतल्या कोणाची तरी आज्जी संपल्याचे सांगायला अशा प्रसंगी पुढे सरसावणारी मंडळी येतात. निमूटपणे कोट उतरून ठेवावा लागतो. म्हातारीचे निधन अशा वेळी अगदीच अकाली वाटू लागते. दर वेळी कुणाची म्हातारीच मरावी लागते असे नाही. नको असलेले नातलग येतात. इतरांच्या आंघोळीच्या वेळी धो-धो वाहणारा नळ आपल्या डोक्याला लावलेला साबणाचा फेस डोळ्यात गेला की टपक्-टपक असे अखेरचे अश्रू टाकून बंद होतो. असले लोक सलूनमध्ये महिन्याच्या शेवटल्या आठवड्यात गेले तरी जागा नसते, आणि न्हावी "आता होईल, साहेब, बसा," म्हणतो, त्या वेळी आधीच एक स्क्रीन, एक मराठा, एक लोकसत्ता, एक फिलिमफेअर, एकदोन मधलीच पाने, एक धनुर्धारीचे भविष्याचे पान तिथे बसलेली दिसतात. त्यांचे उरकेपर्यंत आठ वाजतात, आणि युनियनच्या नियमाप्रमाणे कारागीर निघून जातात. युनियन, शाप ॲक्ट आणि गवरमीणवाले ह्या सगळ्यांना शिव्या देत मालक दिवे काढून खटर्ररर्र करून आपल्या पाठीवर दार ओढतो. दोष ह्यांपैकी कुणाचाच नसतो, अंतःक्रमांकयोगाचा असतो.

### कनिष्ठभगिनीयोग

वधूपित्याने आणलेल्या दोघींपैकी "जी पसंत असेल ती पदरात घ्या," अशी खुली आफर दिलेली असते. पण थोरली दिसायला चांगली असूनही, आपण तिला पसंत केले तरी ती कदाचित आपल्याला नकार देईल, ह्या वायफळ भीतीने तिच्याहून वर्णाने भलतीच गडद आणि अंगाने बऱ्याच आडव्या असलेल्या तिच्या धाकट्या बहिणीला पसंत केले जाते. आणि पुढे "खरं तर ताईची तुमच्याशी लग्न करायची किती किती इच्छा होती," हे ती कनिष्ठ भगिनी स्वतःच्या मंगळसूत्राशी चाळा करीत सांगते.

ह्याला ‘कनिष्ठभगिनीयोग’ म्हणतात. ही माणसे नोकरी मागायला जाताना शेठने “पगाराची अपेक्षा काय?” असे विचारल्यावर दोनशे स्टार्टची जाहिरात वाचूनही “दीडशे” म्हणतात.

“आणि डेरनेस अलौन्स? ते वायला पायजे काय?”

“छे छे!” म्हणत, कपाळावरचा घाम टिपतात.

शेठजी खूष होतात आणि “पेला दाडा छे,” म्हणून मसालानी चाय पाजतात. त्याला स्मरून कनिष्ठभगिनीयोगाची ही माणसे आयुष्यभर दीडशेवर राहतात. हे लोक स्वतःच्या घरातल्या दारावरची घंटी वाजवायलादेखील भितात. आपल्याच घरात खाणावळीतले पैसे द्यायचे राहलेल्या मेंबरासारखे चोरून जेवतात. कनिष्ठभगिनीयोगावर जन्मलेला माणूस एकदम ‘पंचर’च होऊन जन्माला येतो. असल्या माणसाबद्दल लोक त्याच्या जिवंतपणीच ‘हाडाचा गरीब’, ‘कुणाच्या अध्यात ना मध्यात’ वगैरे विशेषणे लावून तो कै० झाल्यासारखे बोलतात. असली माणसे मुलांच्या चड्डयांच्या नाड्या बांधतात. हळदीकुंकवाहून कलत्र “मेलं कुठं जाणं नको न् येणं नको!” करीत आले, की सोडून ठेवलेल्या पैठणीची घडी करतात. रविवारी कोळिष्टके झाडतात. ह्या योगावरच्या माणसाला खूप बोलावेसे वाटते, पण सगळे बोलणे माणसे निघून गेल्यावर सुचते. विनोदसुद्धा सुचतो. रात्री घरी सांगायचे ठरवतो, पण “ती भाजी कशाला टाकलीत पानात?” ह्या प्रश्नावर तो विनोद विसरून जातो. कनिष्ठभगिनीयोग हा शंभरात साठ टक्के कुंडल्यांत सापडतो. समाजाचा गाडा ह्याच गुळगुळीत बॉलबेअरिंग्जवर चालतो. ही माणसे न कुरकुरता दिवस ढकलीत असतात. साखळीला पाणी नसले तर आपण होऊन बादली ओततात. मालकाकडे तक्रार करीत नाहीत, बुट्टी-अधिकारीयोगाचा ह्यांना पडताळा येत नाही. कारण सुट्टीच्या दिवशी घरी काय करायचे हाच जिथे प्रश्न तिथे बुट्टी कसली? ह्यांच्या घरी चोर आले, तर त्यांना ट्रंक उचलायला हेच मदत करतील! वर “कपभर चहा तरी घेऊन जायचा. ही घरात नाही म्हणून—नाहीतर...या पुन्हा असेच...बेतानं—डोकं आपटेल...” अशी बोळवण करतील. ह्या लोकांचा नम्रपणा पराकोटीला गेलेला असतो. ह्या योगावर जन्मलेला एक गृहस्थ रेडिमेड कपड्यांच्या दुकानात नवा बुशशर्ट ट्राय करायला आरशासमोर उभा राहिला, आणि समोर कुणीतरी ऐटबाज माणूस उभा आहे असे समजून स्वतःच्याच प्रतिबिंबाला त्याने अदबीने नमस्कार केला. थोडक्यात म्हणजे ही माणसे कुत्र्यालादेखील ‘हाड’ न करता स्वतःच फुटपाथ बदलतात.

ह्यांच्या कुंडलीतले सगळे ग्रह स्वगृहीच असतात. कुणाचीही कुणावर पापदृष्टी नसते. कुणी वक्रीही नसतात, पण सरळही नसतात. त्यामुळे असल्या कुंडलीच्या माणसांची बहुधा मेषरास आणि मेषलग्न असते. ह्यांचा गुरू उच्चीचा असला, तरी घरी शिकवणीला आलेल्या मास्तरासारखा वागतो. असल्या लोकांच्या खिशात नोटा कोंबल्या, तरी नाक पुसायला हातरुमाल काढताना त्या पडतात. ह्या वर्गातल्या मंडळींना बहुधा आकाशवाणीयोग असलेल्या बायका मिळतात.

### आकाशवाणीयोग

हा बहुधा स्त्रियांच्या कुंडलीत सापडतो. असल्या बायका स्थूल मानाने बोलायचे म्हणजे 'स्थूल मानाने बोलायचे' हेच काम करीत असतात. ह्यांत स्थूल मान हे बोलण्याचे क्रियाविशेषण नसून कर्त्याचे विशेषण आहे. पहाटे सहा ते रात्री अकरा एवढ्या दरम्यान दुपारी घटकाभर डोळा लागतो तेव्हाच काय गप्प असतील तेवढ्या. सकाळी भक्तिगीते म्हणतात. मग कचेरीत जाण्यापूर्वी शेजारणीने आदल्या रात्री शेजाऱ्याच्या कशा कशा कानपिचक्या घेतल्या, त्या बातम्या सांगतात. दुपारी चाळीतल्या भगिनीमंडळाच्या कार्यक्रमात बोलतात. मग बुवांच्यापाशी शास्त्रोक्त गायन शिकतात. संध्याकाळच्या बातम्या आपापसांत होतात. मुले शाळेतून आली की त्यांच्या कार्यक्रमात बोलतात. रात्रीं रुसण्या-फुगण्याची श्रुतिका करतात. आकाशवाणीप्रमाणे ह्यांच्याही लहरी असतात. दुपारच्याच चहाड्या पुन्हा प्रक्षेपित करतात. उपस्थित पाहुण्यांपुढे मुलांचा खास कार्यक्रम करतात. इतकेच काय, रविवारी 'ह्यां'ना बाजारात पिटाळण्यापूर्वी बाजारभावदेखील सांगतात. मोलकरणी व रामा इत्यादिकांबरोबर ग्रामीण कार्यक्रम चालतो. दूधवाल्याबरोबर हिंदीचा पाठ होतो. एखाद्या भावोत्कट श्रुतिकेला भांड्यांच्या आदळआपटीचा साउंड इफेक्टदेखील असतो. आकाशवाणीयोगाची कुंडली पाहण्यासारखी असते. सगळे शुभग्रह कसे निपचीत पडलेले असतात. कुंडलीतले पापग्रह स्वगृही असतात. पुष्कळदा ते मेहुणे, साडू वगैरे रूपे धारण करून येतात. त्या वेळी घराला आकाशवाणी-सप्ताहाचे स्वरूप येते. इथे जामात हा दशमग्रह असूनदेखील संपूर्णपणे दुर्बल असतो. असल्या कुंडलीच्या स्त्रियांचे आणि कनिष्ठ-भगिनीयोगावरच्या पुरुषांचे छत्तीस गुण जमतात, म्हणून लग्ने होतात. त्यांत छत्तिसांपैकी पस्तीस गुण वधूपक्षाकडेच असतात आणि वरपक्षाचा 'गप्प राहणे' हा गुण त्याला तारून नेतो. असले विवाह अत्यंत यशस्वी होतात. कारण आकाश-वाणीयोगावरच्या कुटुंबाचा एक गुण खऱ्या आकाशवाणीसारखाच असतो. बोलण्याला ऐकणाऱ्याची गरज नसते. घरात कुणी नसले तर व्हॉल्युम वाढवला, की शेजाऱ्यांच्या कानी बोलणे जातेच.

### समस्त-स्त्रीवृंद-परपुरुष-विवाहित-वैषम्य-योग

ह्या योगाचे नाव थोडेसे मोठे आहे. परंतु नावाइतकाच हा बलाढ्य योग आहे. सोयीसाठी याला तूर्त वैषम्ययोग म्हणतो. ह्या कुंडलीतले सगळेच ग्रह नीचस्थानी असतात. जगातील प्रत्येक सुंदर स्त्री ही परपुरुषाशी विवाह करून गेली, असे ह्या योगावर जन्मलेल्या माणसांना वाटत असते. स्वतःविषयी अफाट गैरसमज हा यांच्या जीवनाचा पाया आहे. ह्यांच्या बोलण्यातले कुठलेही वाक्य "मी असतो तर—"पासून सुरू होते. किंबहुना, "मी असतो तर" हे मुळी ह्यांच्या जीवनसंगीताचे ध्रुवपदच आहे. असल्या माणसांना चांदणे टिपूर पडले आहे असे जरी कोणी म्हटले, तर चंद्राचेसुद्धा वैषम्य वाटेल. ह्या योगावर जन्मलेल्या एका इसमाच्या कुंडलीचा आम्ही

कसून अभ्यास केला. त्याच्या पराक्रमस्थानी कुठलाच ग्रह नव्हता. सदैव कुचमत राहणे हा ह्याचा स्थायिभाव. त्याच्याच कचेरीतल्या एका टायपिस्ट पोरीने ह्याच्या-बरोबरच्या कारकुनाशी लग्न केल्यावर त्या मांडवातदेखील "ह्याच्यात हिनं एवढं काय पाह्यलं, गॉड नोज!" म्हणून आल्याखेरीज त्याला राहवले नाही. वैषम्ययोगावरची माणसे नाटकांत नट म्हणून हापटी खाल्ली, की अभिनयाच्या शिक्षणाचे वर्ग चालवतात, आणि जगात 'अभिनय' नावाची गोष्ट कुणालाच कधी कळली नाही ते शिकवतात. कादंबरीकार म्हणून पडले की टीकाकार होतात, आणि तिथेही पडतात. प्रेमात 'पडले' की स्त्रीजातीला निमकहराम म्हणतात. कारकुनीत रखडले की "साली वशिलेबाजी!" म्हणत हिंडतात. ह्यांच्या चेहऱ्यावर डुकराची स्वप्रसन्नता आणि चिलटांची चरफड यांचा मनोहर संगम असतो. सगळ्या शेजाऱ्यांना चांगल्या बायका कां मिळतात, हे यांना कोडे असते. इतरांचे सूट आपल्यापेक्षा चांगले शिवलेले आहेत, असे वाटत असते. आपण आयुष्यात सदैव 'थर्ड क्लास' होतो हे मनात उमगलेले असते, आणि स्वतःला अकाली टक्कल पडल्याची खंत असते. ह्या साऱ्या उणिवांचा ते इतरांच्यावर सूड काढतात. स्वतःला सर्दी झाली तर डॉक्टरवर उखडतात. त्यांचा ह्याला नाइलाज आहे. कारण हा योगच असा आहे. लोकप्रिय गोष्टी ह्यांना रुचत नाहीत. आंबा न आवडणारे हे लोक आहेत. असल्या लोकांनी कधी विनोद केला तर कोटाच्या बाहीतून झुरळ गेल्यासारखे वाटते. कारण कचेरीतल्या एखाद्या लोकप्रिय विनोदी कारकुनाहून आपण अधिक विनोदी आहोत हे दाखविण्यासाठी तो केलेला असतो, आणि मनात आणले तर मीसुद्धा पन्नास जोक्स मारून दाखवीन असले काहीतरी बोलून! रमीत ह्यांना 'लक' नसते. त्यामुळे ते उखडून खेळतात आणि हरतात. वैषम्ययोग असलेली कुंडली त्या माणसाला स्वस्थ बसू देत नाही. सगळीकडे लुडबुडायची यांची धडपड चालू असते. पण तिथे सदैव यांच्याहून अधिक चांगला उमेदवार असतो. सारे जग आपल्या विरुद्ध कट करीत आहे, असा यांचा भ्रम असतो. यांचा प्रत्येक धंदा अंगाशी येतो. अप्रिय होण्याची यांची करामत अलौकिक असते. बसमध्ये प्रथम हे कंडक्टरशी भांडतात. नंतर शेजारच्या उतारूशी. आणि मग बस कंपनीला शिव्या सुरू करतात. गाण्याच्या बैठकीत ह्यांना गाणे न कळूनही सगळ्यांत पुढे बसायला हवे असते. पण तिथे आधीच इतर लोक बसलेले असतात. त्यामुळे ह्यांचे व्यवस्थापकांशी भांडण होते. क्वचित्-प्रसंगी पुढे बसलेच, तर बुवांनी आपल्याला ओळख दाखविली नाही म्हणून चिडतात, आणि बाई असली तर रात्रभर तिने आपल्या चेहऱ्याकडे पाहून गावे, अशी ह्यांची अपेक्षा असते. थोडक्यात समस्त-स्त्रीवृंद-परपुरुष-विवाहित-वैषम्य-योगावर जन्मलेल्या माणसाची अवस्था कोकणात 'कुंबरे' नावाचा चिलटासारखा प्रकार असतो, तशी असते. चिमटीत चिरडायला मिळत नाही आणि सुखाने ते बसूही देत नाही. असल्या योगाचा माणूस आपल्या शेजारी आला, तर शहाण्याने जागा सोडावी. ऑपेरा हाउसला जायचे असेल, तर हाजीअलीला बस बदलावी. लग्नाच्या मांडवात आढळला, तर अत्तरगुलाब घेऊन आइस्क्रीमवर पाणी सोडून निघून जावे. ह्या कुंडलीचे कुठेच

जमणार नाही. कारण एखाद्या आंधळ्या भिकाऱ्याच्या वाटीत जरी कुणी पाच पैसे टाकले तर ह्या त्या भिकाऱ्याचा दुस्वास करणार, तिथे हातीपायी धड एवढे किमान सुख असलेल्यांची काय कथा ?

### पादत्राणांगुष्ठयोग

वैषम्ययोगावरच्या कुंडलीच्या अगदी उलट ह्या कुंडल्या असतात. वैषम्ययोगातल्या कुंडलीतले ग्रह एकमेकांविरुद्ध चरफडत असतात, तर इथे ते एकमेकांना अकारण टांग मारून गंमत बघतात. ह्या योगाला 'पादत्राणांगुष्ठयोग' म्हणण्याचे कारण ह्या योगावर जन्मलेल्या मंडळींच्या चपलेचा अंगटा भलत्या वेळी तुटतो. विशेषतः कुठेही जायची घाई असली की चप्पल नवी असली तरी अंगटा तुटतो. सिल्कच्या नव्या कोऱ्या नेहरूशर्टावर चहा सांडतो आणि स्वतःला सुपारीचे व्यसन नसले तरी अंगावर पानाचे शिंतोडे उडतात. आयत्या वेळी पेनमधली शाई संपणे हे पादत्राणांगुष्ठयोगाचेच फलित आहे. दादरहून कोटात जाताना 'पीक अवर'ला नेमकी यांची बस पंक्चर होते. ती कटकट नको म्हणून पास काढला, की तो धोब्याच्या कपड्यांत जातो. ह्यांनी पैसे मोजून विकत घेतलेल्या पुस्तकांतली पानेच गायब असतात. बैठकीला गेले की गवयाचा आवाज चीप बसलेला असतो. आपण सिनेमाला गेल्या वेळी मोक्याच्या जागी फिल्म तुटली की ओळखावे, प्रेक्षकांत पादत्राणांगुष्ठ-योगाची मंडळी आहेत. यांना ह्या योगापासून सुटका नाही. हे बिर्याणी आणि कोर्म्याच्या मोहाने मुसलमान झाले, तरी दुसऱ्या दिवशी रोझे सुरू होतील. असल्या मंडळींनी बाजारहाट टाळावी, कारण ह्यांनी आणलेल्या वांग्यांची गोष्ट सोडाच, पण भोपळ्यातसुद्धा कीड निघेल. ह्यांच्या खिशातली माचिस पेटत नाही आणि विडीचा धागा सुटतो. देवळात अनेक छत्र्यांतून नेमकी ह्यांची छत्री आणि एक वहाण चोरीला जाते. आणि तुटक्या अंगठ्याची वहाण 'आ' वासून पडलेली असते. वहाणेऐवजी सँडल घातले तर बकल तुटते. ह्या योगावर जन्मलेल्या लोकांचे कपडे धोबी धुऊन न आणता, डाग पाडून किंवा जाळून आणतात. धोबी बदलले तरी ती परंपरा सुटत नाही. असल्या लोकांनी प्रवास टाळावा. बेडिंग हटकून हरवते. असल्या योगाच्या माणसांना हटकून चुकीच्या ठिकाणी आपले बरोबर मत व्यक्त करायची हुक्की येते. "ती काळीढूस बाई पाहिलीत का ?" हे ते नेमक्या तिच्या नवऱ्यालाच विचारतात. कुठल्याही पार्टीत कुणाचा तरी गाढवपणा सांगत असताना त्या गृहस्थाचा किंवा बाईचा आप्त समोर बसला आहे एवढेच विसरतात आणि अनवस्थाप्रसंग ओढवून घेतात. असल्या माणसांना लग्नात मध्यस्थ म्हणून अजिबात वापरू नये. हे मुलाच्या बापालाच भटजी समजतील आणि आईला "किती वेळा आइस्क्रीम खाल ?" असे विचारून जातील. ह्या लोकांचा हेतू वाईट नसतो, पण ते नेमकी जागा चुकतात. मालकाला भाडेवसुलीचा मुनीम समजून त्यालाच मालक कसा लुच्चा आहे हे ते ऐकवणार. ह्यांच्याइतका जीभ चावण्याचा प्रसंग इतरांना क्वचितच येत असेल. आयत्या

वेळी घोटाळा हे या योगाचे मुख्य फलित. मात्र पादत्राणांगुष्ठयोगाच्या लोकांचा पायगुण त्यांना स्वतःलाच बाधतो. त्यांचा इतरांना उपद्रव नाही. चार लोकांच्या सभेत जोरदार शिंक येऊन पोटावर तटतटलेली पायजम्याची नाडी तुटली की जे होते, ते ह्यांच्या बाबतीत आयुष्यभर चाललेले असते. योगच तसा. त्यातून सुटका नाही.

**द्वारघंटिकायोग**

वास्तविक पादत्राणांगुष्ठयोग आणि द्वारघंटिकायोग ह्यांत वरवर फरक नाही. आहे तो सूक्ष्म आहे. दारावरची आगमनसूचक घंटा वाजावी आणि पोष्टमन मनिऑर्डर घेऊन आलेला असावा या समजुतीने लगबगीने दार उघडावे. पोष्टमनच असतो; पण तो व्ही० पी० घेऊन येतो. ओठाशी आलेले पोटी लकटायला मिळू नये, असा हा एक विचित्र योग आहे. चर्चगेटवरून शिवाजीपार्कला जायला ओ-रूटचीच बस मिळते. पण आत पाय ठेवता ठेवता कंडक्टर सांगतो, "ऑपेरा हाऊस तक जायेगा." ह्या योगावरची माणसें इंटरव्ह्यूमध्ये सिलेक्ट होतात, पण मेडिकलला उडतात. द्वारघंटिकायोग असलेला आमचा एक मित्र जगू कुरवंडकर सरोज कोणकरच्या प्रेमात पडला. जगू जनरल पोष्टात आणि ती सेंट्रल टेलिग्राफमध्ये होती. गोरेगाव ते चर्चगेट ह्या रोजच्या प्रवासात ओळख झाली. पूर्वी जगू वांद्याला गाडी बदलून हार्बरने बोरीबंदरला उतरायचा. पुढे मैत्री वाढली आणि ह्याने पास बदलून घेतला. फ्लोरा फाउंटनपर्यंत जोडीने चालून पुढे बोरीबंदरपर्यंत एकदोन करीत जायचा. प्रेमात कष्ट सोसावे लागतात, असे वाचले होते बिचाऱ्याने! ह्याची ओळख झाल्यापासून तिने वाचनालयाची मेंबरशिप सोडली आणि ह्याच्या लायब्ररीतले पुस्तक तिच्या हाती दिसू लागले. क्वचित दोनपाच वेळा संध्याकाळच्या एकदोन बोरिवली लोकल सोडून ह्याने तिला हॉटेलातही नेले. द्वारघंटिकायोगाचा माणूस हा. फॅमिली रूम्स नेहमी भरलेल्या असायच्या. त्यामुळे जनरल वॉर्डात बसूनच चहापाणी होई. तिला मावानी केक आवडते हेही त्याला कळले. पण ती केक, चहा आणि पुस्तके याउप्पर काही अधिक देवघेव होऊ शकली नाही. दोघांनाही साहित्याची आवड असल्यामुळे बोलण्यात स्वतःच्या भविष्याऐवजी नवकथेचे भविष्य, आधुनिक काव्याचे स्वरूप असलेच निष्पाप विषय असत. पुढे पुढे ह्याला तिच्या डोळ्यांतले 'गीत भावनांचे' वाचता येऊ लागले, आणि एके दिवशी तो दिवस उजाडला. तिने जोगेश्वरी स्टेशनावर गर्दी ओसरल्यानंतर त्याला हळूच "तुमच्याशी एका महत्त्वाच्या विषयावर बोलायचे आहे," असे सांगितले. दुसऱ्या दिवशी रविवार होता, तरीही आणीबाणीच्या परिस्थितीमुळे हपिसात काम आहे, असे दोघांनीही आपापल्या आईबापांना सांगितले. गोरेगाव ते चर्चगेट दोघेही चूप होती. चर्चगेटसमोरच्या इराण्याच्या दुकानापर्यंत ती एकदा त्याच्याकडे पाहून हसली, आणि पुन्हा हातातले मासिक वाचायला लागली. या वेळी, सगळ्या मासिक काढणाऱ्यांना वांद्याच्या खाडीत बुडवावे, असा एक दुष्ट विचार त्याला खाटिकखान्यावरून येणाऱ्या घाणीसारखा चाटून गेला. इराण्याच्या दुकानात कधी

नाही ती फॅमिली रूम मिळाली. रविवार. त्यातून सकाळची दहा-साडेदहाची वेळ. त्यामुळे इराणी बऱ्या पुशीत होता.

"काय घेणार?" तिनेच त्याला विचारले.

"जे मला हवे आहे, ते देणार आहेस का?" अशी कसलीशी ओळ त्याला आठवली. पण त्याने स्वतःला आवरून म्हटले, "वा, वा! मीच विचारायचा हा प्रश्न."

अलीकडे तिला 'तू' म्हणावे की 'तुम्ही' हे त्याला कळत नसे. मराठीत 'तू' आणि 'तुम्ही' ह्यांच्यामधला एखादा शब्द हवा असे त्याला वाटे.

"नाही, नाही. आज मी मुद्दाम तसदी देऊन बोलावलंय तुम्हांला."

त्याला 'तसदी' हा शब्द जरासा अशुभसूचक वाटला. पण चुकून ती तसे बोलली असेल, असे समजून तो पुन्हा म्हणाला,

"वा! तसदी कसली?"

तेवढ्यात तो येऊ नये त्या वेळी येण्याचा गुणधर्म असलेला वेटर आला.

"क्या लाऊँ, साब?"

"मावानी केक लाव, और—कोल्ड कॉफी घेणार का?" जगूने पॅंटच्या खिशातली पाचाची नोट तिच्या न कळत चाचपून विचारले.

"चालेल."

"अच्छा. एक कोल्ड कॉफी और एक—आपण चहा घेणार बुवा." वास्तविक त्याला कोल्ड कॉफी आवडते! पण इथून कदाचित सिनेमाला जाण्याचा योग आला तर? ही भेट महिन्याच्या शेवटल्या रविवारी नसती झाली, तर बरे झाले असते. असो. पण शुभस्य शीघ्रं...ही सगळी वाक्ये बुडबुड्यांसारखी उमटून फुटली.

"तुम्हांला मला एक विचारायचं आहे."

"हं हं—"

"बाबांनी माझं लग्न ठरवलंय..."

त्याला 'दिल फटा तो क्या फटा?' मधल्या एका प्रसंगाची आठवण झाली. असाच फॅमिली रूममधला सीन होता. आणि इला गुहा उज्ज्वलकुमाराला असेच म्हणाली होती. त्या वेळी उज्ज्वलकुमार इला गुहाला "शादी मुबारक" म्हणाला होता. पण त्यानंतर इला गुहा त्याच्या कुशीत शिरून (बाटलीभर ग्लिसरीन संपेपर्यंत) रडली होती. जगूला तो डायलॉग म्हणायचे धैर्य झाले नाही. एक तर वेटर अजून यायचा होता. इथे आयुष्यात पहिल्यांदा फॅमिली रूम आतून पाहिलेली. त्याला काय म्हणावे, ते सुचेना. त्यामुळे त्याने पुढल्या ग्लासातले टुकडा-पानी रिचवले, आणि काहीतरी बोलायला हवेच म्हणून तो म्हणाला,

"हो का?"

"हो!"

टुकडापान्याने की कशाने कोण जाणे, पण जगूला जरा हुशारी आली होती.

"कोण आहे हा भाग्यवान?" आपण बऱ्यापैकी डायलॉग टाकला, असे त्याला वाटले.

"हे हो काय, अशी चेष्टा करता? मला तुम्हांला एक विचारायचं आहे—"

"जरूर!" जगूला उगीच आपण देव आनंदसारखे दिसतो, असे वाटायला लागले.

"रागावू नका हं! आजपर्यंत मला तुमच्याविषयी खूप आदर वाटत आला आहे."

"आदर?" जगू हे मोठ्याने नाही म्हणाला. पण शब्द 'तसदी'सारखा खटकला.

तेवढ्यात मावानी केक आणि कोल्ड कॉफी घेऊन वेटर आला.

"चाय लाता है, साब."

"सावकाश. घाई कायकू?" जगू बोलून गेला. "घ्या...तुम्ही सुरवात करा. कोल्ड कॉफी थंड होऊन जाईल...आपलं...गरम होऊन जाईल."

"काल मला ते पाहायला आले होते." सरोज कोणकर "बोरवली लोकल वाटतं?" हे वाक्य म्हणावे तशी म्हणाली.

जगूने उरलेले तुकडापानी संपविले.

"हो का?"

"हो! बर्माशेलमध्ये इंजिनियर आहेत."

बाप रे! म्हणजे साडेतीनशे स्टार्ट, हाउस अलावन्स, आणि फॉरेनचा चान्स! जगूला जनरल पोस्टात लागून सहा वर्षे झाली, तरी टाइम्समधल्या जाहिराती वाचायची त्याची सवय कायम होती.

"इंजिनियर? अरे वा!" इतका दुबळा "अरे वा" हा फक्त अशाच वेळी निघतो.

"काय अरे वा! मला हे लग्न मान्य नाही." सरोज मावानी केक कापीत म्हणाली.

भिजलेले कुत्रे अंग झटकून जिथल्या तिथे उठते; जगू खुर्चीतल्या खुर्चीत तसा उठला.

"का मान्य नाही?"

"त्यांचं म्हणणं मी सी० टी० ओ० मधली नोकरी सोडावी. दोन वर्षांनी मला सीनिअर असिस्टंट टेलिग्राफिस्टचा चान्स आहे. अशा वेळी मला तुमचा सल्ला हवा आहे. मी तुम्हांला नेहमी वडील भावासारखं..."

जगूला पुढले काही ऐकू आले नाही. सरोज बोलतच होती.

"—माझ्यापेक्षा माझा दादा चार वर्षांनी मोठा होता...तुमच्यात आणि त्याच्यात..."

मग जगूने सरोजला चर्चगेटवर सोडले आणि पुन्हा एकदा नोकरी सोडणेच कसे योग्य आहे ते सांगितले. सरोजच्या लग्नात जगू लोकांच्या मनगटांवर अत्तर लावीत होता. आता हे सगळे होण्यापूर्वी जगू मला भेटला असता तर त्याच्या कुंडलीतला

'द्वारघंटिकायोग' पाहून मी तेव्हाच त्याला सावध केला असता. काही नाही तरी निदान एक कोल्ड कॉफी, दोन मावानी केक आणि स्पेशल चहा एवढा खर्च आणि चर्चगेट ते बोरीबंदरचे घनचक्कर हेलपाटे तरी वाचले असते. पण माणसे भविष्याचे भूत झाल्यावर ज्योतिष्याकडे येतात.

ह्या योगांखेरीज एकासन-योग, विरुद्ध-वातायन-योग, थप्पभंगिका-योग असेही लहान-सहान योग आहेत. एकासन-योगात आगगाडीमधली किंवा बसमधली आपल्या शेजारची जागा रिकामी असताना देखणे पाशिंजर आपल्या शेजारी न बसता दुसऱ्या पाशिंजरच्या शेजारी बसतात, आणि आपल्या शेजारी दीड सीट रुंदीचा शेटिया येतो. विरुद्ध-वातायन-योगात ऊन किंवा पाऊस येणार नाही म्हणून ज्या खिडकीजवळ आपण दुसरी खिडकी सोडून बसतो, तिथेच ऊन येते. थप्पभंगिका-योगात आपल्या थापा सांगून संपेपर्यंत उघड होतात. विशेषतः, हा भेद घरातली लहान मुले अधिक करतात. आपण चहा घ्यायला सुरवात करणार इतक्यात पाव्हणे येतात आणि "साहेब बाथरूममध्ये गेले आहेत," असे सांगायला सांगून आपण आतल्या आत चहा पिऊन येणार असतो. अशा वेळी चिरंजीवांना "आमचे बाबा बाल्रूममदी नाय काय गेले. आत बशून चा पितायत!" हे सांगायची हुक्की येते. नेहमी पोरांना बाथरूममध्ये कोंडून मग थाप मारावी, हा एक आपला ह्या योगावर तोडगा आहे. पण शेवटी नशिबात असेल तेच होणार!

शहाणी माणसे नेहमी ज्योतिष्यांच्या सल्ल्याने वागतात. कुंडलीत चांगला ज्योतिषी मिळण्याचा योग मात्र हवा!

# रस्ते

रस्त्यात स्वतःशीच बोलण्याची सवय पुष्कळांना असते. पण लहानपणी मी रस्त्याशी बोलत असे. आमच्या घरापासून स्टेशनापर्यंत एक आपला उभाच्या उभा रस्ता पसरला होता. गावात वस्तीही त्या वेळी बेताचीच होती. त्यामुळे सकाळ-संध्याकाळच्या गाडीच्या ठराविक वेळा सोडून तो बहुधा रिकामाच पडलेला असायचा. आमच्या लहानशा घरापुढे उगम पावून तो स्टेशनाला मिळत असे. आमच्या घराजवळ त्या रस्त्याचे गोल डोके होते, आणि त्याच्या पलीकडे एक अनेक वर्षे पडलेला मातीचा ढिगारा होता. छोट्याशा टेकडीसारखा. उशीवर डोके टेकून पडलेल्या माणसासारखा हा रस्ता पडलेला होता. त्याच्या दुतर्फा उंच वृक्ष चवऱ्या ढाळीत नव्हते आणि हवेल्या दासीसारख्या उभ्याही नव्हत्या. स्टेशनापर्यंत पाचसहा बैठ्या घरांची सोबत सोडली तर दोन्ही बाजूला भाताची खाचरेच होती. त्या मानाने गावातले इतर रस्ते अधिक कर्तेसवरते होते. हा थोडासा निवृत्तच रस्ता होता. बराचसा थकलाभागलेला. मला त्याची दया यायची. शाळा सुटल्यावर बाकीची मुले आपापल्या रस्त्याला लागत आणि मी एकटाच या रस्त्याने परतत असे. त्या वेळी त्याचे-माझे बोलणे चालायचे. काय बोलत होतो ते आता आठवत नाही; पण बोलत होतो हे निश्चित. कदाचित वर्गातल्या दुष्ट पोरांची आणि त्यांहूनही दुष्ट मास्तरांची गाऱ्हाणी मी त्याला सांगत होतो असे मला वाटते. गाव वसवणाऱ्या माणसाने वास्तविक त्या रस्त्याला महत्त्व देऊन वसवले होते. पण पुढारीपणालाही भाग्य लागते. इतर रस्त्यांचे आणि घरांचे काय कट झाले, देव जाणे! त्या रस्त्यांनी आपल्या गटातून ह्याला उडवला आणि गावाच्या मध्यभागी यायचा हा रस्ता गावाच्या बाजूला पडला. माझ्या चिमुकल्या खोपटवजा घराची आणि तसल्याच चारदोन गरीब झोपड्यांची सोबत सोडली, तर त्याला जवळचे असे कोणी नव्हते. इतकेच नाही, तर त्याच्या मागून आलेल्या लहानसहान रस्त्यांनादेखील मोठमोठी नावे मिळाली, पण हा रस्ता अनामच राहिला. कुणी-कुणी त्याला 'स्टेशन

रोड' म्हणायचे. पण 'स्टेशन रोड' हे काय रस्त्याचे नाव झाले? तसे पाहायला गेले, तर आमच्या गावचे जवळजवळ सगळे रस्ते स्टेशन रोडच होते. "सर्वदेव-नमस्कारः केशवं प्रति गच्छति" ह्या न्यायाने लहानमोठ्या साऱ्याच रस्त्यांची ओढ स्टेशनकडेच होती. पण काळ्याकिरट्या पोरांनादेखील राजेंद्र, रवींद्र, शिरीष, गिरीश अशी नावे ठेवावीत, आणि एखादा गोरापान राजबिंडा नुसताच 'बाबू' ह्या सामान्यनामाने ओळखला जावा, तशी आमच्या रस्त्याची अवस्था होती. त्याला कोणी चांगलेसे नावदेखील दिले नाही. गावातले विजेच्या दिव्यांचे खांब पुरून उरल्या-वर शिल्लक राहिलेले दोनचार खांब ह्या रस्त्याच्या वाट्याला आले. खडी-डांबराचा खुराक तर त्याला कधीच मिळाला नाही. निदान मी गाव सोडीपर्यंत तरी नाही मिळाला. पण माझा हा रस्ता कधी दीनवाणा वाटला नाही. मोठा वैराग्यशील रस्ता! पावसा-पाण्यातदेखील त्याचे गांभीर्य नष्ट होत नसे. उन्हाळ्यात तो कधी तहानेलेला वाटला नाही आणि थंडीत आखडला नाही. हरेश्वराच्या गुहेत एक साधू बसत असे. आमचा रस्ता मला त्या साधूसारखा वाटायचा. गुहेतले बाकीचे साधू लघळपणा करायचे, चिडा-ओरडायचे; पण हा साधू भलताच शांत असे. आम्ही मुले बाकीच्या साधूंपुढे खूप माकडचेष्टा करीत असू, पण ह्या साधूला मनोभावाने दंडवत घालत होतो. आम्ही ते गाव सोडून जाताना मी माझ्या त्या रस्त्याला हळूच दंडवत घालून आलो होतो. इतक्या वर्षांनी ही गोष्ट जाहीर करतानादेखील मला उगीचच लाजल्यासारखे होत आहे. काहीही असो, माझा तो गंभीर, वैराग्यशील, अनामिक रस्ता माझ्या मनात पक्का जाऊन बसला आहे, हे खरे!

त्यानंतर आयुष्यात खूप वाटा तुडवल्या. अनेक रस्ते ओळखीचे झाले. पण कुणाशी उभे राहून बोलावेसे वाटले नाही. काही रस्ते चावट असतात. वळतात काय, पळतात काय! माझा हा रस्ता सरळ होता. पण केवळ सरळ होता म्हणून मला आवडत होता, असेही नाही. सगळीच सरळ माणसे आपल्याला कुठे आवडतात? आमचे गोळेमास्तरदेखील फार सरळ होते. वर्गातल्या मुलींनादेखील छड्या मारायचे, अंगठे धरायला लावायचे. प्रत्यक्ष हेडमास्तरांनाही त्यांनी परवानगी विचारून आत यायला लावले होते. उंच, सरळ नाकाचे, घाऱ्या डोळ्यांचे आणि नाकापासून सुरवात होऊनच पांढऱ्या स्वच्छ रुमालात जाऊन लपणारे, उभे गंध लावणारे गोळेमास्तर! अगदी सरळ उभेच्या उभे, लांब उभा डगला घालून, दहा ते पाच उभे राहून शिकवीत. हजेरीपटात न पाहता अभ्यंकर, आगाशे, बागवे, भागवत, चितळे, देशपांडे करीत हजेरी घेणारे गोळेमास्तर! त्यांना आम्ही 'घोडा' म्हणत होतो. घोडा बसला की मरतो म्हणतात. आम्हांला वाटे, गोळेमास्तर बसले तर मरतील. मधल्या सुटीत टीचर्स रूममध्येदेखील ते तासभर खिडकीबाहेर पाहत उभे असत. माझ्या रस्त्याचा सरळपणा तसला नव्हता. त्याच्या पोटी न दिसणारी माया होती. आणि म्हणून मला वाटे, की त्याच्याशी आपण चांगले वागलो, तर तो आपल्याला आशीर्वाद देईल. म्हणून त्या रस्त्याच्या कडेला बसून मी कधीही लघवी केली नाही. त्याच्या उलट, शाळेजवळच्या गल्लीत

पोहोचली रे पोहोचली, की पोरांचे घोळकेच्या घोळके चिंचवडकरांच्या बंगल्या-पुढल्या भिंतीपुढे उभे राहत. चिंचवडकरांनी शंभर वेळा हेडमास्तरांकडे तक्रार केली होती. पण त्या गल्लीचे वळणच असे होते की तिथे पोहोचल्याबरोबर पोरांची तोंडे दगडी कुंपणाजवळ वळत.

माणसासारखे, मला वाटते, रस्त्यांनाही स्वभाव असतात. नशिबेही असतात. काही रस्ते महा शिष्ट असतात. विशेषतः हल्ली नव्या कॉलन्या झाल्या आहेत त्यांच्या आसपासचे. काही सनातनी बुद्रूक असतात. आमच्या गावातला नेने-आळीतला रस्ता तसा आहे. त्याला इंग्रजी 'एस'सारखी दोन वळणे आहेत. नेने-रोडच म्हणतात त्याला. अण्णा नेने हे आमच्या गावातले सावकार आणि हिंदू महासभेचे अध्यक्ष. त्यांच्या घरी एकदा टिळक जेवायला आले होते, म्हणे! नेने-रोडच्या 'एस'च्या पहिल्या वळणावरच त्यांचा बंगला न् वाडी आहे. वाडीतल्या प्रचंड विहिरीत आम्ही लहानपणी पोहायला जायचे. त्यांच्या घरातल्या पोरांच्या कमरेत सोन्याचा करगोटा असायचा. थोरले नेने विहिरीच्या काठावर बसून आम्हांला 'सूर' मारायला, नाहीतर 'मुटका' मारून चारी बाजूला पाणी उडवायला शिकवायचे. त्यांच्या विहिरीत फक्त ब्राह्मणांच्या मुलांना पोहायची परवानगी होती. पुढेपुढे शेणव्या-परभांच्या मुलांनाही प्रवेश मिळाला. त्या वेळी अण्णा नेने पार थकले होते, आणि वामनराव नेने इंटर झाले होते. त्यांच्या घरातल्या लहान मुलांनादेखील आम्हांला 'अहो' म्हणावे लागे. ती मुले मात्र आम्हांला 'पुर्ष्या', 'हच्या' अशा हाका मारीत. केवळ त्यांच्या घरात टिळक येऊन गेलेले असल्यामुळे आम्ही हे अपमान गिळीत होतो. शिवाय, एवढी मोठी दुसरी विहीरही आमच्या गावात नव्हती. पण नेन्यांच्या कुटुंबातला हा सगळा शिष्टपणा त्या दोन ठिकाणी वाकलेल्या नेने-रोडने घेतला होता. दुसऱ्या वाकणावर औदुंबर होता. त्याला सदैव कोणी ना कोणी तरी प्रदक्षिणा घालीत असे. तिथून रात्री जायची सोय नव्हती. कारण नेने कुटुंबात कोणीतरी मुंजा वारला होता, तो तिथे फेऱ्या घालीत असे. अमावास्येच्या रात्री तो नेन्यांच्या विहिरीत 'मुटका' मारून चारीकडे पाणी उडवून जात असे, म्हणतात. अमावास्येच्या आसपास पोहायला जाताना आमच्या पोटात गोळा असे. नेने-रोड मला अगदी अण्णा नेन्यांसारखा वाटे. घाऱ्या डोळ्यांचा, तांबूस मिश्यांचा, दोंद सुटलेला, दातांची वरची पलटण एका बाजूने उद्ध्वस्त झालेला, टकल्या, चांदीचे दहाबारा केस शेंडी या नावाखाली उडवणारा आणि सगळ्यात म्हणजे बोबडा. आमचा रस्ता बोलताना कसा स्वच्छ बोले! पण खालच्या आवाजात, जरासा खर्जात. पण नेने-रोड निश्चित बोबडा होता. अण्णा नेने निखालस बोबडे होते. वास्तविक गावातले म्हातारे त्यांना 'बोबड्या' नेनेच म्हणत. ते 'ट ठ ड ढ ण' या बाराखडीऐवजी 'क ख ग घ ङ' वापरीत आणि 'र'चा 'ज्य'. "आमच्या घज्यी किलक आले होते," म्हणत. "बघतोश काय—घाबजतोश का? शूज्य् माज्य्, शूज्य् माज्य्—भितजा कुखला..." वगैरे त्यांची वाक्ये सुरू झाली, की पोहणारी कारटी हळूच पाण्यात बुडी मारून पोटातल्या पोटात हसून घेत.

होळीच्या रात्री अण्णा नेन्यांच्या दारात जाऊन चावट पोरे बोबड्या शब्दांत शिवीगाळ करीत, मग वरून अण्णाही उसळत आणि "हात् ज्यांगिच्यांनो!" म्हणून ओरडत. नाहीतर "कुत्रा सोगीन, कुत्रा सोगीन," म्हणून धमकी देत. खुशीत असले, तर आपणही होळीच्या टोळीत येत. मग खाणावळवाले नामजोशी आणि अण्णा नेने यांचे सवालजवाब होत. नेने-रोडला हे सगळे पाठ येत होते. मला लहानपणी हा रस्ता अजिबात आवडत नसे, पण आता त्या रोडची दया येते. श्रावण्यांचे गोमूत्र पिणारा तो रस्ता जुन्या भिक्षुकासारखा आता आठवतो. लहानपणी मला भिक्षुकांचा भारी राग येई. एकतर घरात काही ना काही तरी व्रतवैकल्यांचे पिल्लू सोडून आम्हांला कुठे ओल्या लंगोट्या नेसायला लाव, नैवेद्य देऊन देवळात पाठव, असल्या लफड्यात टाकायचे. पण आता ते आठवतात, आणि त्या वेळी उगीचच आपण त्यांच्यावर रागावत होतो असे वाटते. नेने-रोडचे काहीसे असेच आहे. अण्णा नेने गेले, आणि इंटर झालेल्या वामनरावांनी गावातल्या दुसऱ्या एका रस्त्याशी सलगी केली, आणि पार उद्ध्वस्त झाले.

त्या रस्त्याचे मात्र मला भारी भय वाटे. पण कुतूहलही असे. वास्तविक रस्ता म्हणायच्या लायकीचाही तो रस्ता नव्हता. एक वेडावाकडा बोळ होता. तिथल्या माड्या गजबजलेल्या होत्या. माझ्या वर्गातला गजू कारंजकर तिथे राहत असे. गजू माझ्या आणि माझ्या मागून-पुढून आलेल्या बऱ्याच मुलांच्या वर्गात होता. आमच्या वर्गात केसांना वासाचे तेल लावून भांग पाडणारा तो एकमेव मुलगा. एकदा त्याच्या खिशात विड्या सापडल्या होत्या. आणि मास्तरांनी त्याला पिटला होता. तो ह्या बोळात राहायचा. देवळाजवळच्या मुख्य रस्त्याला डावी घालून हा बोळ लपतछपत गेल्यासारखा गेला होता. नवरात्राच्या उत्सवात देवळातले कीर्तन आटोपून परत जाताना ह्या बोळातून कानावर गाणी येत. मग आमची आजी आमच्या बोटांना घट्ट धरून फरफटत ओढीत गेल्यासारखी त्या बोळातून आम्हांला बाहेर काढून पलीकडल्या रस्त्याला लागत असे. इंग्रजी चौथीपाचवी ओलांडण्यापूर्वीच वर्गातल्या धोतर नेसणाऱ्या प्रौढ विद्यार्थ्यांनी त्या बोळाचे रहस्य आम्हांला सांगितले होते. गजू कारंजकरदेखील शाळा सोडून गेला होता. खरे म्हणजे तो पळून गेला होता. पण लगेच परत आला. मात्र त्यानंतर तो रस्त्यात भेटला, तर आमच्याशी बोलत नसे. आणि मास्तरांच्या पुढेदेखील विडी ओढीत जाई. मला तो बोळदेखील गजू कारंजकरासारखा वाटे. चोरटेपणा आणि बेफिकिरी ह्यांचे काहीतरी विचित्र मिश्रण होते त्या बोळात. मात्र आमच्या गावातला गाणे जाणणारा तो तेवढा एकच बोळ. माझ्या रस्त्याला संस्कृत सुभाषिते येत असावीत असे वाटे.

नेने-रोड काय, किंवा हा बोळ काय, विचित्र असले, तरी नावडते नव्हते. पण मला अगदी न आवडणारा रस्ता म्हणजे आमच्या गावात ज्याला गुदामरस्ता म्हणत तो! आमच्या गावात हळदीचा आणि तंबाखूचा मोठा व्यापार. स्टेशनालगतच हा गुदामरस्ता होता. दोन्ही बाजूला वखारी आणि मधे आडवा पडलेला हा गुदामरस्ता.

गोणपाट नेसलेला भिकारी पाहिला, की मला अजूनही हा रस्ता आठवतो. कमालीचा कोरडा. हळद, तंबाखू, मिरची यांचा असा काही चमत्कारिक वास यायचा, की या रस्त्याच्या वाटेला जाऊ नये, असे वाटे! रात्रीच्या वेळी बहुधा हा रस्ता स्वतःची पाठ कराकरा खाजवीत असावा. ह्या रस्त्यात हंगामात गुळाच्या ढेपा पडत. त्या वेळी तर त्याच्याकडे बघवत नसे. ह्या रस्त्यावरची माणसेदेखील कशी अगदी रुक्ष, कडकडीत. मोठमोठ्याने बोलत. फर्लांगभर पसरलेल्या ह्या रस्त्यात मूठभर हिरवे गवतदेखील उगवलेले नसे. म्युनिसिपालिटीने दुतर्फा झाडे लावण्याचा कोणे एके काळी एक प्रयत्न केलेला होता. त्याची साक्ष द्यायला लोखंडी कांबीची वेडीवाकडी होऊन पडलेली दोन-तीन गोल कुंपणे मात्र होती.

माणसांप्रमाणेच रस्तेही सुखावतात आणि दुखावतात. रागावतात, रुसतात, भेडसावतात. अर्थात मी म्हणतोय ते रस्ते काही वर्षांपूर्वीचे! आता रस्ते रुंदावले, गुळगुळीत झाले. सकाळच्या वेळी अगदी पॅंट-बुशकोट घालून, भांग पाडून निघाल्यासारखे निघतात. माझ्या लहानपणी प्रत्येक रस्त्याचा पोषाख निराळा होता. माझा रस्ता गुडघाभर पंचावर घरी धुतलेली, स्वच्छ, गळ्यापर्यंतची गुंडी लावलेली पैरण घाली. नेने-रोड धाबळी नेसायचा. मारुतीच्या देवळाजवळच्या बोळाची कांती मलखांबासारखी तुकतुकीत होती. तो रस्ता निळा जांघ्या घालून जोडीदारावर कुरघोडी केलेल्या सडपातळ पहिलवानाच्या पिळदार पण तकाकणाऱ्या टांगेसारखा दिसायचा. आमच्या गावच्या मारुतीला 'शेलाराचा मारुती' म्हणतात. हे शेलार कोण होते, कोण जाणे. कारण तिथूनच पुढे शेलाराची बखळ आहे. गावकीतल्या इतर गोष्टी गेल्या, त्यांबरोबर बखळीही गेल्या. काही दिवसांनी बोळ जातील. बोळकांड्या तर गेल्याच. अडीअडचणीला त्या बोळकांड्या पोरासोरांना पाठीशी घालायच्या. समोरून येणाऱ्या मास्तरांना चुकवायला उपयोगी पडायच्या. घेणेकऱ्यांना देणेकऱ्यांची मुसंडी चुकवताना पोटाशी घ्यायच्या. देवदर्शनाहून परतणाऱ्या सासुरवासणी बोळकांडीच्या आसऱ्याला उभ्या राहून सासुरवासाच्या काटेरी कहाण्या एकमेकींत कुजबुजून डोळे गाळायच्या आणि जड झालेली मने हलकी करायच्या. बोळकांडीतल्या चिमुकल्या रस्त्यांना कान लावला असता, तर त्या माझ्या बालपणीच्या आटपाट नगरातल्या कितीतरी कहाण्या ऐकायला मिळाल्या असत्या.

बाकी गावातला मातबर रस्ता म्हणजे बाजाराचा! हा एखाद्या प्रतिष्ठित मानकऱ्यासारखा गावाबाहेरून यायचा आणि गावाला दोन्ही बाजूला उभे करून थेट नदीपर्यंत जायचा. ह्याचे नावदेखील 'मोठा रस्ता' असेच होते. त्याचा 'महात्मा गांधी रोड' परवा-परवा झाला. मोठा रस्ता म्हटले, की अजूनही माझ्या डोळ्यांपुढे केरो बाळाजी सराफ उभे राहतात. त्यांच्या कानातली भिकबाळी दोन फर्लांगांवरून चमके. धिप्पाड माणूस. कोशा बांधत असे आणि भिकबाळीचा कान आतून ऐटीत सोडवीत असे. डगला, करवतकाठी धोतर, तोंडात विडा, भरपूर मिश्या आणि त्यांतून गाळून निघाल्यासारखा स्वच्छ आवाज! त्यांचा उल्लेख नुसता केरोपंत किंवा केरो बाळाजी

असा झालाच नाही. सारे गाव 'केरो बाळाजी सराफ' एवढे मोठे नाव घेऊनच त्यांच्याशी किंवा त्यांच्यासंबंधी बोलत असे. मला मोठया रस्त्याला 'केरो बाळाजी सराफ' म्हणावेसे वाटे. सराफी दुकानाच्या चांदी-सोन्याच्या लखलखाटात गादीवर बसलेले केरो बाळाजी सराफ जसे दिसत, तसा रात्री दुकानातल्या किटसन बत्त्यांच्या झगझगाटात हा मोटा रस्ता दिसे. शिलंगणाच्या पालखीला केरो बाळाजी सराफ सगळ्यांत पुढे असत. अशा वेळी वाटे, की हा मोटा रस्ता फक्त त्यांनाच चालण्यासाठी राखून ठेवावा. ही केरो बाळाजी सराफांसारखी माणसे असल्या रस्त्याचा मान ठेवून चालली. त्यांनी रस्ता तुडवला नाही, गौरवला. असली माणसे रस्त्याने चालली की रस्त्याची छाती रुंदावते. आळंदीची पालखी खांद्यावरून नेणाऱ्या भक्तांच्या चेहऱ्यावर थकावट नसते. त्यांच्या कपाळीचे घर्मबिंदू मोत्यांसारखे चमकतात. चेहरे उजळतात. त्या ऐटीत असल्या माणसांना रस्ते अंगावरून वागवतात. माझ्या लहानपणी महाजन होते, बहुजनही होते. सर्वांचेच सामान्यीकरण झाले नव्हते. केरो बाळाजी सराफांसारखे महाजन चालले, की वाटा मोकळ्या व्हायच्या. त्यांच्या पाची बोटांत अंगठ्या होत्या हे खरे, पण तो हात मोकळा होताना कर्णाच्या हातासारखा मोकळा होत असे. जनहितासाठी सुटलेले संकल्प तडीला जायला असल्या हातांचे तळवे लागतात. तेव्हा कुठे रस्ता त्यांच्या पायांच्या तळव्यांच्या खुणा बिरुदांसारख्या अंगावर मिरवतो. मोठ्या रस्त्यातून नदीच्या दिशेला केरो बाळाजी सराफ रस्त्याला स्वतःचे पाय न लावता निघून गेले, तेव्हा तो मोटा रस्ता हुमसून हुमसून रडला असेल.

गावातल्या भाग्यवान रस्त्यांसारखे काही अभागी रस्तेही आहेत. घराघरांच्या रांगांमागले परसदारातून जाणारे रस्ते. त्यांना भंगी रस्ते म्हणतात. त्यांची मला दया येते. वर्षानुवर्षे ते त्याच गावात राहतात, पण आळीने वाळीत टाकल्यासारखे. नाही म्हणायला परसाबाहेरच्या मुकलेल्या चिंचांचे आकडे पाडताना त्या रस्त्यावर पडत, ते गोळा करताना कधी बऱ्या घरच्या पोरांची पायधूळ तिथे झडली तर झडली. एरवी, दिवाळीच्या पणत्या समोरच्या रस्त्याच्या गटारांच्या कडेलादेखील लागायच्या, पण हे रस्ते सदैव अंधारात. हे रस्ते कायमचे मुके.

मला पुलावरून वळणारे रस्तेदेखील फार आवडतात, पण छोट्या पुलावरून. प्रचंड पुलावरच्या रस्त्यांना नीट बोलता-चालता येत नाही. किंबहुना, ते खालच्या वाहत्या नदीच्या डोक्यावर टिच्चून गावात शिरणारे आगाऊ परदेशी वाटतात.

रस्त्यांना वय असतात. उलटत्या पावसाळ्यांबरोबर रस्तेही वयस्कर दिसतात. चेहऱ्यावर जुनाटपणा येतो. अनुभवीपणा दिसतो. हमखासपणे इष्ट स्थळी पोहोचणारा विश्वास आढळतो. आमच्या गावात पहिला 'नवा रस्ता' झाला, तेव्हा सुरवातीची काही वर्षे तो नवख्यासारखा वागत होता. अंगावरची माती ताजी वाटायची. खडीदेखील घासली नव्हती. देवळातल्या गुरवाने नवा 'मुरदुंग' आणला होता, तेव्हादेखील अजून तो भजनात रुळला नाही असे मला वाटे. खुंटीवर तांबड्या अलवणात बांधलेला

जुना 'मुरदुंग' मऊ-मऊ बोले. ह्या मृदंगाला अजून चरबटपणा होता. नव्या रस्त्यालादेखील तसा चरबटपणा होता. नव्या-कोऱ्या दगडी घरासारखा. पण त्या रस्त्यानेदेखील पावसाळे पचवले. दोहीकडली झाडेही जाणती झाली. आणि नवा रस्ता नावापुरताच नवा राहिला. हल्ली त्याला 'आचार्य केळुसकर मार्ग' म्हणतात. पण ते केवळ दप्तरी दाखल आहे. रस्ता पायांखाली रुळल्याखेरीज त्याला व्यक्तित्व येत नाही. तशीच नावेदेखील तोंडात रुळल्याखेरीज त्यांना व्यक्तित्व येत नाही. आमच्या गावची माणसे आता तशी खूपच खुळावली आहेत. दत्ताच्या देवळाजवळच्या, उन्हाळ्यातदेखील न आटणाऱ्या, उंबराखालच्या विहिरीला हल्ली 'मानवता विहीर' असे नाव ठेवले आहे. हरिजनांना ती विहीर मोकळी केली तेव्हा कुठल्या तरी पुढाऱ्याने ते नाव ठेवले. ती विहीर पार आटेपर्यंत त्या विहिरीला लोक 'उंबराखालची विहीर'च म्हणणार.

मला रस्त्यासारखेच चौकही आवडतात. विशेषतः चार रस्ते एकत्र येतात आणि म्युनिसिपालिटीच्या कंदिलाखाली रात्रीच्या निवांत वेळी बोलत असतात, तेव्हा त्यांचे संभाषण चोरून ऐकले पाहिजे. छपरावरून उतरणाऱ्या बोक्याच्या पावलांनी चालता आले पाहिजे, म्हणजे रस्त्याच्या नकळत ते ऐकता येईल. कधी कधी हे रस्ते फार थकल्यासारखे पडलेले असतात. विशेषतः, दिवसभर गणपती मिरवीत गेले, की रस्ता पाहावा. कण्हत पडलेला असतो, आणि काठची झाडे आपली त्याला उगीउगी करीत असतात.

एखादा नवा कोरा रस्ता जुन्या जाणत्या रस्त्याला मिळतो, त्या वेळी त्याच्या तोऱ्याचे हसू येते. कॉलेजात नवा लेक्चरर ज्या ऐटीने एखाद्या वृद्ध प्रोफेसरांपुढून उगीचच छाती काढून जातो, तसा हा रस्ता जुन्या रस्त्याच्या अंगावरून जातो. ह्या जुन्या रस्त्यांची एक मात्र मौज पाहिली. त्यांना नव्या कोऱ्या घरांची सोबत मानवत नाही. एकदम झिजायला काय लागतात, खंगायला काय लागतात, आणि मग एखाद दिवशी मरगळून पडतात. पावसाचे पाणी अंगावरून नदीपर्यंत वाहून नेण्याची ताकद संपते. अशा वेळी माणसांच्या पावलांच्या आधाराने रस्ता उठून बसायला लागतो. आणि कृतघ्न माणसे म्हणतात, "छे, चिखलात पाय रुतायला लागला बुवा! हा रस्ता खणून काढा." रस्ते झिजून मरतात, झुरून मरतात, अतिवृष्टीत बुडूनदेखील मरतात. गावातली एक पिढी जाऊन दुसरी येते, तशी रस्त्याचीही येते; नव्या माणसांचे आणि जुन्या रस्त्यांचे जमावे तसे जमत नाही. नव्या वाहनांचे तर मुळीच नाही. बैलाचे शेण चटकन धुळीखाली दडवणाऱ्या रस्त्याला ट्रकचा बोजा उचलवत नाही. अंगावर जखमा होतात. चाकांचे नागमोडी वळ तीन-तीन दिवस जात नाहीत. असल्या चाकांखाली कितीतरी जुने रस्ते आले आणि मेले. ही राक्षसी धुडे उचलायचे यांत्रिक बळ त्यांच्यात नव्हते. त्यांची घडण माणसाच्या हातून झालेली. माणसांचे भार त्यांनी आनंदाने वाहिले.

ह्या जुन्या रस्त्यांना नवी नावे ठेवली, की मग माझे पित्त भडकते. आपल्या नावां-

सकट त्यांना मरू द्या. त्यांना पुरा आणि मग नवा रस्ता बांधून नवे नाव द्या. आपण आयुष्यभर ज्यांना गणूकाका किंवा तात्या किंवा बन्याबापू म्हणत आलो, त्या म्हाताऱ्यांना उगीचच अशोककुमार, अरविंद किंवा शिरीषचंद्र वगैरे नावांनी हाक मारायला सुरवात करण्यापैकी हे आहे. सोनाराच्या बोळाला ज्या दिवशी 'चित्तरंजन रोड' हे नाव ठेवले त्या दिवशी तो नक्की लाजला असेल. हे म्हणजे आमच्या बापू सोनाराला नेकटाय लावून फुंकणी धरून बसवण्यापैकी होते.

त्या मानाने पायवाटा मात्र मोकळ्या. हा नावांचा ससेमिरा त्यांच्या मागे नाही लागला. त्या सदैव चिरयौवना. सरळ चालायच्या नाहीत. मंगळागौरीच्या पत्री गोळा करणाऱ्या पोरींसारख्या सुळसूळ करीत परकर खोचून पळताहेत. टेकडीवरच्या देवीला अशीच एक जराशी सुदृढ पायवाट वळणे घेत घेत जात असे. संध्याकाळी वरच्या देवीचे दर्शन घेऊन शाळकरी पोरे तिथून टणाटणा उड्या मारीत पायथ्याशी 'पळा पळा कोण पुढे पळे तो' करीत सुटायची. आता त्या पायवाटेलादेखील खडी घालून तिच्यावरून रूळ फिरवून बंदिस्त केली. तिचे पळणे थांबवले. जत्रेत देवीच्या देवळातल्या दगडी मंडपापर्यंत आता म्हणे मोटार जाते. आणि पायथ्याशी एका फळकुटावर बोर्डही आला आहे—'भवानी पथ'!

आणि माझा तो एकाकी वैराग्यशील रस्ताही आता राहिला नाही. दुतर्फा घरे आली, चाळी आल्या; दवाखाने, सलून्स, लॉंड्र्या, जगातली सारी बकाल सोबत आली. फार वर्षांनी मी गावी गेलो. माझे गाव मला ओळखताच आले नाही. गावकऱ्यांच्या अंगावरच्या कपड्यांसारखे गावचे रस्तेही बदलले. माझा रस्ता मला दिसेना.

माझ्या रस्त्याला मी ओळखले नाही, की त्याने मला ओळखले नाही, कोण जाणे! त्याच्या उशाची टेकडी कापली होती. तो रस्ता खूप म्हातारा होऊन वारला असावा. आता त्याची जागा एका डांबरट रस्त्याने घेतली होती, आणि तो आपल्या नावाची पाटी लावून पडला होता. मी ती पाटी वाचायला गेलो नाही.

बोबड्या नेन्याच्या वाडीतून पिठाची गिरणी हुक्हुक्हुक् करून मला वेडावीत होती.

# पाळीव प्राणी

लहानपणी इसापनीती वाचली नसती, तर जगात इतके निरनिराळे प्राणी आहेत याचा ते लहानपण संपेपर्यंत मला कधी पत्ता लागला नसता. चार पायांच्या प्राण्यांत व्हिक्टोरियाला बांधलेला घोडा, कुत्रीमांजरे, आणि पक्ष्यांत कावळा, चिमणी आणि दाणेवाल्याच्या दुकानापुढे जमणारे पारवे यांपलीकडे ज्यांना प्राणिसृष्टीतले फारसे कधी काही बघायला मिळत नाही अशा, मुंबईत जन्मून वाढलेल्या पोरांपैकी मी एक आहे. तसे माझे लहानपण मला पुष्कळच आठवते. ताटलीत दूधभात घालून "आता हा काऊच्या, हा कनी चिऊच्या" अशा चालीवर मला भरवल्याचे मला आणि माझ्या मातेलाही स्मरत नाही. "काय पानात पडेल ते खालच्या मानेनं गिळायची त्याची लहानपणापासूनच सवय हो!" हे सर्टिफिकेट मला सतत मिळत आले आहे. दुधाचे दात पडून भाकरी-पोळीचे आले. त्या दातांनी खाणावळीतल्या पोळ्याही तोडल्या. पण मला भोजन ह्या क्रियेसाठी कोणत्याही अन्य भुलभुलावणीची गरज भासली नाही. तात्पर्य, बालपणीच्या 'वदनिं कवळ घेतां'च्या अवस्थेपासून ते उद्याच्या 'वदनिं कवळि घेतां'च्या परिस्थितीपर्यंत पानात पडेल ते मुकाट्यानेच मी खात आलो आहे, खाणार आहे. सांगायचा मुद्दा माझ्या बालजीवनातच जिथे काऊ, चिऊ, हम्मा, कुतू वगैरे मंडळी आली नाहीत, तिथे त्यांच्याविषयीचे कुतुहल वाढण्याचा प्रश्नच संभवत नाही. नाही म्हणायला शेणाचे घर असलेला कावळा आणि मेणाचे घर असलेली चिमणी लहानपणी चार दिवस गोष्टींची घरटी बांधून गेली. पण आठवणीतून दोघांचीही घरे वाहून गेली आहेत. देवाने पहिल्यापासून दृष्टीतच काही दोष ठेवल्यामुळे वर्गाच्या वळचणीला असलेल्या चिमणीच्या घरट्यापेक्षा दामलेमास्तरांच्या टोपीबाहेर लडबडणाऱ्या शेंडीच्या गाठीचेच आकर्षण मला अधिक असे. लहान मुले फुलांत आणि पाखरांत रमतात, हा नियम माझ्या सन्माननीय अपवादानेच हवा तर सिद्ध करावा. लहानपणी मी बागेतल्या फुलाऐवजी गल्लीतल्या मुलांतच अधिक रमलो आहे. कुत्र्याचे

भिजलेले पिल्लू उचलून मी कधीही घरी आणले नाही, की नदीकाठची गवळणींची लोंबती घरटी शोधत गेलो नाही. एक तर नकाशावरचीच नदी पाहण्यात बराच काळ गेला. आणि पहिली नदी पाहिली ती नकाशावरच्या नदीसारखी निळी नसते हे दिसल्यावर नकाशावरचा विश्वास उडाला, आणि नदीवरचे प्रेम उडाले. थोडक्यात म्हणजे थोर वयात कविता करणारी माणसे हस्ते-परहस्ते बालपणीच्या आपल्या फुल-पाखरांत रमणाऱ्या संवेदनाशील (की क्षम ?) मनाबद्दल ज्या कथा पसरवितात, तसला कुठलाच पैलू माझ्या मनाला नव्हता. सर्कशीला गेलो तरी विदूषकाखेरीज इतर कोणत्याही मनुष्य अगर अन्य प्राण्यांनी माझ्या त्या वेळच्या चिमुकल्या मनाचा ताबा घेतला नाही. रिंगणातून विदूषक गेला की मी उदास होत असे. हत्ती स्टुलावर बसून जाई; घोडे रिंगणे धरीत; कुत्री रिंगणातून उड्या मारीत; एकनाथमूर्ती, राममूर्ती असली नावे धारण करणारे भीमकाय लोक तोफेचे गोळे झेलीत, मोटारी अडवीत; पण व्हिक्टोरिया राणी म्हणाली होती त्या चालीवर सांगायचे तर आय वॉज नॉट् ॲम्यूझ्ड्!—आमची तबियत वेहेलत नव्हती! पिंजऱ्यातल्या वाघाच्या तोंडात मान देणाऱ्या सर्कसवाल्याचे मला आताआता कौतुक वाटू लागले आहे. किंबहुना, सर्कस ही गोष्ट लहानपणी हल्लीच्या इतकी आवडतही नसे. लहानपणी वाघ ही गोष्ट जरासुद्धा भयप्रद वाटली नव्हती. कारण त्या वेळी चिंचेच्या फोकाने आमच्या पार्श्वभागावर ताशा वाजवून घेण्याची हौस भागवणारे दामलेमास्तर ह्यांच्याहून अधिक भयप्रद असे दुसरे काहीही वाटत नसे. त्या वेळची गोष्ट सोडा, पण त्यानंतर अनेक वर्षे दामले आडनावाच्या कुठल्याही इसमाशी मी आपण होऊन सलगी करूच शकलो नाही. दामलेमास्तरांपुढे वाघदेखील शेपूट घालून गेला असता, याची सर्कस पाहता पाहता खात्री पटली होती. मलाच नव्हे साऱ्या वर्गाला.

पशुपक्ष्यांत ज्या काळी मन रमायचे त्या वेळी रमले नाही, आणि आता वेळ निघून गेली. माझ्या शहरी जीवनात पहिला पक्षी आला तो कावळा! माझे बालपण शहरात गेल्याचे मला दुःखही नाही, तसेच माझ्या पाचवीला कावळा पुजल्याचेही नाही. "कावळा म्हणे मी काळा, पांढरा शुभ्र तो बगळा," अशी आम्हांला एक कविता असे. लहान मुलांच्या कवितेलाही त्या काळी कविताच म्हणत, बालगीत नव्हे. कावळा आम्ही रोजच पाहत होतो. पण सफेत बगळा मात्र भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतरच पाहिला. आमच्या बालपणी बगळे फारसे नसावेत. पक्षीसृष्टीचा पहिला प्रतिनिधी म्हणून बालजीवनात कावळा हा अतिसामान्य प्रतीचा पक्षी आल्यामुळे त्या सृष्टीविषयी एकूण त्याच काळात वैराग्य उत्पन्न झाले. ह्या पक्ष्याच्या सर्व लीला मी बारकाईने पाहिल्या आहेत. वास्तविक हा तसा अगदीच गरीब परिस्थितीतला. पण मुंबईच्या भाषेत सांगायचे म्हणजे 'साला आखडू' आहे. पूर्वी कडक कॉलर नावाचा, पांढऱ्या-स्वच्छ कापडी बांधणीचा, एक लाकडी गळफास पैरणीला जोडीत. ती कडक कॉलर लावणारी मुंबईकर मंडळी थेट कावळ्यासारख्या माना फिरवीत. ते पाहणे खटकखटक चाले. काळे डगले किंवा सूट आणि कावळे यांचे माझ्या मनात तेव्हापासून समीकरण

बसले आहे. कावळा हा काही पाळीव पक्षी नव्हे. पिंजऱ्यात घातलेला कावळा मी एकदाच पाहिला. लंडनच्या झूमध्ये. अगदी पोपटाच्या ऐटीत हा कावळा बसला होता. आपला हिंदी कावळा. पिंजऱ्याबाहेर नावाची पाटी होती 'इंडियन क्रो' अशी. एखाद्या अस्सल इंग्लिश कंपनीत गोऱ्या साहेबांच्या पंक्तीत एखादा डिसोझा बसतो तसा. लंडनमधले इतर हिंदी साहेब जसे एकमेकांना पाहून न पाहिल्यासारखे करतात, तसेच काहीसे मला पाहून ह्या कावळ्याने केल्याचे मला अंधुक स्मरते. वास्तविक इतर रंगीबेरंगी पक्ष्यांत त्यालाही स्वतंत्र पिंजऱ्याचा मान मिळालेला पाहून मलाही बरे वाटले होते. कारण कावळा हा पाळीव नसल्यामुळे त्याचे माझे काही भांडणच नाही. इतर पक्ष्यांच्या मानाने हा पक्षी कितीतरी समंजस दिसतो. त्या "काव काव" ओरडण्याला "काव काव" एवढाच अर्थ असतो. माणसाची बोली बोलण्याचा आव नसतो. सहसा पक्ष्यांच्यात न आढळणारा एक चार पावसाळे पाहिल्याचा भाव त्याच्या चेहऱ्यावर असतो. काकाकुव्याच्या चेहऱ्यावर रिटायर व्हायला आलेल्या हायकोर्ट जजाचे गांभीर्य असते. फार वेळ ह्या पक्ष्याकडे पाहत राहिले, की काही वेळाने जस्टिस काकाकुवा एकदम "ज्यूरीतील सभ्य गृहस्थ हो," अशी सुरवात करील काय, अशी मला नेहमीच धास्ती वाटत आली आहे. चारपाच कावळे तीन तिठ्यावर रिंगण करून बसले, की म्हाताऱ्या वकिलांची मुरब्बी टोळी एखाद्या दिवंगत इंग्रज न्यायाधीशाविषयी एकमेकांना आख्यायिका सांगत बसल्यासारखी वाटते. कावळा मेल्यावर इतर कावळे शोकसभा घेतात, आणि दिवंगत काकासाहेबांनी आपल्या ज्ञातीच्या उन्नतीसाठी फार प्रयत्न केले, ह्या चालीवर गुणवर्णनपर कावकाव करतात असेही मी ऐकले आहे. कावळ्यांची ही कौतुके मी काही प्रत्यक्ष पाहिलेली नाहीत. कावळा खिडकीशी बोलू लागला तर पाव्हणा येतो, असा एक समज आहे. हे खरे असते, तर मुंबईत खोली-दीडखोलीच्या खुराड्यात राहणाऱ्या सगळ्यांनी एव्हाना पिंडाला शिवण्यापुरताही कावळा जिवंत ठेवला नसता. एके काळी तो निरोप वगैरे आणीत असावा. त्याशिवाय त्या "काऊचे सोन्याने मढविन पाऊ" म्हणणारे निघाले नसते. हिंदीतही कागाला संदेसवा देण्यासाठी धाडले आहे. पण आमच्या पाहण्यातले कावळे असले काहीही करताना आढळले नाहीत. त्यामुळे त्याचे आवर्जून कौतुक करावे असे ज्याप्रमाणे काही घडले नाही, त्याचप्रमाणे त्याला नाव ठेवावे असेही त्याने काही केले नाही. क्वचित म्हशीच्या पाठीवरून सहलीला निघालेला कावळा पाहून पक्ष्यांनाही उडण्याचा कंटाळा येतो असा बोध मी घेतला आहे. मात्र पाळीव नसूनही ज्याच्याविषयी कौटुंबिक कथा बऱ्याचशा आहेत असा हा एकच पक्षी. कारण पिंडाला शिवण्याशी त्याचा संबंध येतो. पिंड ठेवले. कावळा शिवला. आणि मंडळी परतली. इतक्या तीन सरळ वाक्यांत ते शेवटले कार्य आटोपलेले क्वचित ऐकायला मिळते. आमच्या एका मित्राची आजी एकदा—आणि एकदाची—वारली. आता तिच्या पिंडाला न शिवण्याचे कावळ्याला काहीच कारण नव्हते. चांगली नव्वद-ब्याण्णव वर्षे पाहून तिने डोळे मिटले होते. मंडळी बुचकळ्यात पडली. "तुझ्या मुलाबाळांची काळजी घेऊ," म्हणावे, तर मुलगा

म्हणायचा तोच बावीस वर्षे पोष्टातून पेन्शन खाऊन आणखी बावीस वर्षे खाण्याइतका टुणटुणीत. (असो बापडा!) लेकी, सुना, नातू, पणतू सगळे काही 'यथासांग' होते. शेवटी कोणीतरी "आजीबाई, एक मोठ्ठी बरणी आणि दोन भकमं आली, तरच तुमची शालजोडी देईन हो बोहारणीला," असे हात जोडून म्हटले, आणि कावळा शिवला. कावळा हा प्राणी कौटुंबिक गोष्टींत इतक्या बारकाईने लक्ष घालीत असेल याची कल्पना नव्हती मला! एरवीचा हा अतिपरिचयामुळे अवज्ञेला पोहोचलेला पक्षी त्या विशिष्ट ठिकाणी इंगा दाखवून जातो. स्टँडावर डझनभर टांगे उभे असल्या वेळी "साहेब, बसा की. आपला टांगा आहे." म्हणणारा लाचार टांगेवाला, एकटाच असला, आणि डेक्कन क्वीनचा टाइम भरत आलेला असला, म्हणजे जी बेफिकिरी दाखवितो ती, आणि ही जात एकच! अडचणीत गाठल्यावर कोण कसा वागेल, सांगता येत नाही. दुपारची रणरणती वेळ, माणसे वैतागलेली, भटजीच्या पोटात ओरडणाऱ्या कावळ्यांची काव काव ऐकू येत असते, अशा वेळी हा कावळा अडून बसतो. इथे त्याचा दोष नाही. एकेकाची वेळ असते.

कावळ्यामागोमाग येणारा पक्षी म्हणजे चिमणी. वास्तविक ह्या दोघांत काहीच साम्य नाही. केवळ काऊशी यमक जुळते म्हणून चिऊ येते. मात्र काऊ आणि चिऊ हा निदान मुंबईच्या पक्षीजमातीतला अनुक्रमे बहुजनसमाज आणि कनिष्ठ मध्यमवर्ग आहे. संख्येने विपुल. कष्टानं जगणारा. सुबक पिंजऱ्यात नांदून डाळिंबाचे दाणे खाणारा ऐदी नव्हे. काऊचिऊ बिचारे आपली स्वतःची बोली बोलतात. त्यांना नागरांची शिकाऊ पोपटपंची जमत नाही. खाण्यापिण्यातला चोखंदळपणा परवडत नाही. खाऊ तर पेरू, किंवा मरू!—हे गाणे पोपटाला ठीक आहे. किंबहुना, आधी पेरू खाऊनच ते असली गाणी म्हणतात. चिमणाचिमणीची आर्थिक परिस्थिती कावळ्यापेक्षा जरा बरी असते. नाही म्हटले तरी त्या सभ्य घरांच्या वळचणींचा आसरा करतात. काही माफक प्रणयक्रीडा करतात. फिरत्या वाचनालयातल्या मासिकातल्या कथा वाचून कारकुनांची पोरे-पोरी जितपत प्रेम करतात तितक्याच. कावळे मात्र अगदीच मजूरवर्गातले. शहरात पहाटे उठून कामावर जायचे, नशिबात असेल ते शिळेपाके खाऊन दाटीवाटीने राहायचे. चिमणाचिमणी त्या मानाने लोअर डिव्हिजन क्लार्कच्या दर्जाने राहतात. सुटीत देशावर जाऊन पिकाच्या तुऱ्यांवर बसून येतात. 'हे' कामाला गेल्यावर चार घरट्यांतल्या चिमण्या जमून मंडळे चालवतात, थोडा चिवचिवाट करतात. एका खोलीच्या घरट्यात का होईना, पण स्वतंत्र संसार थाटतात. कावळ्याची घरे मजुरांच्या खुराड्यांइतकीच दृष्टीआडच्या सृष्टीत. मोठमोठ्या लोकांच्या पंख्यांवर, दिव्यांच्या टोपणांत, दिवाणखान्यातल्या तुळईजवळ पोटभाडेकरू म्हणून राहण्याची धिटाई चिमण्यांना जमते, तशी कावळ्याला जमत नाही. ह्या पक्ष्याला विलक्षण न्यूनगंड आहे. हा चिमण्यासारखा किंवा पारव्यासारखा एकदम कधीही घरात शिरत नाही. चिमणाचिमणीपैकी चिमणी हा स्त्रीसमाज बराच पुढारलेला असल्यामुळे तीही संसाराला हातभार लावते. कावळी चारचौघांत मोकळेपणाने वावरताना दिसतच

नाही. मी तरी अजून कावळी कशी काळी की गोरी ती पाहिलीच नाही. गोरी नसावी कारण इतक्या कावळ्यांतला एखादा तरी आईच्या वळणावर गेला असता. काकसमाजात काकूंना फारसे पुढे येऊ देत नसावेत. म्हणूनच कॉलेजातल्या मागासलेल्या पोरींना 'काकू' म्हणतात की काय? कावळी मी पाहिली नसली, तरी दामलेमास्तर मुलींना "ए कावळ्ये" म्हणत ते ऐकले आहे. त्यांना गोविंदा, अंतू, हरी, वेणू, प्रभी इत्यादी नावे समोर दिसत असूनही आठवत नसत. आमच्या काळी अमिताभ, हर्षवर्धन, आशुतोष, अर्चना, सस्मिता वगैरे, मास्तरांची कवळी उडवणारी नावे नव्हती. पण आमची नावे सोपी असूनही दामलेमास्तर बैलोबा, गाढवा, कावळ्ये ह्याच नावांत रमत. हजेरीदेखील देशपांड्या, फडक्या, साठ्या, अशा लाडिक उच्चारात घेत. आता इतक्या गद्य वातावरणात बालपण गेल्यावर कुठली फुले आणि कुठली पाखरे? खिडकीशी आपण होऊन येणारे कावळे, चिमण्या आणि तळमजल्यावरच्या वाण्याकडले खाऊन वळचणीला दिवसभर घुमणारे पारवे वगळले, तर आमच्या बालजीवनातून पक्षी केव्हाच उडाला होता. आमच्या लहानपणी आकाशात पक्षी उडत नव्हते असे नाही, पण चाळीच्या खिडकीतून जिथे आकाशच दिसायची पंचाईत, तिथे पक्षी कुठले दिसायला?

मुंबईच्या पाखरांतच काय, पण मुंबईत राहणाऱ्या यच्चयावत प्राणिमात्रांत अत्यंत सुखी प्राणी म्हणजे मुंबईच्या शा० चापशी, तेरशी, किरपाळ वगैरे नावे धारण करून मुंबईकरांच्या अन्नधान्याची सगवड करणाऱ्या कीराणा अने भुसार मालाच्या व्यापाऱ्यांनी शेफारून ठेवलेले पारवे! गळ्यातून लोकविलक्षण असा आवाज काढीत प्रेम करणे एवढ्याचसाठी यांचा जन्म आहे. त्यांच्या घाऊक पंक्ती उठवण्याचे काम मुंबईच्या दाणेवाल्यांकडे आहे. त्यांना टाकण्याचे धान्य जर हे दुकानदार गिऱ्हाइकांना देतील, तर आख्ख्या मुंबईचा दुवा घेऊन जातील. सगळ्या धान्यांत आणि कडधान्यांत ती ती रंगसंगती साधणारे खडे मिसळून झाले, की उरलेले धान्य हे लोक ह्या पारव्यांना टाकतात. पिंजऱ्यात न ठेवता पाळले गेलेले असे हे समस्त पक्षीसृष्टीतले पक्षी आहेत. मुंबईच्या पारश्यांसारखे पारवेही आपली जमात सोडून इतरांशी मिसळताना दिसत नाहीत. त्यांचे गळ्यातून आवाज काढून बोलणेही पारश्यांच्या बोलण्याशी मिळते-जुळते असते, आणि काही बाबतींतले वागणेही!

पिंजऱ्यातला सर्वांत लोकप्रिय पक्षी म्हणजे पोपट. वास्तविक हा आवडायला हवा. पण पाळीव पशू आणि पक्षी यांविषयी सर्वस्वी अप्रीती निर्माण करण्याचे कार्य माझ्या लहानपणी ह्याच पक्ष्याने केले. पोपट तोताराम, मिठुमिया असे काही काही बोलतो, हे एक साक्षात असत्य आहे. पोपटाचे बोलणे हे आगगाडीच्या "कशासाठी पोटासाठी" सारखे आहे. रुळावरून सांधे धरीत-सोडीत धावणारी आगगाडी "कशासाठी पोटासाठी, खंडाळ्याच्या घाटासाठी" हे बालगीत म्हणते हे जर सत्य असेल, तर मी पोपट तोताराम-तोतारामच काय पण संपूर्ण गीतरामायण म्हणतो हे मानायला तयार आहे. उगीच काहीतरी! पोपटाचे बोलणे हे त्याच्या मालक-मालकिणीने आधीच

ननात धरलेले असते. आजवर मी शेकडो पोपट पाहिले. "क-र-यू-पी-ठ्यँ-चॅक्-व्यू" एवढी अक्षरे एका दमात किंचाळणारा हा एक पक्षी आहे. दिसायला मस्त. बनारसी तमाखू घातलेले मघई पान जमवल्यासारखी चोच रंगवून, काशीच्या पंड्यासारखीच हिरवीगार शाल पांघरून, पिवळा जर्द पेरू फोडीत, पिंजऱ्यातल्या पिवळ्या दांडीवर न ओरडता बसलेला असला, तर पाहायला बरा वाटतो. आंब्या-पेरवांच्या बागांतून थव्यांनी उडत असला तरीही प्रेक्षणीय. पोपट लोकप्रिय व्हायला गार्डीच्या बावट्या-सारखी त्याची लाल-हिरवी रंगसंगती पुष्कळ कारण आहे. पण तो "सगळं सगळं बोलतो," हा मात्र त्याच्यावर आरोप आहे.

पण ही त्याची चूक नाही. सकल पाळीव पशुसृष्टी आणि पक्षीसृष्टी यांच्याशी माझे वैर जुळवणारा घटक ह्या इथे येतो. हा घटक म्हणजे ह्या प्राण्यांना पाळणारे पाळंदे लोक! कावळा, चिमणी ह्यांची ह्यांतून सुटका झाली. पारव्यांचे वागणेही बऱ्याच वेळा अश्लीलतेच्या कायद्यात येण्यासारखे असले, तरी त्यांचे कौतुक सांगणारे लोक नसतात. त्यामुळे त्या पक्ष्यांचे आमचे वैर नाही. असलाच तर थोडासा मत्सर आहे. ह्या पक्ष्यांनी इतके आवाज काढून कधी कुणाला माणसाच्या बोलीत बोलल्याचा भास झाला नाही. वळचणीला वर्षानुवर्षे नांदणाऱ्या चिमणीने कधी "काय काकू, झाली का पूजा?" म्हटल्याचे ऐकले नाही. खिडकीतल्या कावकावीतून "काय बळवंतराव, काय म्हणतोय दमा?" असा सवाल फुटल्याचे कुणी सांगत नाही. पारवा-पारवीच्या घुमण्यातून कुणालाही "केम डार्लिंग?"सारखे काहीच ऐकू आले नाही. आणि पोपटाच्या त्या कर्णभेदक किंकाळीतून 'सगळं सगळं' ऐकू येतं काय? वास्तविक पिंजऱ्यात भिजवलेले हरभरे, पेरू, हिरवी मिरची असले खाणे खाऊन बिचारा ब्रह्मचर्य, सत्य, अस्तेयऽऽ करीत बसलेला असतो. हा काय बोलणार? कावळ्याची कावळी चारचौघांत बाहेर पडली नाही तरी ती असते हे कावळ्यांच्या वाढत्या संख्येवरून उघड आहे. पण पिंजऱ्यात पोपट-पोपटीचा जोडा बसलेला मी तरी पाहिला नाही. मोकळ्या पोपटांचेही मैनानामक विजातीय पोरीशीच संधान असते म्हणतात. तीदेखील विशुद्ध मैत्रीच असावी. कारण राघूमैना ह्या मी फक्त लावण्यांतूनच ऐकल्या आहेत.

पोपटाला एक अक्षरही बोलता येत नाही हे सत्य मी लहानपणीच बोलून दाख-विल्यामुळे शेजाऱ्यांचा रोष ओढवून घेतला होता. ह्या पोपटवाल्या शेजाऱ्यांच्या पिंजऱ्यातला राघू नुसताच "क्यीऽऽर्र" करायचा. किंबहुना, तो क्यीऽऽर्र एवढेच बोलू शकतो म्हणून त्याला कुण्या सत्यवक्त्याने 'कीर' असे म्हटले आहे. पण आपला पोपट सगळे धडाधड बोलतो, असा आमच्या शेजारच्या फडकुल्यांचा दावा होता. आता त्याने पिंजऱ्याच्या सळयांवर शेपटी आपटून "क्यीऽऽर्र" केले की त्याचा अर्थ "काय गणपतराव, झालं का जेवण? आज काय बेत? वा! पुरणपोळी का? मजा आहे बुवा! तुमचं कुटुंब भलतंच सुग्रण की होऽ—हॅ हॅ हॅ!" एवढा होतो हे मज बालकाला कसे उमजावे? मी त्या पोपटाचा फार बारकाईने 'स्टडी' केला होता. पोपट हा डोळ्यांच्या विरुद्ध कडांना बुबुळे लागलेल्या चकण्यासारखा पाहतो. चकण्या लोकांत

काहींची बुबळे नाकाच्या पुलाजवळ भेटायला येतात, तर काहींची कानशिलांच्या दिशेने पांगलेली असतात. पोपट दुसऱ्या वर्गातला. पोपटाचे ते पाहणे मला कधीच आवडले नाही. कारण असल्या डोळ्यांची माणसे सदैव रागावल्यासारखी वाटतात. पोपटदेखील ते सक्तीचे ब्रह्मचर्य, सत्य, अस्तेय आणि मिरच्या ह्यांमुळे नेहमी कावलेला दिसतो. शिवाय, त्याच्या साध्या पाहण्यातही धूर्त संशय असतो. मी फडकुल्यांच्या पोपटाकडे तासन्तास पाहत असे. मधूनच त्याने "क्यीऽर्र" केले, की कुणावरून तरी शिवी हासडल्याचा भास होई. पण फडकुलीणकाकू मात्र म्हणत, "ऐकलंत का कसा 'सत्य वदे वचनाला नाथा' म्हणतोय तो—" असल्या भयानक डोळ्यांच्या पक्ष्याने क्यीऽर्र केल्यावर फार तर स्वयंवरातले "धष्ट-पुष्ट नवरडा" हे गाणे (होय, ह्यालाही गाणे म्हणत एके काळी!) म्हटले आहे असे वाटले, तर ते मला कदाचित पटलेही असते. पण 'सत्य वदे वचनाला नाथा'! त्याला अर्थात फडकुलीणकाकूंचाही नाइलाज होता. त्यांना पेटीवर वाजवून गायला तेवढे एकच गाणे येई. येई म्हणजे, त्यांना पेटीवर 'सत्य' सापडेपर्यंत गळा 'नाथा'पर्यंत पोहोचलेला असे. फडकुलीणबाईंचे गाणे म्हणजे पेटीच्या पट्ट्यांवरून इष्ट स्वर तपाशीत धावणारी बोटे आणि बेगुमान वेगाने सुरांशी भांडण करून निघालेला गळा यांची शर्यत असे. तेही मी सहन करीत होतो. पण 'क्यीऽर्र' म्हणजे 'सत्य वदे' हे मी प्राण गेला तरी मानायला तयार नव्हतो. फडकुल्यांना तो शिवमहिम्नस्तोत्र म्हणत असल्याचा साक्षात्कार होत असे. आणि मी ग्यालिलिओच्या धैर्याने "अहो, पण तो बोलत नाही," हे सांगत होतो. (ग्यालिलिओच ना तो? सूर्य किंवा पृथ्वी कुणाभोवती तरी कुणीतरी फिरतेय म्हणाला म्हणून फाशी गेलेला?) शेवटी माझ्या आईनेदेखील "मेल्या, तो बोलतो म्हटलंस तर काय जीभ झडणार आहे तुझी?" इत्यादी मातृसुलभ दमदाटी करून पाहिली. पण मीही हट्टाला पेटलो होतो. फडकुलीणबाई तिथून मारे "बघा कसा विठ्ठू विठ्ठू करतोय" म्हणायच्या. मी इथून ओरडून सांगत असे, "मुळीच नाही. तो नुसता क्यीऽऽर्र क्यीऽऽर्र करतोय. क्यीर्र क्यीर्र म्हणजे काय 'विठ्ठू विठ्ठू' आहे?" शेवटी माझ्या वडिलांनी ती चाळ सोडली. त्या वेळी मुंबईत शेजाऱ्यांचा पोपट आवडला नाही एवढ्या कारणासाठीसुद्धा जागा बदलता येत. नव्या चाळीच्या ग्यालरीत कुठेही पिंजरा टांगला नसल्याची खात्री केली, आणि चाळीच्या भय्याच्या हातावर अखंड बारा रुपये टिकविले. (त्या वेळी काही चाळवाले दोन महिन्यांचे आगाऊ भाडे घेत.) पशुपक्षी पाळणारांविषयीच्या माझ्या अनादराची गंगोत्री ही इथे आहे.

मुख्यतः पाळीव प्राणी तीन : पोपट, मांजर आणि कुत्रा. एका इसमाने माकडही पाळले होते. परंतु दोघांचीही आचरटपणाची इतकी चढाओढ चाले, की कुणी कुणाला पाळले आहे हे कळत नसे. घार, गरूड वगैरे पक्ष्यांना कुणी हौसेने पाळल्याचे ऐकिवात नाही. शिवाय, ह्या आणि इतर बऱ्याचशा पक्ष्यांना मी पेंढा भरलेल्या स्वरूपातच पाहिले आहे. इतिहासाच्या पुस्तकात कुठल्याशा मोगल बादशहाच्या मनगटावर बहिरी ससाणाही काढलेला असायचा. तोही प्रत्यक्षात पाहिला नाही. हा

म्हणे इतर पक्ष्यांचा पाठलाग करून त्यांना पकडतो. राज्यकर्त्यांच्या मर्जीत येण्यासाठी स्वकीयांचा वध करणारी अवलाद केवळ माणसांत नसून पक्ष्यांतदेखील आहे, एवढाच एक समाधानाचा सुस्कारा सोडण्यापलीकडे ह्याही पक्ष्याविषयी काही कुतूहल उरले नाही. मोर वगैरे मातबर पक्षी राणीच्या बागेतच पाहिले. फार वर्षे तिथे राहिल्यामुळे इथले मोर नाचकाम विसरले असावे. लहानपणी मुंबईकर बाप आपल्या मुलांना अधूनमधून तिथेच फिरायला नेत. दामलेमास्तर नामक सुलतानाच्या अमदानीत शालेय सहली वगैरे कौतुके अशक्य होती. त्यामुळे मुलांना नेण्याची एकमेव जागा म्हणजे राणीचा बाग. तिथे इतक्या वेळा जाऊन मयूरनृत्य कधीच पाहायला मिळाले नाही. पुस्तकात मोरपीस घातल्याने विद्या येते, असा एक समज होता. गणिताच्या पुस्तकाचे पान न् पान दाखवलेल्या त्या पिसाने परीक्षेत आपल्या डोळ्यांएवढेच वर्तुळ दाखवून तोही मयूरनृत्यासारखाच भ्रम आहे हे सिद्ध केले. लांबलचक पिसाऱ्याचा तो लंबेझाडू ओढीत राणीच्या बागेत हिंडणारा मोर आजही माझ्या डोळ्यांपुढे आहे. पण त्याला मी नुसताच पाहिला. नाचताना पाहिला नाही. त्यामुळे डोक्यावरच्या केसांचा पिसारा संभाळीत इडली खात बसलेल्या एखाद्या जागतिक कीर्तीच्या भरत-नाट्यमवाल्याला उडप्याच्या दुकानात पाहून जितका आनंद व्हावा, तितकाच माफक आनंद ह्या राणीच्या बागेत नुसत्याच हिंडणाऱ्या मोराकडे पाहून झाला. कलावंताचे दर्शन तो आपल्या कलेचे प्रदर्शन करताना व्हावे. उगीच एखाद्या जास्वंदाबाई जयशिंगपूरकरणीला चटणी वाटताना पाहण्यात काय मजा आहे? म्हणून हल्लीच्या सिनेमानटींचे बागेत काम करताना, देवपूजा करताना (फोटोसाठी ह्या काय वाटेल ते करतील!), किंवा इंग्रजी पुस्तक वाचताना (बहुधा फोटोग्राफरने सुलट बाजू दाखवून दिलेले असते!), किंवा असल्या नाही त्या भानगडी करतानाचे फोटो पाहिले, की त्यांची मला फडकुलीणबाईंच्या इतकी चीड येते. तात्पर्य, मोराचा नाच मी अजून पाहिला नाही, पण त्यानंतर त्याचा पिसारा उपटून आपल्या धोतरात किंवा पैठण्यात खोचून केलेली मयूरनृत्ये मात्र मी इतकी पाहिली आहेत, की त्यावरून मोर नाचतो हीदेखील पोपट बोलतो यासारखी थाप असावी याची खात्री पटली आहे. मोर ह्या विषयावर यापुढे जपूनच बोलणे प्राप्त आहे. कारण आता तो आपला राष्ट्रीय पक्षी झाला आहे. वास्तविक त्याचे केकाटणे हे पोपटाच्या क्यीऽऽरेंपेक्षा खूपच सुसह्य आहे. मी ते प्रत्यक्ष ऐकले आहे. पण हा पक्षी आता सरकारात रजिस्टर झाल्यामुळे आपली ती अंतःकरणापासून उमटणारी केका विसरून प्रसिद्धिखात्याची पोपटपंची करायला लागेल की काय, अशी मला धास्ती वाटायला लागली आहे. सरकारात गेलेल्या मोरूंचे मोर होतात, पण खऱ्या पिसांच्या मोराचा मात्र केव्हा मोरू करतील काही सांगता येत नाही. नाचाचे जाऊ द्या, पण बाकी खरोखरीच सुंदर असलेल्या ह्या पक्ष्याविषयी मला चिंता उत्पन्न झाली आहे.

काकाकुवा ह्या श्रीमंत पक्ष्याचे दर्शन फार वेळा घडले नाही, तरी एकदोनदा भेटीचा योग आला. उंच हवेलीतल्या एखाद्या हिरव्यागार महिरपदार खिडकीच्या

पिवळ्या दांडीवर बसणारा हा तुर्रेदार पांढरा शुभ्र पक्षी म्हणजे मूर्तिमंत खानदानीपणा आहे. उगीच आरडणे नाही, ओरडणे नाही. नुकताच मिल् किंवा स्पेन्सरचा गहन-ग्रंथ संपवून त्याविषयी मनन करीत आपल्या तीनताळाच्या महालात पूर्वी सर महादेव किंवा सर जगन्नाथ असल्या भरघोस नावाचे प्रागतिक पक्षाचे पुढारी क्वचित दृष्टीला पडत, तसा हा काकाकुवा दिसतो. हे गल्लीबोळात नांदणारे पाखरू नव्हे. ह्याचाच एक जंगमार की कुसूकू नावाचा आफ्रिकन भाऊबंद 'सगळं सगळं' बोलत असल्याच्या कहाण्या मी ऐकल्या आहेत. आमच्या आळीत एका गृहस्थाच्या घरी हा पक्षी टांगलेला असे. घराणे काकाकुवाचेच, पण दिसायला मात्र श्रीमंत कुळातल्या एखाद्या दरिद्री चुलत घराण्याची माणसे जशी काळीबिद्री निघतात तसल्यांपैकी. हा कुसूकू किंवा जंगमार जो कोणी असेल तो रस्त्यातून येणा-जाणाराला "ए पाववालाऽ", "ए जोश्याऽ", "काय रे सोमण, निघालास काऽऽ", "बापटांची विजू काय रे तीऽऽ बरी दिसतेय कीऽऽ" असे ओरडायचा. किंबहुना, तो ओरडतो अशी सगळ्यांची समजूत करून देण्यात आली होती. काही काळाने त्या घरातले डोक्याने अंमळ अधू आजोबा वारले आणि त्या हाकाही बंद झाल्या. माझ्या आयुष्यात मी ऐकलेला हा पहिला प्लेबॅक! त्या घरची माणसे मात्र "बाप्पा गेले, आणि आमच्या कुसूकूचं बोलणं बंद झालं हो." असे डोळ्यांत न आलेले पाणी पुशीत सांगत असत. बोलणे बंद होईल, नाही तर काय? त्या बिचाऱ्याचा बोलविता धनीच गेला.

पक्ष्यांच्या दुनियेत कोकिळेचे कविजनांनी इतके कौतुक करूनही कुणी कोकिळा पाळल्याचे ऐकिवात नाही. कदाचित कोकिळ आणि कोकिळा ह्यांपैकी संगीतविशारद कोण आहे याचा खात्रीलायक निर्णय न लागल्यामुळे त्यांना कुणी पाळत नसेल. शिवाय मेळ्यांतल्या मुलींना जसा फक्त गणेशोत्सवातच कंठ फुटतो, तसा ह्या पक्ष्याला फक्त वसंत ऋतूत! तेव्हा एका ऋतूतील कुहूकुहू एवढी एकच चीज ऐकायला पाच ऋतूंत पोसण्याचा खर्च कशाला करा, असा व्यावहारिक विचारही होत असावा. पोपटाच्या बोलण्याप्रमाणेच कोकिळा पंचम स्वर लावते हा एक संगीतविषयक अज्ञानाचा पुरावा आहे. कशाचा पंचम? मूळचा षड्ज कुठला? आता कोकिळेची काळी पाच पट्टी आहे म्हटले तर चालेल. पण कवीचे भाषाशास्त्रच निराळे. इतके दिवस उडुगण म्हणजे पक्षी, अशी माझी समजूत होती. पण 'उडु' म्हणजे एका जागी घट्ट असलेली नक्षत्रे हे ऐकून मी थंड झालो. नक्षत्रांना 'उडु' म्हणणारे हे कवी उद्या खऱ्या पक्ष्यांना आफ्रिकेतल्या कानू किंवा काडू ह्या येडपट नावाच्या राजकीय पक्षात टाकतील.

उडत्या पक्ष्यांत काही पक्षी देखणे असूनही पाळीव झाले नाहीत. दमयंतीनंतर हंस पाळण्याच्या भानगडीत कुणीही पडलेला दिसत नाही. कोकिळेप्रमाणे हाही पक्षी कवितेच्या कर्दमात रुतला. त्यातून त्याचे ते मानससरोवर श्लेषाच्या उपयोगी पडल्यामुळे दुहेरी फायदा झाला. हा पक्षी मोत्याचा चारा, बिसतंतू यासारखे—आर्यपथिकाश्रम-वाल्यांच्या भाषेत सांगायचे म्हणजे "एकदम हायकलास"—जेवण जेवतो. राहायला

त्याला जलाशय लागतो. हवा थंड असावी लागते. त्याच्या बदक नावाच्या ग्रामीण नातलगासारखा डबक्यात भागवून घेत नाही. त्यामुळे हा खाजगीत परवडण्यासारखा नसतो. साऱ्या पक्षिसृष्टीत (चुकून उडुगणात म्हणत होतो.) माझा आवडता पक्षी हाच. आयुष्यात जर पक्षी पाळावासा वाटलाच तर मी राजहंस पाळीन. असला पक्षी बनविणे विधात्यालाही पुन्हा जमले नाही. त्याने बदके केली, बगळे करून पाहिले, शहामृगांनादेखील तसली मान देऊन पाहिले, पण राजहंस जमून गेला. अशा हंसाची हिंसा करू पाहणाऱ्या नळाला अजिबात नीरक्षीरविवेक नसावा. किंवा मुंबईच्या नळात मासे शिरतात, तसा ह्या नळात नक्कीच कली शिरला असावा. त्याखेरीज इतकी डौलदार मान तो मुरगळायला निघाला नसता. पण ह्या नळापेक्षाही नलदमयंती-आख्यान लिहिणाऱ्या रघुनाथपंडिताने ह्या हंसावर फार मोठा अन्याय केला आहे. नळाच्या हाती लागलेल्या त्या राजहंसाच्या तोंडी "म्हातारी उडतां नयेचि तिजला,—फारच थकलीय—आणि वाइफचीही घरात डिलिव्हरी झालीय" असली केवळ कलेक्टर कचेरीतल्या डिस्पॅच क्लार्कच्या तोंडी शोभणारी भाषा घालून पिसापिसांतून राजरक्त सळसळणाऱ्या ह्या पक्ष्याचा त्याने घोर अपमान केला आहे. वास्तविक खरा राजहंस म्हणाला असेल, "हे नळराज, आपले ते अश्वशाळेत काम करताना खराब झालेले हात लावून माझे शुभ्र पंख खराब करू नका. बजावून ठेवतोय! मला मानससरोवरापर्यंत उडत जाऊन ते धुण्याचे कष्ट उठवावे लागतील. तुमच्या वाड्यातल्या बागेतल्या नळावर धुण्याची ही वस्त्रं नव्हेत. त्यांना स्पेशल वॉश लागतो. वस्तुतः, तुमच्यावर भाळलेल्या दमयंतीनामक विदर्भाच्या राजकन्येचा निरोप घेऊन आलेला मी राजदूत आहे. माझी अशी संभावना केलीत, तर विदर्भाची मनं दुखावतील, हे लक्षात ठेवा. ही काय वागण्याची रीत झाली? नळराजे आहात का तुमच्या राजधानीच्या मुन्सिपाल्टीच्या पाणीखात्याचे प्लंबर आहात?" खरा राजहंस असे खडसावून बोलला असणारच. पण कविलोकांना पक्षी हा प्रकारच कळला नाही. नाहीतर राजहंसाच्या तोंडी रघुनाथ-पंडिताने असली लाचार भाषा घातली नसती. देखण्या राघूची मैना नामक काळुंद्रीशी दोस्ती जमवली नसती, कोकिळबुवांची गायनविद्या कोकिळाबाईंना चिकटवली नसती, आणि स्वतःच्या जागेवरून इंचभर हलल्यावर ज्यांचा कपाळमोक्ष होतो असल्या नक्षत्रांना 'उडुगण' म्हटले नसते. राजहंसाविषयी इतके विवेचन केल्यावर इतर पक्ष्यांचा उल्लेख करणेदेखील जिवावर येते. शिवाय, मुख्य विचार पाळीव पक्ष्यांचा आहे. तो 'पोपट' ह्या एकाच पक्ष्यावर जवळजवळ संपतो.

पाळीव प्राण्यांत मांजर हा एक खास संशोधनाचा विषय आहे. माझे आणि मांजरांचे वैयक्तिक संबंध गोणत्यांमार्फतच आले. गोणत्यांतल्या मांजरांना शक्य तितक्या दूर सोडून येण्याच्या कामगिरीवर माझी नेमणूक होत असे. पण ह्या कुटुंबाला तडीपार करून घरी यावे आणि आपल्या स्वागताचे 'म्यॉव' त्यांनीच करावे, असेच घडत आले आहे. तडीपार केलेले गुंड जसे पोलीसचौकीवर फौजदाराच्या पाकिटातून सिगरेट ओढताना दिसतात, तशी ही गोणत्यांत घालून साता समुद्रांपलीकडे सोडलेली मांजरे

